सुरस ग्रंथ-मालेचें ८२ वें पुष्प

# विद्याविनोद

अथवा

# कॉलेजच्या आवारांत

( स्वतंत्र पत्रात्मक कादंबरी )

लेखक

प्रा. भा. म. गोरे, एम्. ए.

फर्ग्युसन कॉलेज, पुणें ४.

१९३९

किंमत १॥ रुपया

प्रकाशक :— हिरालाल गुलाबचंद व्होरा
मेनरोड, सोलापूर.

व्यवस्थापक :— शंकर नारायण वैद्य,
बी. ए. एल्‌एल्. बी.
१९२ शुक्रवार, पुणें.



मालक :— जिवराज गुलाबचंद व्होरा
सुरस ग्रंथमाला, पंढरपूर.

मुद्रक— प्र. भा. काळे,
प्रतिभा मुद्रणालय, ३३५ शनवार पेठ, पुणें.

# आमचें प्रकाशन.

| | | |
|---|---|---|
| २ | निशाचराचा प्रेमविलास ... ... | रु. १। |
| ३ | पतिपत्नी प्रेम ... ... ... | ३।।। |
| ५ | इंदिरा व नीरजा--ले. कोठारी बी. ए. व पांगळ | १।।= |
| ६ | दैवाची विचित्र लीला--ले. 'सहृदय' ... | ३ |
| ७ | चंद्रकांता--ले. नभोविहारी ... ... | २ |
| ८ | उषा व प्रकार—ले. शहा वकील व बापट ... | २।। |
| ९ | जर्मन मोहीम, गहनगूढ व प्रेमपरीक्षा ... | २।।= |
| १० | सत्यमेवजयते व शैशवसहचरी ... | २ |
| ११ | भयंकर स्वप्न—ले. इनामदार बी. ए., एलूएल्. बी. | २ |
| १२ | छत्रसाल--ले. वा. ना. शहा वकील ... | ३।।। |
| १४ | खरी आर्यकन्या व हिंदुस्थानचें भविष्य—<br>ले. रणदिवे व बापट | २। |
| १५ | शशांक--ले. विठ्ठल सिताराम गुर्जर ... | ३ |
| १६ | चंद्रिका--ले. 'कुशाग्र' ... ... | २। |
| १८ | गौर मोहन--ले. 'कुशाग्र' ... ... | ३। |
| १९ | पितृप्रेम--( नाटक ) ले. परांजपे ... | ०।।= |
| २० | प्रणयी युवराज ( नाटक ) व स्वर्गीय सौंदर्य--<br>ले. शहा व इनामदार | २। |
| २१ | ऐक्यांतच मौज !—ले. रणदिवे ... ... | ३। |
| २२ | कर्मसंन्यास--ले. ग. वि. कुलकर्णी ... | २।। |
| २३ | नयनतारा—ले. 'नभोविहारी'... ... | २। |
| २४ | मोहिनी—ले. रणदिवे ... ... | २।। |
| २६ | जन्मठेप--ले. ग. वि. कुलकर्णी... ... | २।। |
| २७ | श्वेतांबरा—ले. 'महाराष्ट्रभाषाचित्रमयूर' आठल्ये | २।।= |
| ३० | मनोरमा—ले. रणदिवे ... ... | २।। |
| ३२ | नगरतारका--ले. रणदिवे ... ... | ३। |
| ३३ | कुलांगना कीं वारांगना? व कथागुच्छ ... | ३। |
| ३४ | अजब कारस्थान—ले. 'अज्ञात' ... | ३। |
| ३५ | खरी लोकसेवा--ले. इनामदार, बी. ए., एलूएल्. बी. | रु. ३। |

मालेचीं पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें. –

सुरसग्रंथमाला, पंढरपूर.

हिरालाल ओरा अँड सन्स, मेनरोड, सोलापूर.

सुरसग्रंथमाला ऑफिस, ८९२ शुक्रवार, पुणें २.

मे. परचुरे पुराणिक मंडळी, माधवबाग, मुंबई.

तुकाराम पुंडलिक शेटे, माधवबाग, मुंबई.

– x –

## प्रा. भा. म. गोरे, एम्. ए.

# यांचीं पुस्तकें

### ( प्रकाशित )

१ **आधुनिक आङ्ग्ल वाङ्मय** ( टीकात्मक )
प्र. चित्रशाळा प्रेस, पुणें. कि. १-०-०

२ **नवी पालवी** ( कथासंग्रह ) ,, कि. ०-८-०

३ **विद्याविनोद** ( कादंबरी ) कि. १-८-०

४ The Writings and speeches of—
Dr. **R. P. Paranjpye.**
( संकलन आणि संपादन )
प्रकाशक—**कर्नाटक प्रेस**, मुंबई. ( छापत आहे. )

### ( आगामी )

५ **चित्रलेखा** ( लघुनिबंध-संग्रह )

६ **'सतीचें वाण' आणि इतर कथा** ( कथासंग्रह )

७ **सोन्याचे कण** ( लघुतमकथा संग्रह )

८ **जगाची रीत** ( कादंबरी )

# आवाराच्या दाराशीं

कादंबरी म्हणजे सामान्य जीवनाचें एक कलात्मक चित्र. लेखकानें कितीही विस्तीर्ण कादंबरी लिहिली तरी त्याला जीवनाच्या सर्व अंगोपांगांचें चित्र एकेजागींच काढतां येणें शक्य नसतें. यासाठीं आपापल्या आवडीप्रमाणें, किंवा अनुभवाप्रमाणें प्रत्येक लेखक भोंवतालच्या जीवनाचा एक लहान मोठा काप काढून, तो कलेनें नटवून, वाचकांपुढें ठेवीत असतो. स्वतःचा चेहरा परिचित असूनही आपला फोटोग्राफ पहाण्यांत आपल्याला एक प्रकारचा आनंद वाटतो, आपल्या भोंवतालच्या परिचित अशा स्थळाचें चित्र पहातांनाही आनंद होतो व हाच आनंद परिचित अशा सामान्य जीवनावर आधारलेल्या कथाकादंबऱ्या वाचतांना होत असतो. कै. हरीभाऊ आपटे, श्री. ना. ह. आपटे व श्री. य. गो. जोशी यांच्या कथाकादंबऱ्यांतून दररोज दरघरीं घडणाऱ्या घटनाच दाखविल्या असूनही त्यांचें लिखाण लोकप्रिय होण्याचें कारणही वर उल्लेखिलेलें औत्सुक्य आणि कौतुक हेंच होय.

आपल्या भोंवतालच्या जीवनाच्या एखाद्या अंगाचें किंवा विभागाचें कलात्मक चित्र पहाणें, किंवा त्याचें वर्णन वाचणें लोकांना आवडतें, या गृहीत विचाराचा आधार घेऊन, प्रस्तुत लेखक ही कादंबरी वाचकांपुढें ठेवीत आहे.

सामान्य व्यावहारिक जीवन, त्यांतील प्रश्न, अडचणी, अनेकविध जीवनप्रकार, अनेक व्यक्ति आणि प्रकृति यांचा विचार करीत असतांही, विद्यार्थि आणि अध्यापक या नात्यानें दहा पंधरा वर्षें सतत डोळ्यांपुढें असलेले 'कॉलेजच्या आवारांतील' जीवन दृष्टीआड होईना. आजच्या सुशिक्षित वर्गाच्या जीवनाचा एक महत्त्वाचा भाग म्हणून या विद्यालयीन जीवनालाही स्थान आहेच. या 'कॉलेजच्या आवारांतील' जीवनाचे प्रकार, त्यांतील प्रश्न, वैचित्र्य, शक्य असलेल्या सुधारणा, वगैरे अंगांचा विचार या कादंबरींत केलेला आढळेल. या जीवनाबद्दल प्रस्तुत लेखकाच्या कांहीं विशिष्ट कल्पना व योजना असल्यानें, त्यांना स्वतंत्रपणें उठाव देण्यासाठीं ही कादंबरी कॉलेजजीवनापुरतीच मर्यादित केली आहे, व तत्संबंधीं कांहीं विधायक सूचना सूज्ञांपुढें विचारासाठीं नम्रपणें ठेविल्या आहेत. आपल्या कार्यक्षेत्राचें वाङ्मयीन ऋण फेडून, नंतर सामान्य जीवनाच्या विशालतर

क्षेत्राकडे वळण्याची लेखकाची इच्छा आहे. वाचकांना प्रस्तुत कृति पसंत पडली तर " **जगाची रीत** " या पुढील कादंबरींत आजच्या जीवनांतील कांहीं सामाजिक व आर्थिक प्रश्नांचा कथेच्या अनुरोधानें विचार करण्याची लेखकाची उमेद आहे.

प्रस्तुत कादंबरी मुख्यतः वर्णनपर आहे. आजचें कॉलेजजीवन कसें आहे, व तें कसें असावें हें दाखविणें हा कादंबरीचा मुख्य हेतु आहे. त्यांत वैचित्र्य आणण्यासाठीं, सांगली, बडोदें व दिल्ली अशा मराठी कादंबऱ्यांतून कांहीं अंशीं उपेक्षिलेल्या स्थलांतून कथानक खेळविलें आहे; मराठी कादंबऱ्यांत सामान्यतः फारशी न उपयोगिलेली पत्रात्मक लेखनपद्धति निवेदनासाठीं अंगिकारिली आहे. 'विद्या' आणि 'विनोद' या कॉलेजच्या जीवनांतील दोन अंगांची सांगड घालण्याचा लेखकाचा प्रयत्न आहे.

या कादंबरीमुळें **कॉलेजच्या आवारांतून** गेलेल्या वाचकांच्या 'गतसुखस्मृति' जागृत होतील, सध्यां कॉलेजांत असणाऱ्या वाचकांना प्रत्यक्षदर्शनाचा आनंद होईल, व या आवारांत न शिरलेल्या वाचकांनाही नव्या जीवनाचीं कुतूहलपूर्ण दृश्यें दिसतील अशी लेखकाला आशा वाटते. आजच्या प्रौढ विद्यार्थ्यांना उद्देशून निर्देशित केलेल्या कांहीं योजना, अध्यापक, चालक व विद्यार्थिवर्गाच्या सहकार्यानें पुढें मागें प्रत्यक्षसृष्टींत सार्वत्रिकपणें दिसून आल्या तर लेखकाला आपल्या श्रमाचें चीज झालें असें वाटेल.

(शेवटीं सर्वांना विनंति व सूचना एवढीच कीं, **कादंबरींतील संस्था, स्थळें, व्यक्ति, प्रसंग वगैरे सर्व प्रकार पूर्णपणें काल्पनिक असून, त्यांचा कोणत्याही व्यक्ति, संस्था किंवा सत्य घडामोडीशीं संबंध नाहीं कादंबरींतील मतें हीं लेखकाचीं वैयक्तिक मतं आहेत.** तीं वाचकांना पटलीं तर उत्तमच आहे; न पटल्यास त्यांबद्दल वाद उपस्थित न करतां तीं खुशाल बाजूला सारावीं, व " **परिहासविजल्पितं सखे, परमार्थेन न गृह्यतां वचः ।** " या विनंतीला मान द्यावा. पुढें गैरसमज होऊं नये म्हणून एवढें आधींच सुचवून ठेवावेसें वाटतें. )

फर्ग्युसन कॉलेज,
पुणें ४.

रसिकांचा नम्र,
**भा. म. गोरे.**

# विद्या विनोद

## १. चौपाटीवरून

ॲबनेम् रोड.
मुंबई

प्रिय सुधा—

हिला सुनंदेचा नमस्कार—

साधा नमस्कार कां ? अगदी कोंपरापासून नमस्कार लिहिण्याची वेळ आली म्हटलं ! मी चांगली दोन पत्रं पाठविलीं, पण तुझं उत्तर नाहीं. मग पुण्याच्या मित्र-मैत्रिणींत इतक्यांतच एवढी रमलीस वाटतं ? मला बाई राहून राहून विचारावंस वाटतं कीं, मुंबईच्या कॉलेजांत तीन वर्षं घालविलेल्या तुझ्यासारख्या मुलीला आडवाटेच्या त्या पुण्याच्या कॉलेजांत काय वाटत असेल ?

आतांच बघ ! कॉलेजच्या दुसऱ्या मजल्यावरील मुलींच्या खोलींत बसून मी हें पत्र लिहीत आहे. समोरच, चौपाटीच्या दगडांच्या राशीवर धडाधड हल्ला करून, समुद्राच्या लाटा कशा धडका देत आहेत त्या ! लाटेगणिक पिंजलेल्या कापसासारखा पांढरा शुभ्र फेंस इतका उंच उसळतो म्हणतेस ! मला तर अगदीं असं वाटतं कीं आत्तांच जाऊन त्या तुषारांच्या कारंज्यांत असंच उभं रहावं. पण हें ‘ जूहू ’ नाहीं म्हणून गप बसतें इथेंच.

जरा निवांतपणें तुला पत्र लिहीन म्हटलं, पण पत्राचा मायना एकीनें पाहिल्याबरोबर, भुर्रकन् तुझ्या साऱ्या जुन्या मैत्रिणींचा घोळका माझ्याभोंवतीं जमला आहे. फ्रेनी कापडिया, लुसी डिसोझा, अचला भांडारकर—साऱ्यांनीं पुन्हां पुन्हां तुझी आठवण काढून तिकडे तुझी कशी काय व्यवस्था लागली आहे तें लिहिण्यास आग्रहानें सांगितलें आहे. साऱ्या

इथेंच आहेत. उरली मात्र एक हंसा. तूं पुणं गांठलंस तसा तिनेंही बडोद्याकडे मोर्चा वळविला—मी मात्र इकडेच रहाणार आहे.

आठवतं तुला? आपण तिघींनी चौपाटीच्या वाळूंत बसून, विहिरी नी किल्ले करतांना गप्पा मारीत किती निश्चय केले होते ते? शिक्षण संपेपर्यंत साऱ्यांनीं एका ठिकाणींच रहायचं—नाइलाजानें कोणाला दुसरीकडे जावं लागलंच, तरी नेमानं पत्रं पाठवून, अगदीं दररोज भेटून, मोकळेपणानं बोलल्यागत, खडान् खडा साऱ्या हकीकती एकमेकींना कळवायच्या, अन् पुढेंही दरवर्षी साऱ्यांनीं कुठें तरी सुटी एकत्र घालवायची. आतां तीन वर्षांनंतर आपण पांगलेल्या आहोंत तर निदान पत्रांपुरतं तरी या निश्चयाला धरून असावं; कारण शिक्षण संपल्यावर कोण कुठं—कोण कुठं—कापसाच्या म्हताऱ्यांगत, नशीबाच्या वाऱ्यावर कुठं उडून जाऊं कुणाला ठाऊक?

तूं नी हंसा गेल्यानं मला अगदीं चुकल्या चुकल्या सारखं वाटत आहे. नेमानं पत्र लिहीन म्हणून जातांना सेंट्रल स्टेशनवर अगदीं डोळयांत पाणी आणून हंसानें मला सांगितलं—पण तिच्या छांदिष्टपणामुळें मला नाहीं तिचा विश्वास वाटत—जिथं जाईल तिथंच रमेल ती. मग मागील मैत्रिणींची आठवण तरी राहील कीं नाहीं याचीच शंका वाटते मला.

मला विश्वास वाटतो तो तुझा. तुझ्या जरा गंभीर स्वभावामुळें इकडील टवाळांनीं तुझं टोपण नांव 'काकू' म्हणून ठेवलं, तें जरी फाजील असलं तरी निदान तूं इकडल्या मैत्रिणींची आठवण ठेवण्याइतकी स्थिर वृत्तीची आहेस इतकं दिसून आलं म्हणजे मला समाधान आहे.

मात्र एवढं लक्ष्यांत ठेव आतांपासून, तुझीं पत्रं नेमानं आलीं नाहींत तर एखादे दिवशीं इकडील या साऱ्या मैत्रिणींना घेऊन येऊन, तुझ्या रेसिडेन्सीला वेढा घालून, परत पळवून नेऊं तुला मुंबईला. बघ!

तुझी,

**सुनंदा.**

## २. नव्या जगांत

पुणें

प्रिय सुनंदा हिला—

सुधाचा सप्रेम नमस्कार—

तुझीं दोन्ही पत्रें पोंचलीं. त्यांतलं तुझं आग्रहाचं मुंबईवर्णन किती लांबत जाणार याचा थांगच लागेना मला. मीही मुंबईची होत्येंच-पुण्याची बरीच चेष्टा केलीस तूं. मुंबईच्या बऱ्याच लोकांना संवयच आहे ती. पण खरंच सांगतें तुला, एकदां शनिवार रविवार साधून इकडे येऊन जा म्हणजे पुण्याची आणि आमच्या कॉलेजची नवलाई कळेल.

मुंबईच्या त्या ट्राम, बस, लोकल नी टॅक्सीज्‌चा खडखड धडधडीच्या कानठळी कल्लोळांतून इकडे आल्यावर किती शांत अन् चमत्कारिक वाटलं! अगदीं नवीनच जगांत आल्यासारखं वाटे मला. तिकडच्या कॉलेजांची ऐट आणि झकूपकू इथें नसली तरी या नव्या कॉलेजची ओढणीही आतांच एवढ्यांतच माझ्यावर मोहनी घालूं लागली आहे.

हिरव्यागार सर्पिल वेलांनीं आच्छादलेली कॉलेजची एक दर्शनी बाजू, तें उंचच उंच सभागृह, कांचेच्या छपराची टोपी घातलेली भव्य लायब्ररी, त्यामागें पसरलेल्या वसतिगृहाच्या रांगा, आणि साऱ्यांच्या मागें लांब हात पसरून, जणूं काय साऱ्यांचें रक्षण करण्यासाठीं उभ्या ठाकलेल्या त्या टेंकड्या, हें आमचं एक स्वतंत्र विद्यानगरच वसलं आहे म्हणेनास?

आमच्या रेसिडेन्सींत तर साऱ्या राण्याच-सारख्या हंसत खिदळत पिंगा घालीत असतात. इकडचं टेनिस-नी बॅडमिंटन् कोर्टही इतकं छान आहें म्हणतेस! त्यांनींच पहिल्यानं ओळख करून दिली इकडच्या मुलींची.

मी पहिल्यानेंच इथें आल्यान बावरलेली. अगदीं कुणाची ओळख नाहीं. त्यानं इतकं उदासवाणं वाटे कीं-(हो कशाला चोरून ठेवूं तुझ्यापासून,) पहिल्या दिवशीं तर खोलीला कडी घालून रडलेंसुद्धां मी मनमोकळें करून. तुझी, हंसाची, अन् अचलाची सारखी आठवण होई,

अन् मग अस्सा राग आला बाबांचा—त्यांना काय होतंय् तिथं दिल्लींत बसून, मला बुद्बळाच्या प्याद्याप्रमाणें कॉलेजच्या एका घरांतून दुसऱ्या घरांत चालवायला ? म्हणे प्रकृतीची काळजी वाटली माझ्या—जरा मुंबईत आजारी पडलें म्हणून अगदीं कांहीं सोनापूरचा रस्ता धरला नव्हता मी ! पण मी सांगितलं होतं, तुलाच कीं आई गेल्यापासून बाबा अगदीं उदास नी तऱ्हेवाइक झाले आहेत ते. जाऊं दे, हें वर्ष शेवटलं—

सांगायचं म्हणजे, एक दोन दिवस अगदीं ओकं ओकं वाटलं इथें. रॅकेट घेऊन टेनिस कोर्टावर गेलें तर मुंबईची म्हणून कोणी नीट बोलेनाच माझ्याशीं. त्यांचे त्यांचे आपले लहान लहान गट. शेवटीं कोर्ट जरा मोकळं झाल्यावर, एका नकट्या नाकाच्या, अन् चुरुचुरु बोलणाऱ्या, त्यांतल्या तोऱ्यानं मिरविणाऱ्या मुलीला चांगला एक लव्हसेट चारला तेव्हां साऱ्या जरा ओशाळगत होऊन दुरून, जवळून, चौकशी करायला लागल्या—कुठल्या कॉलेजच्या, कोणत्या क्लासच्या, कुठं रहाणाऱ्या अन् घरीं कोण कोण आहे तें—तेव्हांपासून दोघी तिघींशीं बरीच ओळख झाली आहे माझी.

दुसरी गंमत सांगतें ती वर्गांतली. परवां आमच्या तासाला एका प्रोफेसरांनीं अशी भरधांव गाडी सोडली होती म्हणतेस ? माझ्या मागचे दोन चार विद्यार्थी 'धीरे गाडी हांक रे' म्हणून गुणगुणत होते. सारे जागच्या जागीं चुळबुळत. शेवटीं मीच उठून एक प्रश्न विचारला कीं अमुक भाग समजला नाहीं म्हणून. मग जें कांहीं स्टँपिंग् झालें म्हणतेस ! 'गाउन' चा पदर सांवरून, कपाळाचा घाम पुशीत प्रोफेसरही चष्म्यांतून रोखून पहायला लागले माझ्याकडे जरा रागानें. मग जरा वादळ शमल्यावर आमची गाडी खरोखरच धीरे धीरे चालली. क्लास सुटल्यावर जो तो 'कोण ती, कोण ती' म्हणून करूं लागला—इथें नवीनच वाटलं कीं काय त्यांना ! मुंबईला कोणी लक्ष्यही दिलं नसतं अशा वर्गांतल्या प्रश्नाकडे.

तुम्हां साऱ्यांना विसरूं म्हटलं तरी विसरतां येणार नाहीं मला. मात्र इथं जरा नवखी असल्यानें जम बमेपर्यंत पत्र लिहितां आलं नाहीं. अन् कायग ? 'मित्र—मैत्रिणी' असा तिरपा टोला मारतांना मोठं भूषणच वाटलं असेल तुला नाहीं ? तरी बरं, बिचाऱ्या त्या सुरेशन्चे काय

ह्याल केलेस ते मला ठाऊक आहे म्हणून. विचारा केंस पिंजारून शून्य-मुद्रेनें उभा असे व्हरांड्यांत, एखादा शब्द तुझ्याशीं बोलावयाला मिळेल म्हणून. शेवटीं वैतागून जाऊन बसला आहे लंडनला 'बार' साठीं—जाऊंदे उगीच आपली आठवण दिली तुला एवढंच.

पुन्हां आग्रहानें सागतें—केव्हां तरी शनिवारीं रविवारीं ये इथं. निदान आमच्या गॅदरिंगच्या वेळीं तरी तुला आलंच पाहिजे. तूं, फ्रेनी अन् अचला यांच्याबद्दल इकडच्या मुलींत मी इतक्या गप्पा मारल्या आहेत कीं नांव न सांगतांच त्या तुला ओळखून काढतील.

मी इथें आलें—नव्या ओळखी केल्या तरी तुला विसरायची नाहीं, एवढं पक्कं लक्षांत ठेव तूं. इतक्या मुली आहेत इकडे, पण तुझ्यासारखा आनंदी, खेळकर, थट्टेखोर पण मायेचा स्वभाव एकीचा नाहीं. पण आटपतेंच बाई आतां—ती 'कंपॅनियन्' बघ कशी गुरगुरतेय् माझ्या-वर, इतका वेळ दिवा ठेवून तिची झोंपमोड केल्याबद्दल ! नमस्ते.

तुझीच,

सुधा.

## ३. पहिलीं पाउलें

शनिवार पेठ,
पुणें.

मित्रवर्य नारायणराव यांसी

अरविंदाचा सा. न. वि. वि.

तुझें पत्र पोचलें. सांगली सोडून येथें आल्यानें माझे डोळे फिरले असावेत हा तुझा तर्क चुकीचा आहे. पहिल्यानेंच या मोठ्या शहरांत आणि कॉलेजांत आल्यानें जरा बावरल्यासारखें होऊन जम बसेपर्यंत पत्र लिहितां आलें नाहीं एवढेंच.

सांगलीच्या अफाट, सपाट, काळ्या माळावर, एकलेपणाच्या गांभीर्यानें उभें असलेलें तें छोटें कॉलेज, सांगली कडील गाडीची वाट पहात वडाच्या झाडाखालीं भरणारे मुलांमुलींचे गप्पांचे अड्डे या साऱ्यांची राहून राहून आठवण होते मला.

गेले आठ दिवस निर्वाहाची व्यवस्था करण्यांत गेले. आम्ही फर्टींग–वरून निघतांना गाडीभाड्याच्या पैशाखेरीज दिलेले म्हणजे वडिलांचे मनापासूनचे आशीर्वादच. इतके दिवस त्यांच्यावर भार टाकून तुकडे मोडले. किती दिवस त्यांच्या शिदोरीवर आपण निर्वाह करायचा ? आतांपासूनच आपल्या पायांची ताकद अजमावून पहावी म्हणून हा लांबचा फेरफटका. तिथें थोडा संकोच वाटे, परंतु या अनोळखी गांवांत फुकटच्या आढ्यतेचे, खोट्या अभिमानाचे पाश तुटल्यानें, स्वावलंबनानें, परंतु खरा स्वाभिमान न गमावितां, शिक्षण पार पाडण्याचे आणि पुढील कांहीं तरतूद करण्याचे माझे प्रयत्न चालू आहेत.

विद्यार्थ्यांतल्या ओळखीबरोबरच जरा आकस्मिकपणेंच प्रो. सुधाकर या अध्यापकांचा माझा परिचय झाला. माझी स्थिति जाणून त्यांनीं मला शक्य तें साह्य करण्याचें मान्य केलें आहे. त्यांच्या चिठ्ठीवरून कांहीं गृहस्थांच्या मीं भेटी घेतल्या, आणि दुय्यम शाळांतल्या दोन तीन शिकवण्याही मिळवल्या आहेत. नादारी नाहीं तरी निदान अर्ध–नादारी तरी मिळेल असें वाटतें.

कॉलेजजवळ सारी श्रीमंतांची वसाहत. मातीला मोत्याचें मोल–म्हणून शनवार पेठेंत एका पेशवाई थाटाच्या जुन्या वाड्यांत, तिसऱ्या मजल्या-वरील चंद्रमौळी खोलींत मीं बस्तान ठोकलें आहे. इतिहासाचार्य राज-वाड्यांची दीक्षा घेऊन स्वयंपाकाचे स्वयंप्रयोगही सुरू केले आहेत. चांगलें मनासारखें अन्न मिळून खर्चही आटोक्यांत येईल असा माझा अंदाज आहे.

इतकें असून गंमत पहा–कॉलेजमध्यें मी सांगलीकर, आणि त्यांत पटवर्धन आडनांवाचा पडल्यानें इकडचे विद्यार्थी मला खुशाल ' **राजे** ' म्हणून हांका मारूं लागले आहेत. ' नांव प्रभाकर–न मिळे भाकर ' अशीच स्थिति ही. तूं पत्रांत शंका प्रदर्शित केलीस त्याप्रमाणें शिकविण्यांत फारसा फरक दिसला नाहीं. मुख्य वैशिष्ट्य म्हणजे तिकडच्यासारखें घरगुती वातावरण नसून, इकडे जरा विशेष श्रीमंती थाट, आणि जो पहावा तो आपल्याच बेफिकीर ऐटींत चूर, असें मात्र दिसलें. काळे झगे घालून गंभीर मुद्रेनें फिरणारे प्रोफेसर–नुकत्याच संपलेल्या विद्यार्थी दशेला विसरण्याचा प्रयत्न करीत, प्रोफेसरांची ऐट आणूं पहाणारे, विद्यार्थ्यांच्या कुतूहलाचा आणि चेष्टेचा विषय झालेले नवे ट्यूटर आणि लेक्चरर, आणि स्कॉलर म्हणून प्रसिद्ध झालेले, पिंजारलेल्या केसांचे, जाड चष्मे-वाले गंभीर विद्यार्थी, हिरवे तांबडे ब्लेझरचे कोट घालून ऐटीनें फिरणारे खेळाडू, बागेच्या वाफ्यांतून एखादा रंगीबेरंगी फुलपांखरांचा थवा उडून जावा, त्याप्रमाणें इकडून तिकडे चटकन चमकून जाणारा विद्यार्थिनींचा अनेक रंगी समूह, या दृश्याचें नाविन्य कांहीं काल तरी एकाद्याला बाव-रून टाकतें.

वर्गांत काय, बाहेर काय, एक प्रकार मात्र मला कसासाच वाटला–तो म्हणजे बहुतेकांची बेफिकीर वृत्ति. अभ्यास काय, वाचन काय, खेळ काय सारेंच आपलें वर वर उडवून लावण्याकडे तिकडच्यापेक्षां इकडे कल जास्त. पानसे नांवाच्या माझ्या एक नव्या मित्राच्या रेसिडेन्सींतील खोलींत काल गप्पा मारीत बसलों असतां मी त्याला सहज म्हणालों– "कायरे, एव्हीं तेव्हीं आलों आहोंत सारे कॉलेजांत. निदान नीट अभ्यास करून इतरही साऱ्या संधींचा फायदा करून घ्यावा असें मला वाटतें. साऱ्यांनाच उंः ! म्हणून उडवून लावण्यांत काय वाटतं रे तुम्हांला ! " अगदीं सरा-

इतपणानें नाकांतून सिगारेटचा धूर सोडींत तो म्हणाला-" राजे ! तुम्ही आहांत स्कॉलर. हें तत्त्वज्ञान तुमच्या सारख्यांच्या उपयोगी—आम्हांला तें कसं पेलणार ? "—बोलतां बोलतां अधिक गंभीर होऊन तो एकेरीनें सांगूं लागला.

दोस्त ! हें तुझं शहाणपण नी उपदेश आम्हाला कळत नाहीं असें कां तूं समजतोस ? ही वरवर दिसणारी आमची बेफिकीरीची वृत्ति नुसती त्राग्याची आणि निराशेची असते हें उपदेश करणारांना कसं कळणार ? अगदीं आधळयाला वाट दाखवावी अशा आवेशानें हे आम्हाला लेक्चरें पाजतात, किंवा कधीं लेखणी हातांत धरली तर आमच्या जीवनाचीं कधीं नसतील अशीं काळीकुट्ट विकृत चित्रें काढून जगाला दाखवितात.

हें पहा ! मनुष्याच्या श्रमाचें चीज झालें तर दुप्पट श्रम करायला त्याला उत्साह येतो. पण आजच्या जगाच्या अंधेर नगरींत 'टके शेर भाजा, टके शेर खाजा' अशी स्थिति झाली आहे. त्यांत पुन्हां वशीला, जातवारी अन् बेकारी. एखादा रडत खडत थर्डक्लास मध्यें पास झालेला, कॉलेजांत साऱ्यांचे जोडे खाऊन मरतुकड्या घोड्यासारखा झालेला विद्यार्थी, वशीला नाहीं तर जातीच्या जोरावर साऱ्या फर्स्टक्लास, निदान सेकंडक्लासमध्यें पास झालेल्यावर हमखास कुरघोडी करून खुर्ची अड-वतो; आणि हाडाचीं काडें करून, क्लास मिळविलेल्यानांच त्याच्यापुढें तोंड वेंगाडावें लागतें; अशी परिस्थिति कितीकदां आम्हाला एव्हांनाच भोंवतीं दिसत आहे. तुझ्या म्हणण्याप्रमाणें अगदीं मानेवर खडा ठेवून, अभ्यास करून, गंभीर सुतकी चेहरा करून कॉलेजचे दिवस काढले, परीक्षेत वर आलों, तरी या हालअपेष्टा नी मानभंग चुकताहेत का आमच्या कपाळच्या-बोल ? आहेतच पुढें हीं दुःखें, काळजी अन् विटंबना. येऊन जाऊन हीं चार वर्षें जरा सुखासमाधानानं काढलीं, नव्या तारुण्याच्या नवलाईत उत्साहानें आनंदाने वागडलों, तर तुझ्यासारख्या अनेक अकालपोक्तांना आमचें हें क्षणिक सुख देखील पहावत नाहीं.

आतां आमच्यातले कधींकधीं मर्यादेपलीकडेही जात असतील—नाहीं म्हणत नाहीं. पण पोरस्वभाव म्हणून, आमच्या भावना, आकांक्षा, जाणून, चार सरळशब्द त्यांना सांगितले तर तेही कांहीं माणसांतून उठले

नाहींत. खरं सांगूं !—आम्हाला खरा राग येतो तो फाजील शिष्टपणाचा. आपण कुठूनतरी आकाशांतल्या बापाकडून हक्काची सनद घेऊन उतरलों आहोंत, आणि कॉलेजचे विद्यार्थी म्हणजे हुकुमाच्या काठीनें वळण्याची मेंढरें आहेत अशा अरेरावीनें जेव्हां हे शिष्ट आमच्याशीं वागूं लागतात तेव्हां मात्र मग प्रतिक्रिया म्हणून आमच्याकडूनही मर्यादाभंग होतो. बहुसंख्य विद्यार्थी पाहिले तर स्वतःच्या शिक्षणसंस्थेबद्दल त्यांना केव्हांही आदर असतो, आणि खरी विद्वत्ता, व्यासंग आणि कळकळ असणाऱ्या अध्यापकांबद्दलही त्यांना पूज्यभाव असतो."

आजच्या उथळवृत्तींचें समर्थन इतक्या खोल तऱ्हेनें करतां येईल याची मला कल्पनाच नव्हती. ही सारी कैफियत मला पटते, तरीही मला वाटतें कीं साऱ्या खेळांत अर्थच वाटत नसला तर खेळूं नये, रंगणाबाहेरच उभें रहावें हेंच उत्तम. पण एकदां खेळायला सुरुवात केलीच, तर मात्र अर्धवटपणा न करतां, सारे खेळाचे नियम पाळून आपली शिकस्त करावी. तशीच शिक्षणाची गोष्ट. आज परिस्थिति कठीण असली, श्रम करूनही अपेक्षेप्रमाणें फळ पदरांत पडत नसलें तरी मुळांत श्रमच न केल्यानें का त्याहून जास्त फळ मिळण्याची आशा आहे ?

दैववादाची उपेक्षा करण्याची आढ्यता मिळविणारा मी नाहीं हें तुला ठाऊकच आहे. अज्ञात दैवी शक्तीच्या एका फटकाऱ्यासरसे मनुष्याच्या प्रयत्नाचे सारे डोलारे एखादेवेळीं कोसळून पडलेले दिसतात हें मला कबूल आहे, परंतु ही स्थिति अपवादात्मक; नेहमींच्या व्यवहारांतली नव्हे. दैववादाच्या जोडीला प्रयत्नवाद पाहिजेच. आपण आपलें कर्तव्य अगदीं कसून, चुकारपणा न करतां करावें, परंतु नंतरचें फळ ईश्वराच्या इच्छेवर अवलंबून ठेवावें—सुखाची नेहमीं आशा करावी, परंतु पदरीं आल्यास दुःखाची तयारी असूं द्यावी; असें माझें आपलें सध्यांचें जीविताचें तत्त्वज्ञान आहे.

आपल्या तिघांपैकीं तूं तिथेंच राहिलास, मी पुण्याला आलों, तर वसंत खांबेटेनें अगदीं बडोदें गांठलें. त्याचे काका आहेत तिकडे म्हणा ! जाण्याचे दिवशीं कृष्णाकांठावरून फिरून येतांना, मावळत्या सूर्याला साक्ष ठेवून आपण तिघांनीं वचनें दिलीं होतीं कीं आपली मैत्री साऱ्या

जन्मांत कायम ठेवूं, आणि कोणी परगांवीं गेल्यास, अगदीं समक्ष बोल-ण्याप्रमाणें सविस्तर, खुल्या दिल्यानें, आडपडदा न ठेवतां नेमानें पत्रें पाठवून स्नेह कायम ठेवूं. माझ्याकडून मी हा करार पाळणार आहे हें आश्वासन मी तुला पुन्हा देतों. तूं आणि वसंत मात्र तुमच्याकडून तयारी ठेवा. वसंताचें पत्र अजून नाहीं. त्याच्या पत्त्यावर चौकशीचें एक पत्र मीं टाकून ठेवलें आहे, आणि गुजरातच्या कांहीं गमती दिसल्या तर लिहीत जा म्हणून कळविलें आहे. परक्या ठिकाणीं विरंगुळा आणि समाधान वाटण्याचे प्रसंग म्हणजे मित्रांचीं पत्रें येणें. एरव्हीं या साऱ्या उसळत्या मनुष्यसागरांत राहूनही मी कोरडाच आहे. या एकलेपणाची खंत खुल्या पत्रव्यवहारानेंच कांहीं काळ तरी दूर होते. आपण सारे तसा प्रयत्न करून पाहूंया.

तुझा स्नेहांकित,

**अरविंद.**

# ४. ‘ गरवी गुजरात ’!

सुरसागर नजीक,
बडोदें.

मित्रवर्य अरविंद

यास वसंत याचा सा. न. वि. वि.

तुझें पत्र पोंचलें. सांगलीस नारायणाला दोन पत्रें टाकलीं, त्यांचें उत्तर न आल्यानें त्याला सध्यां न लिहिण्याचें ठरविलें आहे. तुझ्या अभ्यासूवृत्तीमुळे तुझ्या पत्रांत प्रोफेसर, अभ्यास आणि लायब्ररी यांचींच वर्णनें–यांबद्दलच तूं मला विचारलें आहेस, पण मी पडलों आपला खेळाडू गडी–तेव्हां मी पहिल्यानें पहाणार नवीन कॉलेजचें क्रिकेट-ग्राउंड कसें आहे, टेनिस कोर्टें किती आहेत आणि चेंडू किती दिवसांनीं बदलतात तें.

तूं शंका दाखविलीस तितकें कांहीं बडोदें मला परकें वाटत नाहीं आतां. इकडील बऱ्याच दक्षिणी विद्यार्थ्यांची ओळख झाली आहे माझी. पहिल्यानें मात्र इकडच्या नवख्या मनुष्याची बरीच गंमत होते. एका-ऱ्याला मराठींत प्रश्न करावा, अन् मग तो ‘शूं शूं ?’ करायला लागला, अन् गुजरातींत बडबडूं लागला कीं उत्तराची भीक नको, पण उलट प्रश्नांचा कुत्रा आवर असें म्हणावेसें वाटतें. आगगाडींतलीच गोष्ट.

भल्या पहाटे ‘ विश्वामित्री ’ स्टेशनाजवळ आमची काठियावाड मेल आली होती. दूरवर झाडींतून एक प्रचंड घुमट दिसूं लागला. मी अचंबा करूं लागलों कीं ही मशीद असावी कीं देऊळ ?

डब्यांत कोणाला विचारावें तर सारी गुजराती खेडुतांची गर्दी, काठीला कोयते बांधल्यासारख्या फरशा ( त्यांना धारियें म्हणतात असें मागून कळलें ) हातांत–वेश म्हणजे आंखूड धोतर, बंड्या, चढाऊ जोडे आणि डोक्यावर गुंडाळलेलीं मोठालीं पागोटीं. बायकांचाही वेश चमत्कारिक. आंखूड गोल साड्या, त्यांतून खालीं डोकावणारा तांबडा परकर, आणि पाठीमागें बंद बांधलेल्या कुसुंबी रंगाच्या कांचोळ्या. मग शेवटीं केलाच धीर. म्हटलं एव्ही तेव्हीं आलोंच आहोंत गुजरातेंत तेव्हां करावा प्रयोग

आपल्या सांगलीच्या गुजराती ज्ञानाचा. शेजारच्या म्हाताऱ्याला विचारलं–
' हें शूं दिसतंय् ! '

पहिल्यानें तर तो नुसता आ करून पहायलाच लागला माझ्याकडे–मी मारे डब्यांतून बोट दाखवीत होतों बाहेरच्या घुमटाकडे. शेवटीं त्याच्या मनांत कांहींतरी प्रकाश पडला असावा अन् तो म्हणाला ' इ तो कालेज से. सोकरां भणे ई ' (हें तर कॉलेज आहे. मुलें शिकतात. तें) दुसरं कांहीं कळलें नाहीं मला पण आमचें कॉलेज तें हेंच असावें एवढें समजलें. मग ' हा हा ' करून वेळ मारून नेली तों बडोद्याचें स्टेशन आलेंच.

मला नवल वाटलें तें स्टेशनावरील गाड्यांचें. पुण्यासांगलीकडचे ते दोन माणसें कशी बशीं बसतील असे टांगे, आणि इकडच्या घोडागाड्या यांची तुलना करणें म्हणजे खटारी फोर्ड, आणि रोल्स् रॉइस् यांची तुलना करण्यासारखें होईल. चार माणसें आरामानें बसतील अशी मोटार सारखी, चौकोनी, आरशाच्या दाराची ही गाडी. बसायला, मागें टेंका-यला पांढरे शुभ्र अभ्रे घातलेल्या गाद्या. कडेला पितळी लखलखीत गजांना बसविलेले लंबवर्तुळ आरसे हे पाहून डोळेच दिपले माझे. दगडाचा धक्का लागला तर उतारु मागच्या मागें उघड्या जागेतून रस्त्यावर कोलमडून पडायचा असे, बसणारावर ऊन पावसाचा मारा करणारे गैरसोयीचे आपले तांगे प्रथम सुधारणेच्या रस्त्यावर नेले पाहिजेत. जी रीत गाडीची तीच रीत गाडीवानाची .आपल्याकडचा टांगेवाला म्हणजे एक ध्यान ! नेसलेल्या धोतरावरून बळेंच पोत्यासारखी कोंबलेली खाकी विजार, आणि सदरेवजा कोट–तोही मळकट आणि घामट. त्या मानानें इकडचा गाडीवाला अगदीं कलावंत वाटतो. त्याचा तो रंगीत मलमली ऐटदार फेंटा, अंगांतल्या गुलाबी नाहींतर जांभळ्या जाकिटावरून सोडून दिलेला झिरझिरीत पारदर्शक मलमली लांब शेरवानी सदरा, आणि तंग पायचोळणा पाहून फार कौतुक वाटलें मला.

दिल्लीआग्र्याकडच्या प्रचंड मोंगलशाही घुमटदार इमारतींची आठवण करून देणारें कॉलेज, कीर्तिमंदीर, तो उंचच उंच चिमणाबाई टॉवर, हें पहात पहात शहराच्या मध्यभागीं असलेल्या सुरसागर तलावाच्या कांठीं डोकावणाऱ्या आमच्या काकांच्या घरीं येऊन उतरलों.

कॉलेजमध्यें रीतसर नांव घातलें आहे, आणि खेळांची टेहळणी सुरू केली आहे. आठ पंधरा दिवसांनीं अधिक जम बसल्यावर पुन्हां पत्र लिहीन म्हणतों.

नारायणला तूं लिहिल्यास आपण सतत पत्रें पाठवून एकत्र असल्या-प्रमाणें मैत्री ठेवण्याच्या वचनाबद्दल आठवण दे. एवढ्यांतच तो आळ-सला तर सारा ग्रंथ पहिल्या प्रकरणांतच आटोपला म्हणायचा ! त्याचें पत्र आल्यावर मी त्याला लिहीन. तुझेंही पत्र सवडीनें येऊं दे. आणि हें पहा, तुझ्या त्या अभ्यासाच्या कर्म-कटकटी पुरे बुवा. तुझा दिनक्रम कसा आहे, तिकडच्या विद्यार्थ्यांच्या निवडणुकी, वादविवाद, रहाणी नव्या ओळखी, कांहीं मौज वाटण्यासारखे प्रसंग याबद्दल लिहीत जा. कारण त्यांबद्दलच मला उत्सुकता जास्त आहे.

तुझा,

वसंत खांबेटे.

# ५. चाकोरींत

हरभट रोड,
सांगली.

वसंतराव खांबेटे—

यांसी नारायणाचा सा. न. वि. वि.

आजच अरविंदाचें पुण्याहून पत्र आलें त्यांत तूं माझी विचारपूस केल्याचें त्यानें लिहिलें आहे. खरं तर या आधीच मी तुला पत्र लिहिणार होतों. होतों काय, दोन पत्रं गेलीं सुद्धां असतीं माझीं—पण माझा स्वभाव ठाऊक आहे तुला. सरळ गोष्टीला सतरा फाटे फुटावयाचे. तुझा पत्ताच जो कुठें ठेवला होता तो सांपडेना. मग काय नुसतं 'बडोदा' लिहून पत्र वावडीसारखं सोडून देऊं वाऱ्यावर ?

छोट्या भाऊबहिणींची सारी फौज गोळा करून मी अगदीं सारं घर धुंडाळून काढलं. इतर मित्रांना लिहून ठेवलेलीं, अगदीं पत्त्याच्या पाकिटा-तिकिटां—सकट माझींच दोन पत्रं सांपडलीं अडगळींत-अन् मी समजत होतों कीं मी तीं केव्हांच पोस्टांत टाकलीं, अन् उत्तर नाही म्हणून उद्धार करीत होतो त्यांचा ! जाऊं दे. शेवटीं सांगायचं काय म्हणजे तुझा पत्ता एकदांचा सांपडला—अन् तोही माझ्या कोटाच्या आंतल्या खिशांतच !

अरविंदाच्या पत्रांत तूं त्याला बडोद्याकडच्या बऱ्याच गमती लिहिल्यास असें तो कळवितो. त्यामानानें मी काय लिहिणार ? आपली सांगली म्हणजे शांतता आणि स्वस्थता यांचें सरोवर, आणि तुम्ही गेलांत खळबळीच्या अगदीं अरबी समुद्रांत !

दररोज तीन मैल वाऱ्याशीं झगडत, सायकलला टांचा घाशीत दूरच्या कॉलेजला जायचें आणि परत यायचें. एखादे दिवशीं फरक म्हणून मुंबइची ऐट आणून आमच्या सांगली—मिरज लोकलनें जाऊन यावयाचें. संध्याकाळीं हरीपूरच्या चिंचेच्या बनांत, कृष्णाबाईच्या घाटावर, नाहींतर 'तात्यासाहेबांच्या मळ्यांत' फिरून यायचें. बारा महिने अठराकाळ असा ठरावीक क्रम आहे आमचा.

अरविंदाप्रमाणें तुझ्याकडेही इकडच्या मित्रमंडळींचे डोळे लागले आहेत. परवा आपला तो चन्नबसप्पा शिवलिंगाप्पा देखील मुद्दाम येऊन मला विचारीत होता—" वसंत रायर कडेयिंद एनादरु सुद्दियु इरुवदो ? " ( वसंतरावांकडील हकीकत काय आहे ? ) इकडील तुझ्या क्रिकेटच्या पराक्रमामुळें महाराष्ट्रीयांप्रमाणें कन्नड विद्यार्थ्यांनीही तुझ्याकडे किती लक्ष्य आहे हें तुला कळून येईल. अरविंदानें अभ्यासांत, आणि तूं क्रिकेटमध्यें सांगलीचें नांव गाजवावें अशी आमची साऱ्यांची इच्छा आहे. इथेंच कोंपऱ्यात बसून तुमच्या सारख्या ' ताऱ्यांच्या शर्यती ' आम्ही पाहूं.

आमच्या निरोपाबरोबरच चन्नबसाप्पानें आणि साऱ्या कन्नडिगांनीं एक संदेश तुला लिहायला सांगितलं आहे. त्यांची नेहमीं संथा ठेवीत जा, म्हणजे क्रिकेटच्या हस्तकौशल्याबरोबर या कसरतीनें जीभ देखील ' अश्शी वळे तश्शी वळे ' अशी चपल होईल—मुद्दाम बजावून सांगितलं आहे त्यांनीं—

' नीनु निन्न उरीन अभिमानवन्नु हेच्चिसु ' ( आपल्या जन्मग्रामाची कीर्ति अढळ ठेव ).

तुझा,

**नारायण.**

## ६. वादे वादे जायते……?

शनिवार पेठ,
पुणें ता. —

मित्रवर्य वसंतराव यांसः--

तुझीं मागील दोन पत्रें मला वेळेवरच पोहोंचलीं. परंतु इकडच्या कॉलेजांतील निवडणुकीच्या ऐन भाऊगर्दीत सांपडल्यानें पत्र लिहावयास सवडच झाली नाहीं. इकडच्या निवडणुकीबद्दल तूं प्रश्न केलेस परंतु मला वाटतें कीं, साऱ्या कॉलेजांतील निवडणुकींचा प्रकार एकच ! तरीही तुझ्या समाधानासाठीं कांहीं हकीगत देतों.

गेले दोनतीन दिवस आमच्या कॉलेजमध्येंही रंगीबेरंगी कार्डांचा नुसता पाऊस पडत होता. वर्गांत प्रोफेसर आले तरी त्यांच्या डोक्यावर-सुद्धां कुठून तरी अचानक ही कार्ड-वृष्टी व्हावयाचीच. त्यांत काल म्हणजे अगदीं कत्तलची रात्र. त्या निवडणुकीसाठीं मधल्या सुट्टीनंतर कॉलेजही बंद ठेवण्यांत आलें होतें. भिंतीवरून, दरवाजावरून, बागेतल्या साऱ्या झाडांवरून उमेदवारांच्या नांवाच्या पाट्या, पताका फडकत होत्या. कोणी आपले फोटो छापून वाटले, कोणी नांवांच्या वह्या, कोणी ब्लॉटिंग पेपर, तर कोणी टाईम-टेबलें. प्रत्यक्ष मतदानाच्या वेळीं इतकी आरडाओरड कीं, कोणाला वाटावें जशी काय सशस्त्र राज्यक्रान्तीच चालली आहे आंत! ओरडून ओरडून घसा बसल्यानें, किंवा आपला आवाज कमी पडण्याच्या भीतीनेंच कीं काय कित्येकांनीं तर भले मोठे फोनोग्राफचे कर्णे आणून त्यांतून आपापल्या उमेदवारांचीं नांवें आणि गुणवर्णनें गद्यांतून आणि पद्यांतूनही चालविलीं होतीं—मतें मोजून त्यांचा निकाल बाहेर बोर्डावर लागेपर्यंत सगळीकडे उगीचच धांवपळ आणि उत्सुकतेचा गोंधळ. खोलींत आंत मतें मोजण्याची अध्यापक आणि उमेदवारांची ऐन घाई, तर त्या हॉलभोंवतीं शेंकडो विद्यार्थ्यांचा वेढा व दारावर हल्ले. शेवटीं एकदांची नांवें जाहीर झाल्यावर यशस्वी उमेदवारांनीं मित्रांच्या घोळक्यांत उपाहारगृहांचा, आणि पडेलउमेदवारांनी गुपचुप घरचा रस्ता धरला.

या निवडणुकीसाटीं उमेदवारांचीं मतें मिळविण्यासाठीं मित्रांना

पाटर्या देण्यासाठीं इतका वायफळ खर्च झालेला मला दिसला कीं, त्यांत त्यांची निदान एका टर्मची फी तरी सहज निघाली असती. कोणी जिमखाना, कोणीं लायब्ररी, डिबेटिंग, अशी खातीं हातीं घेतलीं आहेत. निवडणुकीच्या वेळीं या साऱ्या खात्यांत आतांपासून नवें सत्ययुग सुरूं होणार आहे असें हे उमेदवार भासवतात, परंतु एकदां कोणी तरी निवडून आल्यावर मागील पानावरून पुढें सुरूं, असा ठराविकपणाच त्यांत दिसून येतो.

माझ्या स्वभावाप्रमाणें इंडियन जिम्नॅशिअम, लायब्ररी आणि डिबेटिंग या खात्याकडेच माझें विशेष लक्ष आहे. परवां पहिला डिबेट मोठ्या समारंभानें सुरू करण्यांत आला आणि त्यांतच थोडासा क्षोभकारक खळबळीचा प्रसंग आला त्यामुळें माझें पूर्वीचें मत ठाम झालें तें असें.

—आपल्या आजच्या अवनतीचें एकच मुख्य कारण सांगा, म्हणून कोणीं मला विचारलें तर, एकजूट आणि शिस्तीचा अभाव हेंच मी म्हणेन. गतकालांत बेशिस्तपणें वागल्यानें या स्थितीला आपण येऊन पोहोंचलों आहोंत, तरी ही जित्याची खोड मेल्याविना जात नाहीं. अशा रीतीनें या अवस्थेतही आपल्या बेशिस्तीची बजबजपुरी चाललीच आहे. हा सारा प्रकार पाहून मला एकादेवेळीं इतका उद्वेग वाटतो, भविष्याबद्दल इतकी निराशा वाटू लागते कीं, नको हें जिणें, असा वैताग येतो. या प्रकारांचें मुख्य कारण म्हणजे कान धरून जाब विचारणारा कोणी सामाजिक शास्ता नाहीं हें एक, आणि व्यक्तिस्वातंत्र्याच्या अर्ध्याकच्या कल्पना हें दुसरें. एकदोनदां या बाबतींत मीं सहज तोंड उघडलें तों चारचौघांनीं मला दटावलेंच—'बसा गप्प, ठाऊक आहे मोठे शिष्ट आलांत आम्हांला शिस्त लावायला—आम्हांला सारें कळतें—जें योग्य वाटेल तें आम्हीं करूं. शिस्तीच्या नांवाखालीं कोणाचीही झब्बूशाही आणि दडपशाही आम्ही चालूं देणार नाहीं.'

हें सारें तुला सांगण्याचें कारण म्हणजे परवां मी भाग घेतला त्या पहिल्या वादविवाद सभेची स्थिति. '**व्यावहारिक शिक्षण विरुद्ध पुस्तकी शिक्षण**' हा विषय होता.

सभा सुरू होण्याच्या आधींपासूनच आरडाओरडीनें आणि बाकांच्या बडवण्यानें विद्यार्थ्यांनीं सारें सभागृह डोक्यावर घेतलें होतें. सभाधीटपणा यावा, व्यवहारांत शुद्ध विचारसरणी आणि वादविवाद यांचें शिक्षण मिळावें म्हणून ही संस्था. पण त्या शिक्षणाऐवजीं तसा प्रयत्न करणाऱ्या वक्त्याला शक्य तितक्या प्रकारानें त्रास देऊन, अडथळे आणून, नामोहरम करायचें, आणि स्वतः मात्र, स्वस्थ बसून त्यांतच मौज मानायची असा शिरस्ता दिसला मला. हाच काय, कोणताही समारंभ घ्या, सभा घ्या, वर्ग घ्या, शांतपणें सुतासारखा कार्यक्रम पार पाडणें हें जणूं काय पापच वाटत असतें बहुतेकांना. कार्यक्रम पसंत नसेल तर शांतपणें उठून जावें, कोणी जागेवर हात धरून त्यांना बसवीत नाहीं; पण तेंही न करतां, उरलेल्या कार्यक्रमाची शक्य तितकी नासाडी करण्यांत भूषण मानणें हीच हल्लीं टूम होऊन बसली आहे. एकादे वेळीं हें पाहून मला अगदीं निराशा वाटते. वर्गांत आम्हांला शांत शिस्तीनें बसतां येत नाहीं, एखादी सभा, नाट्यप्रयोग, भाषण, वादविवाद, उत्सव हे आमचेच कार्यक्रम आम्हांला सरळ रीतीनें पार पाडतां येत नाहींत. त्यांत सारी बेशिस्त, गोंधळ आरडाओरड आणि उर्मटपणाचें प्रदर्शन करून आम्ही जगांत आमचें हंसे करून घेतों. मग कशाला आम्ही देशोद्धार आणि समाजोद्धार यांच्या गप्पा माराव्यांत ?··· ···············पण एकादे वेळीं आशाही वाटते. असें वाटतें कीं, हा सारा प्रकार अल्लड अजाणतेपणामुळें होत असावा. द्वेषबुद्धि, खुनशीपणा किंवा अपमान करण्याची प्रवृत्ति यांत नसावी. नव्या तारुण्याचा उत्साह आणि चेतनांचा हा जिवंतपणा आहे. जिवंत पाणीच खळाळत उसळत जातें. एकादें शेवाळलेलें डबकें मात्र शांतच असायचें. या दोन्ही गोष्टींचा विचार करून शेवटीं माझें मत असें झालें आहे कीं, हल्लीं अशा स्वरूपांत व्यक्त होणारी कां होईना ती **उत्साहाची स्फूर्ति अवश्य पाहिजे, पण तिचा उपयोग विधायक कार्याच्या धडाडींत व्हावा. इतर कार्यें मोडण्यांत नव्हे.** उत्साह हा वाफेसारखा आहे. वाऱ्यावर हवा तसा इकडे तिकडे हेलावत गेल्यास त्यानें पान देखील हलावयाचें नाहीं. परन्तु तीच शिस्तवार विधायक कार्याच्या लोखंडी मंत्रांत आवरून धरला तर त्यानें एवढी प्रचंड शक्ति उत्पन्न होईल कीं, त्यायोगानें अडचणींचे

डोंगर फोडतां येतील, ध्येयाकडे वायुवेगानें जातां येईल, सारें अंधारलेलें समाजजीवन प्रकाशून टाकतां येईल. पण हें सारें होईल तो सुदिन.

हा वादविवादाचा फार्स एकीकडे सभागृहांत चालला होता, तर त्या वेळीं माझ्या मनांत वरील विचार दौडत होते. या प्रकारांचा वीट येऊन मी उद्वेगानें उठून जाण्याच्या बेतांत होतों. तेवढ्यांत एकाचें भाषण संपल्याच्या टाळ्यापडून एक विद्यार्थिनी उठून बोलावयास गेली. तिकडे असतां शहरांतील स्त्री दाक्षिण्याबद्दल मी पुष्कळ ऐकलें होतें आणि निदान आतां तरी थोडी शांतता होईल असें मला वाटलें. पण पाहतों तों प्रकार अगदीं निराळाच. ती स्टेजवर जात असतांच 'ती आली मुंबईची चौपाटी' ! म्हणून कुठूनसा तिला अहेर मिळाला आणि या बाष्कळ शेऱ्याचें कौतुक करणाऱ्या टाळ्या आणि बांकाचे आवाज यांनीं सभागृह दुमदुमून गेलें. तरीही न घाबरतां तिनें संथपणें खणखणीत आवाजांत व्यावहारिक शिक्षणाचें महत्त्व मुद्देसुदपणें मांडलें. त्या भाषणांतही कोणी कोणी कोपऱ्यांत दुसऱ्यांच्या मागें दडून कुत्र्या मांजराप्रमाणें आवाज करीत होतेच. आपलें भाषण संपवितांना तिनें अशा विद्यार्थ्यांना एक मार्मिक टोला लगाविला.

'इथें येईपर्यंत मला वाटत होतें कीं, सुसंस्कृत सुशिक्षित विद्यार्थ्यांच्या पुढें मला बोलायचं आहे, पण या सभेंत माणसांच्या बरोबरीनें कुत्र्या मांजरांचाही भरणा दिसतो, तेव्हां आणखी वेळ घेऊन या पशूंच्या क्रीडेंत मी व्यत्यय आणूं इच्छित नाहीं.'

हा टोला वर्मी लागल्यानें या कुत्र्यामांजरांचीं तोंडें बंद झालीं, पण प्रकरण मात्र चिरडीस गेलें. यांपैकीं एक गोरेमोरें झालेलें मांजर तिच्यानंतर स्टेजवर जाऊन रागानें फिस्कारूं लागलें. त्याचा बेजबाबदारपणा इतका वाढला कीं, त्यानें प्रत्यक्ष त्या विद्यार्थिनीवर व्यक्तीविषयक टीका करण्यास सुरवात केली. "तात्त्विक पुस्तकी शिक्षण आहे म्हणून तर मिस् सुधा साने इथें उभं राहून पोपटपंची किंवा मैनापंची करूं शकल्या. त्यांच्या मताप्रमाणें व्यवहारिक शिक्षणच असतें तर कदाचित् त्या माझ्या सारख्याच्या घरांत भाकरी थापीत बसल्या असत्या" !

हा असभ्यपणा ऐकतांच मला इतका राग आला कीं, बसल्या जागे-

वरूनच ' शटअप् ' म्हणून मी ओरडलों. मग सारा गोंधळ नी आरडाओरड. पूर्वीचा गोंगाट शांतता म्हणून शोभला असता त्याला. अध्यक्षांनीं घंटा वाजवून त्या विद्यार्थ्याला खालीं घालवून दिलें आणि ' टीका करावयाची असली तर वर येऊन करा ' असें ते मला उद्देशून म्हणाले. सभेला जातांना केवळ प्रेक्षक म्हणूनच मी गेलों होतों, पण इतका प्रकार झाल्यावर मात्र स्वस्थ बसणें शक्यच नव्हतें. एका चिठोऱ्यावर चार मुद्दे लिहून पुढील वक्त्याचें भाषण आटपल्यावर मीही माझें मत स्पष्ट केलें. विचार काय चार लेखांपुस्तकांवरूनच घेतले होते. त्यांपैकीं वेळेवर आठवलेले मुद्देच घेतले. संस्कृति दृष्टया तात्त्विक शिक्षणाचें महत्त्व मान्य करूनही हल्लीच्या केवळ बौद्धिक व वाङ्मयीन शिक्षणाच्या अतिरेकावर तोडगा म्हणून व्यावहारिक आणि व्यावसायिक शिक्षणाची योजना पुढें मांडली. शेवटीं जातांना मघांच्या औचित्यभंगाबद्दल नापसंती व्यक्त करून सर्वांनीं एक विचारानें, शिस्तवार रीतीनें कार्य करण्याबद्दलचे माझे विचार त्यांच्या पुढें ठेवले. उपदेश नेहमींच कटू आणि अप्रिय असतो; परंतु तसा असतांही सभेनें तो ऐकून घेतला यावरून त्यावेळे पुरता तरी तो त्यांना पटला असें मला वाटतें. शेवटीं समारोप करतांना अध्यक्षांनींही माझ्या भाषण व विचाराबद्दल पसंती व्यक्त करून उपदेशाचे दोन शब्द सुनविले.

डिबेटनंतर खोलीकडे जातांना त्या मुलीनें स्वतः माझे आभार मानून भाषणाबद्दल अभिनंदन केलें. तिचें नांव सुधा साने; ती मुंबईहून या वर्षासाठीं इकडे आली असें तिच्याकडून कळलें. इतका धीटपणा आणि मोकळेपणा मला तरी नवखाच असल्यामुळें मी अगदीं ओशाळल्यागत झालों होतों. माझ्या भाषणामुळें चिडलेल्या कांहीं विद्यार्थ्यांना ही माझ्यावर टीका करण्याची संधि मिळाली, त्यांतच त्यांनीं आनंद मानून घेतला झालं. जाउंदे—बरंच लांबलं माझं पत्र—आतां बघ, उगीच तूंही थट्टा करूं नकोस इतरांसारखी—एकदां ठरल्यावर कांहींही मागें ठेवायचें नाहीं म्हणून सारेंच पत्रांत लिहिलें आहे झालं. माझा अभ्यास, शिकवण्या, व्यायाम वगैरे व्यवस्थितपणें चालू आहे.

तुझा,

**अरविंद.**

# ७ उघडं गुपीत.

लॅबर्नम् रोड,
मुंबई.

प्रिय सुधास

सुनंदाचा सप्रेम नमस्कार.

तुझं पत्र मिळालं, आणि पुण्याचं पाणी एकंदर तुला चागलंच लागलं हेंही कळलं. अन् मला आधीं सांग कीं, तिकडच्या कॉलेजच्या गोष्टी लिहितांना अरविंद असं कांहींसं नांव लिहून चारदां खोडून तें नाहींसं करण्याचा कां यत्न केलास तें ? तूं आपल्या परीनं अगदीं खोडून नाहींसं केलंस तरी ती फ्रेनी कापडिया आहे बायॉलजीकडची, तिचं सूक्ष्मदर्शक यंत्र आणून मी हुडकून काढलं तें नांव.

इकडे मला अगदीं साळसूदपणें लिहितेस कीं, आपण अगदीं जिवा-भावाच्या मैत्रिणी, कांहीं चोरून ठेवायचं नाहीं एकीमेकींपासून—मग हा लपंडाव कांग बाई ? आतां मुकाट्यानं ते अरविंद कोण ? त्यांची कुठें भेट झाली—अन् दिसायला कसे आहेत तें सारं मला कळलं पाहिजे. नाहींतर बघ—ती अचला, लुसी अन् फ्रेनी यांना नुसतं सांगायचा अवकाश, कीं अगदीं सुतावरून स्वर्गाला जाऊन तुला पुरेसं करतील. बाकी मोकळेपणाचा आपल्या शपथेचा भाग तूं पाळलास तरच पत्रें गुप्त ठेवण्याचा भाग मी पाळणार बरं कां, सांगून ठेवतें अगदीं—

आतां सुरेशबद्दल दर पत्रांत तूं लिहितेस—त्याचीही भराभर पत्रं येऊन पडलीं आहेत माझ्याजवळ—पण त्यांपैकीं एकालाही उत्तर न देण्याचें मी ठरविलं आहे. नाहींतरी मला आतां खरोखरच राग आला आहे त्याचा. एकदां म्हटलं असेल ‘ नाहीं ’ म्हणून त्याला; पण तेंच खरं धरून चालायचं कीं काय ? एवढंही कळत नाहीं मनातलं अन् म्हणे ही स्वारी आतां बॅरिस्टर होणार ? नाहींतर येईल एखाद्या तिकडच्या मोल-

करीण नाहींतर टायपिस्ट बयाबरोबर लग्न करून--बाकी मला काय करायचं म्हणा त्याच्या बरोबर--अगदीं त्याचं नांव काढायचं नाहीं म्हणून ठरवलं आहे मी !

पण आतां तुझ्या पत्राची अगदीं उत्सुकतेनें वाट पहात आहे मी—एकदां कळूं तरी देत, आमच्या एवढ्या गंभीर 'काकू'बाईवर मोहनी घालणारे हे अरविंद कोण आहेत ते !

सुनंदा--

# ८ मित्रलाभ.

पुणें

प्रिय सुनंदा

हिला सुधाचा सप्रेम नमस्ते.

वरीच आहेस कीं ग ! इतकी पाताळयंत्री असशील तूं अशी कल्पना नव्हती माझी. तुझ्यासाठीं आमच्या कॉलेजचं नी मैत्रिणींचं जीव तोडून वर्णन लिहिलं मी. तें सारं टाकून एका खोडलेल्या नांवावरच लक्ष्य जावं ना तुझं ? चोराच्या मनांत चांदणं ! मला वाटतं, सुरेशबद्दल आपली चूक झाली हें तुला खास वाटत असलं पाहिजे. म्हणून कांहीं तरी निमित्त काढून तें विसरण्यासाठीं माझ्या वापडीमागें लागण्याचा चाळा करते आहेस तूं. पण यांत तुझ्यासारखा कांहीं प्रकारच नाहीं तर लिहायला मला कसली चोरी ? सारं सांगतें बघ—अरविंद पटवर्धन आहेत आमच्या वर्गातले विद्यार्थी; सांगलीच्या कॉलेजमधून या वर्षीच इकडे आले आहेत ते. रंगानें जरा काळेसावळेच, उंच अन् नाकेले. वेष गबाळच. स्थिति अगदीं गरीबीची. शिकवण्या करून, घरीं स्वयंपाक करून, इकडे अभ्यास करतात आणि त्याबद्दल अनेक विद्यार्थी त्यांची भरपूर थट्टा करतात. डिबेटिंगमध्यें छान बोलतात एवढं मात्र खरं.

इकडे आल्यावर एक दोन नव्हे चार आठ मुलांनीं कांहींतरी कारण काढून माझी ओळख करून घेण्याचा यत्न केला. तुझ्याइतकी फटकळ नसलें तरी मीही अगदींच कांहीं लाजाळूची वेल नाहीं, चटकन् पानं मिटून खालीं मान घालायला. अग ला कांग, अन् अरे ला कारे म्हणायची धमक आहे माझी. पण त्या प्रयत्नामागील लघळपणाचा मात्र मला राग आला. खुल्या मोकळेपणानें बोललं चाललं तर त्यांत कांहीं वाटत नाहीं मनाला, पण असली चोरटी कावरीबावरी वैषयिक वृत्ति कोणी कितीहि छपवूं गेलं तरी लक्ष्यांत येतेच माझ्या, अन् मग अशाबद्दल तिरस्कारच वाटूं लागतो. एका पुरुष—स्त्रीच्या नात्याशिवाय अशांना दुसरं नातंच ठाउक नाहीं कां ? असले भेद घडीभर विसरून जाऊन, सर्वसामान्य विचार, गोष्टींबद्दल मोकळेपणानें बोलावं, हिंडावं, खेळावं एकत्र फिरावं

असं कां वाटत नाहीं आम्हांला ? पण अशांतच कोणत्या डोळ्यांतली ती वैषयिक चोरटी छटा दिसली कीं अगदीं विरस होतो, अन् राग येतो असा कीं कुठें जाऊं नये, अन् मिसळूं नये अशा पुरुषांत. जाउंदे. रोज मोटार उडवीत येणाऱ्या अशा एका विद्यार्थ्याला इतर मैत्रिणींसमोर मी एकदां चांगल्या कानपिचक्या दिल्या, अन् त्याचा सूड म्हणून डिबेटमध्यें मी बोलल्यावर त्यानें कांहीं तरी वात्रटपणें बोलण्यास आणि माझ्यावर आडून कुत्सित टीका करायला सुरुवात केली. त्याच वेळीं या पटवर्धनांनीं ऐन वेळीं भाषण करून त्याची अशी खरड काढली कीं, अगदीं खापरासारखं तोंड झालं त्याचं. थिल्लरपणा आणि बाष्कळपणा उतू जात असलेल्या त्या सभेला त्यांच्या कळकळीच्या भाषणानें गंभीरपणावर आणून सोडलें होतें.

सभा संपल्यावर आपल्या मुंबईच्या रिवाजाप्रमाणें मी त्यांचे आभार मानून भाषणाबद्दल दोन गौरवाचे शब्द बोललें. तिकडे साऱ्यांच्या डोक्यावर मिरे वाटणारीं तूं, तुला हसूं येईल वाचून, कीं मला कांहीं संकोच वाटण्याऐवजीं मी बोलल्याबरोबर तेच अगदीं लाजून लालबुंद झाले होते—इतके कीं, मलाही त्यांच्या वृत्तीचं नवल वाटलं. स्कॉलर आहेत, लिहितात कांहीं कांहीं म्हणून कळलं. येतील हळूं हळूं माणसांत. बाकी मी म्हणतें ओळख करायचीच असली तर ती अशा भिडस्त अन् सरळवृत्तीच्या अभ्यासू विद्यार्थ्यांचीच करावी. कधीं वर मान करून पहायचे नाहींत, कीं बोलायचे नाहींत कांहींतरी वात्रटपणें आपल्या मागेंही—अन् आता खूपखूप बॅडमिंटन खेळायची सोय झाली. कारण साऱ्या अभ्यासाच्या काढलेल्या नोट्स त्यांनीं मला द्यायचं कबूल केलं आहे. नाहींतर लायब्ररींत, त्या मुलींच्या राखीव जागेंत बसून, अगदीं मानेवर खडा ठेवल्यागत तासन् तास लिहित वाचीत बसावं लागलं असतं मला. बाकी हें सीनियर वर्ष, आतां प्रकृतीचीही सबब नाहीं—तेव्हां कांहीं तरी अभ्यास करायला हवा, नाहींतर बाबा सोडायचे एखादा ' ऑर्डीनन्स् ' दिल्लीहून !—

—सुधा.

# ९ हंसा !

सुरसागर नजीक,
बडोदें.

मित्रवर्य नारायण, सांगली
यांस वसंताचा सा. न. वि. वि.

एकदाचें तुझें पत्र पोंचलें. माझ्या पत्त्याची शिकार करतांना अगदीं चित्त्याची शिकार करण्याइतके श्रम पडले ना तुला ? जाऊं दे. माझी बातमी विचारून, तिकडील कानडी उपदेशाचे घुटके पाजलेस तूं मला, मात्र तुझ्याकडील फारशी हालहवाल लिहिली नाहींस. इकडच्या " भाइशाब " च्या गुजराथी प्रदेशांत तुझ्यासारख्या मित्रांचीं पत्रें म्हणजे वाळूंतली हिरवळ वाटते मला.

एक जातीचीं पाखरेंच एकत्र जमतात अशी म्हण आहे, तसेंच झालें आहे माझें. प्रथम इकडचें तें प्रचंड आग्रेशाही घुमटांचें, रंगीबेरंगी विटांचें आणि दगडांच्या प्रकारांचें कॉलेज पाहून माझा जीवच दडपून गेला. ते अंधारलेले वर्ग, कलाकुसरीच्या कांतीव कोरीव जाळ्यांच्या खिडक्या, आणि अवाढव्य विस्तार पाहून कोणीही गोंधळून जाईल. युरोपियन, मुसलमानी आणि हिंदु अशा तीन्ही तऱ्हेच्या स्थापत्याच्या पद्धतींचें मिश्रण म्हणजे आमचें कॉलेज. त्या प्रचंड जुनाट मशीदीसारख्या नवख्या इमारतींतून मी प्रथम एकटेपणाच्या हुरहुरीनें भारावून हिंडत असे, पण शेवटीं माझ्या क्रिकेटनेंच हात दिला आणि आतां खेळाडूंच्या कंपूंत चांगलाच मिसळून गेलों आहें मी. प्रथम तुच्छता, नंतर जरा लक्ष्य-नंतर कुतूहल—टीका आणि नाखुषीची प्रशंसा अशा चढत्या उतरंडी ओलांडून गेल्यामुळें पहिल्या सामन्यांत मला संधि देण्याचें आमच्या कॅप्टन्नें कबूल केलें.

आपल्या सांगलीकडे जसे आपोआप कर्नाटकी आणि महाराष्ट्रीय गट पडतात, तसे इकडे गुजराती आणि ' दक्षणी ' ( महाराष्ट्रीय ) असे गट पडतात. आतां यांत पूर्वीइतकें ' अहिनकुलम् ' राहिलें नसलें तरी अजून तुटकपणा आणि गैरसमज डोकावतोच. मला टीममध्यें जागा मिळूं नये म्हणून खटपट करून कांहीं गुजराती खेळाडूंनीं जितका मनाचा

हलकेपणा दाखविला तितकाच दिलदारपणा आमच्या गुजराती कॅप्टन् देसाईनें मला जागा देऊन दाखविला. कालच इकडच्या हिंद विजय जिमखान्याशीं आमची या वर्षाची पहिली मॅच् झाली. वशिल्यानें टीममध्यें शिरलेले बरेच शिराळशेट त्यांनीं काढलेल्या भोपळ्याप्रमाणेंच गडगडत गेले. बाकीचे गडी, मी, आणि देसाई यांनीं कशीबशी बाजू सांवरून धरून सामना अनिर्णित ठेवला. साठ धांवा काढून आणि सहा बळी घेऊन मी आरंभ तर ठीक केला असें वाटतें. सामना संपल्यावर 'खाडिया पोळ' मधील आपल्या घरीं देसाईनें मला मुद्दाम बोलावून नेलें आणि आपली टीम शील्ड मॅच्साठीं कशी बळकट करतां येईल, रुसून टीमबाहेर राहिलेले चांगले खेळाडू कसे वळवून घेतां येतील याबद्दल पुष्कळ चर्चा केली.

त्या खेळाडू भावाची खेळाडू बहीण ही देखील जरा दूर बसून आमचें बोलणें ऐकत होती. तिची ओळख करून देतांना गेल्या वर्षीच मुंबईचें चौपाटी कॉलेज सोडून या वर्षी ती इकडे आल्याचें त्यानें सांगितलें. अरविंदाच्या पत्रांत मुंबईहून आलेल्या सुधा साने या विद्यार्थिनीशीं ओळख झाल्याचें त्यानें ओझरतें लिहिलें होतें. मुंबईच्या कॉलेजचा प्रश्न निघाल्यानें सहज मी तिचा उल्लेख केला तर ती लांबून अगदीं धांवतच आली ! सुधा, आणि ही हंसा देसाई गेल्यावर्षी मुंबईच्या चौपाटी कॉलेजला बरोबरच होत्या आणि त्यांची चांगली मैत्री होती म्हणून तिनें सांगितलें. अशा रीतीनें पहिला परकेपणा मोडल्यावर आम्ही तिघेही बराच वेळ गप्पा मारीत बसलों होतों. मुंबईत राहून महाराष्ट्रीय मुलींत मिसळल्यामुळें तिला मराठी चांगलेंच बोलतां येतें. त्या प्रदर्शनाचीही चांगली हौस फेडून घेतली तिनें. ती इकडे इंटरमध्यें असून तिला क्रिकेट मॅचेस् पहाण्याचें फार वेड आहे. अगदीं सराइतपणानें तिकडच्या आणि इकडच्या क्रिकेट पद्धतीबद्दल, प्रसिद्ध खेळाडूंच्या खेळाबद्दल तिनें मला मार्मिक प्रश्नही विचारले. शेवटीं आमची गप्पांची बैठक संपली आणि 'आवजो, आवजो !' (यावें यावें) च्या दुहेरी ललकारींत आमची स्वारी धर्मराजाच्या रथासारखी जमीनीच्यावर वीतभर हवेंतून चालल्या इतक्या उत्साहानें परत आली. —वसंत.

## १० "वडाचें झाड !"

हरभट रोड,
सांगली.

मित्रवर्य अरविंद यांसी

नारायणाचा नमस्कार वि. वि.

आपल्या "वडाचें झाड" या नांवाच्या स्टेशनजवळच्या गप्पांच्या क्लबमध्यें मीं तुझें मागचें पत्र मित्रांना वाचून दाखविलें, आणि त्या साध्या वर्णनानेंच हुरळून इकडील बऱ्याच मित्रांचीं विमानें वर चढलीं आहेत. आपला कोटणीस तर दुसऱ्या टर्मला तिकडेच जाईन म्हणत होता, पण मी म्हटलें 'आस्तेकदम', सारेच आमच्या अरविंदासारखे भाग्यवान् नसतात पहिल्याच हल्ल्याला तिकडचा गड सर करायला.

पण संभाळ हो ! पुण्याचें पाणी कधीं कधीं दारूसारखी निशा आणतें असें मी ऐकलें आहे. आल्यागेल्याकडून तुझे वडील तुझी नेहमीं चौकशी करीत असतात. तूं स्वावलंबनानें आपली सोय लावून घेतलीस म्हणून फार अभिमान वाटतो त्यांना---आणि आपलें सांगून ठेवतों---परीक्षा आटपल्यावरोबर तुझें शुभमंगल उरकून घ्यावें म्हणून फावल्यावेळीं पत्रिका चाळायला देखील त्यांनीं सुरुवात केली आहे. ओघानेंच आलें म्हणून सांगतों. वसंत खांबेटेच्या पत्रांतून दोन बातम्या कळल्या. एक म्हणजे तूं माझ्यापासून चोरून त्याला मात्र कळविलेली बातमी---कोण सुधा नांवाच्या मुंबईहून आलेल्या मुलीशीं तुझी ओळख झाली ही. दुसरी म्हणजे हंसा नांवाच्या गुजराती मुलीशीं वसंताची नवी ओळख झाली ही. अरे बाबा ! ओळख 'साधी' असली तरी कशी वेळ साधील याचा नेम नाहीं. वसंताबद्दल मी कांहींच म्हणत नाहीं. कारण तो पडला स्पोर्टसूमन्, सगळीकडे ऐटीनें मिरवण्याची संवय लागलेली त्याला. अन् भावनाप्रधान इतका कीं घड्याळाच्या लंबकाप्रमाणें आशा आणि निराशा, प्रेम आणि शत्रुत्व, आनंद आणि विचार, मैत्री आणि अबोला यांमध्यें पहातां पहातां इकडून तिकडे भर्कन हेलावणारा. कोणतीही साधी गोष्ट घेतली तरी अतिरेक करायचा, आणि मागून कंटाळा आला, नाहींतर ठोकर बसली म्हणजे

ती पार फेंकून द्यायची असा त्याचा स्वभावच ठाऊक आहे मला. म्हणून त्याला मी कांहींच लिहित नाहीं या बाबतींत. पण तूं मी—आपण आपले साधे भोळे कृष्णाकांठचे पडलों, अन् ती सुधा आहे चौपाटीवरल्या शहाळ्यांचें पाणी प्यालेली. म्हणून आधींच इशारा देऊन ठेवतों; बाबा रे सावधान !! त्यांत मला नवल वाटतं तें हें कीं, कॉलेजांत तर राहू देच पण कृष्णाबाईच्या घाटावर देखील, आमच्या शेजारच्या वाड्यांतल्या मुलींशींही कधीं बोललों नाहीं आम्ही—अन् तुमच्याच कशा अशा अनोळखी मुलींशीं ओळखी होतातरे? त्यांच्याशीं इतक्या गप्पा तरी कसल्या मारतां तुम्ही याचंच मला नवल वाटतं. जाऊंदे. तुझ्यावर किती जबाबदारी आहे तें लक्ष्यांत असूं दे. आपला चन्नबसप्पा म्हणतो त्याप्रमाणें 'नीनुवळ्ळे यिंप्रेशन होडि' ( छान छाप बसवली पाहिजेस तिकडे ) फर्स्टक्लास न चुकला पाहिजे बघ.

तुझा,

**नारायण.**

# ११ राजवाड्यांची दीक्षा,

शनिवार पेठ,
पुणें.

मित्रवर्य वसंतराव

यांस अरविंदाचा सा. न. वि. वि.

तिकडच्या कॉलेज आणि विद्यार्थीजीवनाबद्दलचें तुझें चटकदार पत्र पावलें. तें वाचून अगदीं नवीन सृष्टींतच गेल्यासारखें वाटतें. विशेषतः आमच्या सारख्या सदाशिवपेठी जीवन जगणारांना तूं वर्णन केलेलें जीवन आणि व्यक्तिप्रकार नाविन्यपूर्ण वाटतात.

इतकीं वर्षें अगदीं जवळ राहूनही आपल्या गुजराती बंधुभगिनींच्या जीवनाबद्दल आपल्याला कितीशी माहिती आहे?—आणि नसली तर मिळविण्याबद्दल उत्सुकता तरी कितीशी दिसते? आपल्या वाङ्मयांतही तोच प्रकार. टीचभर महाराष्ट्रांत, त्यांतल्याही इवल्याशा सुशिक्षित पांढर-पेशा वर्गापुरतेंच रिंगण आंखून घेऊन त्यांतच आमचा सारा कलाविलास-चालायचा. बडोदेंच कशाला? डोळे उघडून पहाणाऱ्याला खुद्द पुण्या-मुंबईतही, भर पांढरपेशा वस्तींत, गुजराती, प्रभु, मारवाडी, बोहरी, मराठा, मुसलमान, पंजाबी, मद्रासी, देशी खिस्ती, यहुदी, अस्पृश्य असे अठरापगड जातींचे लोक अगदीं घराला घरें लागून राहतात, पण त्यांची ओळख करून घेऊन, सहानुभूतीनें समरस होऊन, त्यांच्या जीवनांत डोकावून पहाण्याची तसदी आम्हीं घेतली आहे कां? परदेशांत, परप्रांतांत गेलों तरी आम्ही आमची तुटक वृत्ति कायम ठेवतों, आणि आपल्या पुरता टीचभर महाराष्ट्रच तिथेंही आपल्या भोंवतीं तंबूसारखा उभारून ठेवतों. मग आमचा अनुभव, आणि त्याचें प्रतिबिंब म्हणजे आमचें वाङ्मय ठराविक आणि कायम कृत्रिम ठशाचें होत चाललें आहे अशी ओरड करण्यांत काय अर्थ? ही कोंडी फोडून तूं बाहेर गेलास याबद्दल मला आनंद वाटतो.

तुझ्या पत्रांतील हंसाबद्दलची खाजगी माहिती अर्थात् मी माझ्या-जवळच गुप्त ठेविली आहे. तिची आणि सुधाची, फार दाट नसली

तरी बऱ्यापैकीं ओळख आहे. हंसाबद्दल सुधाकडून मिळालेली माहिती या पत्रासोबत बंद करून पाठविली आहे. त्यानें तिचा स्वभाव कळून कसें वागावें याची थोडी दिशा तुला कळेल. कांहीं म्हटलें तरी इतकें सुशिक्षित होऊनही अजून आपल्या मनांतला संकोच जात नाहीं हें खरें हेंच याचें उदाहरण. प्रत्यक्ष व्यक्ति समोर असून तिला सरळ न विचारतां शंभर कोसावरून दुसऱ्याकडून तिची तिच्या स्वभावाची माहिती विचारावी हें जरा चमत्कारिकच नव्हे ? पण तसे सरळ प्रश्न टाकणें गैर दिसतें हें एक, आणि घटकाभर बोलून निघून जाऊन जी माहिती आपल्याला मिळेल तिच्यापेक्षां अष्टौप्रहर संगतींत रहाणाऱ्या मैत्रिणींची माहिती अधिक तपशीलवार असते हें दुसरें. हंसाबरोबर बोलतांना सहज सुधाबद्दल, तिच्या स्वभावाबद्दल वगैरे माहिती मिळाल्यास मला कळीव.

तूं माझ्या इकडील दिनक्रमाबद्दल माहिती विचारली आहेस. त्यांत कांहीं विशेष आहे असें मला वाटत नाहीं. फक्त स्वावलंबनानें धडपड करून, होतां होईतों कोणाचीही फुकटची मदत न घेतां शिक्षण पार पाडावयाचें अशा माझ्या ध्येयाप्रमाणें माझा कार्यक्रम मी आंखला आहे एवढेंच.

शनवार पेठेंतल्या तिसऱ्या मजल्यावरच्या माझ्या चंद्रमौळी मठींत पांच वाजतां माझ्या अलार्मचा कोंबडा आरवूं लागतो. मी स्नान करून ठरावीक वाढत्या संख्येचे नमस्कार घालतों. क्रिकेट, टेनिस, डंबेल्सचा तूं भोक्ता, तुला कदाचित् या माझ्या जुन्या पद्धतीच्या व्यायामानें हंसू देखील येईल. त्यांत कोणत्याही धार्मिक बाबतीबद्दल थट्टा करणें ही हल्लीं फॅशनच झाली आहे हें देखील माझ्या लक्षांत आहे. पण धार्मिक बाजू सोडून दिली तरी माझ्या सारख्या अगदीं गरीबालाही थोडक्या वेळांत, बिनखर्चानें सर्वांगीण व्यायाम होण्यासाठीं नमस्कारासारखा दुसरा प्रकार नाहीं हें मी अनुभवानें सांगतों. त्यानंतर नेमानें माझें स्वतःचें कांहीं तरी स्वतंत्र लेखन करतों.

सकाळीं आठ वाजतां पर्वतीच्या बाजूच्या एका बंगल्याकडे मला शिकवणीसाठीं जावें लागतें, त्यानें सकाळची सहल ही सहज पदरांत पडते.

त्यानंतर घरीं येऊन दुपारीं कॉलेजमध्यें होणारा अभ्यासाचा भाग मी आधींच वाचून ठेवतों.

कॉलेज मधल्या भरधांव व्याख्यानांतून चाललेल्या अभ्यासाबरोबर आपल्याला दौड करतां येत नाहीं आणि नंतर पाठलाग करूं म्हटलें तर तो केव्हांच समजण्याच्या टप्प्यापलीकडे गेलेला असतो असें माझे बरेच मित्र नेहमीं म्हणतात. परंतु झालेल्या अभ्यासामागें धांपा टाकीत पळण्याऐवजीं आधींच त्याच्यापुढें चार पावलें सामोरें जाऊन, नंतर त्याच्याबरोबर जाणें हाच उपाय मला खात्रीचा वाटतो. स्वतः प्रयत्न करून शक्य तितका भाग समजून घ्यावा, आपल्याला दुर्बोध वाटणाऱ्या भागांवर खुणा करून घ्याव्यात आणि वर्गात तो भाग आला म्हणजे विशेष लक्ष्य द्यावें. त्यांतूनही कळलें नाहीं आणि अध्यापक तसेच पुढें चालले तर खुशाल उठून 'वन्समोर' द्यावा. प्रश्न विचारला तर खात नाहींत ते···त्यांचें कामच आहे हें. पण अशा शंका विचारण्याचा बहुतेकांना कंटाळाच असतो असें मला दिसतें. प्रथम लहान लहान दिसणारीं हीं शंकास्थळें सांठत सांठत जाऊन वर्षाचे शेवटीं मात्र डोंगराएवढी वाढतात आणि त्यांच्या धास्तीनेंच परीक्षेआधीं विद्यार्थ्यांचा अर्धाजीव होतो.

मी राजवाड्यांची दीक्षा घेतली आहे हें मागें लिहिलें होतें असें वाटतें. खाणावळ बोर्डिंगांत पंधरा रुपये देऊन, पानावर पडेल तें मुकाट्यानें खाणाऱ्या विद्यार्थ्यांना कल्पनाही नसेल कीं केवळ सात आठ रुपयांत आपल्या मनाप्रमाणें रुचीप्रमाणें महिनाभर सकस असें जेवण मिळूं शकतें म्हणून. शिकवणीला जातांना शेगडी पेटवून माझ्या छोट्या ॲल्युमिनीयमच्या कुकर-मध्यें तांदूळ, डाळ, गुळ, बटाटे वगैरे टाकून मी जातों. तासानें परत आलों कीं माझी ही **द्रौपदीची थाळी** सारा स्वयंपाक उत्कृष्ट रीतीनें तयार करून पुढें ठेवते. पोळीची जरा अडचण भासते आणि तिच्यासाठीं वेळ मोडे, पण आतां बरेच वेळ कुकरमध्येंच मी कणीक नाहींतर बाजरीच्या पिठाचे गूळ किंवा तूप मीठ घालून मुटकुळेच टाकतों आणि तेही वाफे-वर शिजून फार रुचकर तयार होतात. घरीं आल्यावर एखादी स्वस्तशी

कच्ची कोशिंबीर चिरून तयार केली कीं झाली आमची तयारी. संध्याकाळीं वेळ असल्यास एखादा अधिक जिन्नस केला कीं थोडक्यांतच मेजवानीची विविधता येते. अगदीं थोडक्या खर्चांत खात्रीचें सकस अन्न मिळून प्रकृति खणखणीत रहाण्याचें हेंच रहस्य मीं शोधून काढलेलें आहे.

चार वाजतां कॉलेज सुटल्यावर तास दीडतास दोन दुकानांतले जमाखर्च, पत्रव्यवहाराचें काम आटोपलें कीं मग मी मोकळा. ग्राउंडवरचे देशी खेळ किंवा लांबवर मित्राबरोबर सहल यांत मजेनें वेळ जातो. रात्रीं पुन्हां अभ्यासावर नजर टाकून टिपणें करून घेतों. आणि मग एखादें लायब्ररींतील नवें मराठी पुस्तक करमणुक म्हणून झोंप येइपर्यंत चाळीत पडतों. हा माझा दिनक्रम.

तूं विचारलेस म्हणूनच मी हा तपशील दिला आहे. कदाचित् तो वाचून तुला हंसूही येईल. परंतु त्याबरोबर हेंही लक्ष्यांत असूं दे कीं, फाजील शिष्टपणा करून दुसऱ्यांना उपदेश करण्याचीही माझी इच्छा नाहीं, किंवा सर्वांनींच संन्याशासारखें रुक्ष जीवन कंठावें असेंही माझें मत नाहीं. अनुकूल परिस्थिति असली तर सुखोपभोगही घ्यावेत; परंतु ते न मिळाल्यास मात्र जीव जळजळूं नये इतपत मनाची तयारी असावी असें मला वाटतें.

क्वचित्प्रसंगीं मी चहाही घेतों. एखाद्या लेख, कथेचे अथवा इतर कामाचे जादा पैसे मिळाले तर एखादा चांगला बोलपटही पाहून येतों. नेहेमींच्या अन्नानें अगदींच तोंड मातकट वाटूं लागलें तर सवड पाहून एखाद्या स्वच्छ रेस्टॉरांमध्यें क्वचित्प्रसंगीं फराळही करून येतों.

जगांतल्या अडचणी, दुःखें, धडपड, यातायात—साऱ्यांच्या मागें आहेतच. त्यांत असलीं छोटीशीं विसाव्याचीं सुखें अगदीं फाजील सोंवळेपणा दाखवून त्याज्य मानावींत असें मी मानीत नाहीं. परंतु हीं केवळ तोंडी लावण्यासारख्या प्रमाणांत ठेवावींत. नुसतीं तींच आहारून टाकूं—इतर कांहींच नको म्हटलें तर मात्र तें चुकीचें होईल. या गोष्टी नसल्यास त्यांवांचून व्यसनाप्रमाणें मनाला चैनच पडत नाहीं अशी

स्थिति येणार नाहीं ही खात्री करूनच मग मात्र मी या मार्गांत पाऊल टाकतों. एवढेंच माझें स्वतःचें वैशिष्ट्य, दुसरें कांहीं नाहीं.

इकडील रेसिडेन्सीमधील विद्यार्थ्यांच्या जीवनाबद्दल तूं आणि नारायण या दोघांनींही फार कुतूहल दाखविलें आहे. पण आतां त्याबद्दल मी लिहीत नाहीं. तुमच्या प्रश्नांच्या रोखावरून या जीवनाबद्दल तुमचे बरेच गैरसमज असावेत अशी मला शंका येते. पानसे नांवाच्या मित्राच्या खोलीवर बरेच वेळां राहून मी बराच अनुभव घेतला आहे. त्याबद्दल तिकडील मंडळींशी चर्चा करून नंतरच सारी माहिती तुला लिहीन—

—अरविंद

## १२ सुधा आणि हंसा.

मुरसागर नजीक,
बडोदें

मित्रवर्य अरविंद यास

वसंताचा मा. न. वि. वि.

बरेच पाताळयंत्री बनत चाललों कीं आपण! बी. ए. झाल्यावर दुसरा उद्योग नसला तर खाजगी डिटेक्टिव्ह बनून दुसऱ्यांचें चौकशीखातें उघडायला कांहीं हरकत नाहीं. हंसाबद्दल सुधा सानेकडून काढून घेतलेली माहिती पाठविलीस या बद्दल आभारी आहे. बाकी तिनें हंसाला 'लहरी, चंचल, नाविन्यप्रिय, म्हणून जीं नांवें ठेवलीं आहेत तीं मात्र मला पटत नाहींत. गेल्या महिन्यांतल्या परिचयावरून तरी तिचा खुला स्वभाव, आणि प्रेमळ वृत्ति या योगानें माझें मन तिच्याकडे अधिकाधिक ओढ घेऊं लागलें आहे. आतां तूं दिलेल्या बातमीची परतफेड करायची म्हणून हंसाजवळ मीं बोलणें काढल्याबरोबर तिनें मला चांगले अर्धा तास सुधा-रसांतच बुचकळून काढलें, इतकें वर्णन केलें तिचें.

दिसायला ती कशी आहे हें माझ्यापेक्षां तुलाच चांगलें माहीत आहे. हंसाच्यामतें स्वभावानें ती जरा अबोल वाटेल, पण ती परक्यालाच. एकदां तुझ्यासारख्याची तिची दाट ओळख झाली, आणि परकेपणाचे पडदे बाजूला झाले तर तिच्यासारखी मधुभाषिणी नाहीं. स्वभावानें अगदीं करारी. तिच्या बाबतींत आपली पुरुषी म्हण वापरतां येत नाहीं म्हणून 'वेणी तुटो, कीं पारंबी तुटो' अशी एक नवी म्हण तयार करून तुला तिची कल्पना करून देणें भाग आहे. खोल अशी कीं मनांत महासागर हेलावत असला तरी चेहऱ्यावर तरंगसुद्धां दिसायचा नाहीं. लहानपणींच आई वारल्यानें वडिलांच्या विधुर संसारांत वाढलेली, आणि मुलगी असूनही आईच्या अभिमानानें त्यांच्यावर मायापाखर घालणारी. वेळ आली तर त्यांच्यासाठीं साऱ्या जगावर लाथ मारील. बोलतांना 'माझे बाबा, माझ्या बाबांना अमुक आवडतं अमुक वाटतं.' म्हणून मधून मधून उच्चार व्हावयाचाच. हंसाला तुझ्या

सुधेनें 'चंचला' नांव दिलें तर तिनें सुधाला 'अचला' हें नांव दिलें आहे. तुला जर तिचें प्रेम लाभलें तर जन्माचा सुखी होशील. पण एकदां जर तिच्या मनांत आढी पडली तर मग जन्मभर झगडलास तरी तिचा सळ मोडणार नाहीं. असें तुझ्या सुधाचें स्वभावचित्र हंसानें सहज रेखाटलें आहे. पहा तुला पटतं कां तें.

आमचें हंसा प्रकरण मात्र इकडे बरेंच रंगणार असं मला वाटूं लागलं आहे. कधीं कधीं आम्ही कॉलेजच्या व्हरांड्यांत एकत्र बोललों, हंसलों, तरी तिच्या गुजराती मित्रमैत्रिणींच्या कपाळावर आठ्यांचीं जाळीं चढूं लागतात. माझ्याबद्दल तिचें मन कलुषित करण्याचेही बऱ्याच—जणांचे कीं जणींचे— प्रयत्न चालले आहेत असें समजतें. कांहीं कांहीं तिच्या मैत्रिणी तर आतां पासूनच तिला टाकून फटकून दूर राहूं लागल्या आहेत.

एकराष्ट्रीयत्वाच्या आणि पोटजातींच्या एकीकरणाच्या तात्विक गप्पा सारेच मारतात, परंतु प्रेम किंवा लग्न तर राहोच, पण नुसत्या मैत्रीच्या कल्पनेनेंच आपल्या जुन्या राखीव जातीयवृत्तीला किती चेव येतो याचें चांगलें उदाहरण तुला इथें पहायला सांपडेल.

तुला कदाचित् नवल वाटेल, परंतु माझा अनुभव आहे कीं, या साऱ्या उपद्व्यापाचा परिणाम बरोबर उलट होत चाललेला आहे. मुद्दाम मनाई केली कीं तिकडेच प्रवृत्ति व्हावी असा मनोधर्म आहे. यापूर्वी बेफिकीरपणें इतरांबरोबर माझ्याकडेही एखादाच शब्द फेकणारी हंसा, या टीकेनें चिडून, हट्टाला पेटून, मुद्दाम त्या सर्वांच्या देखत माझ्याशीं घटका घटका बोलत उभी रहात असते—एकूण या कोल्हेकुईमुळेंच आमच्या साध्या मैत्रीच्या भावनेचें रूपांतर प्रतिक्रिया म्हणून प्रेमभावनेंत होईलही —न जाणों—आणि तसें झालें तर मगच कळेल कीं हें तिचें नुसतें वरपांगीं तऱ्हेवाईकपणाचें अवसान आहे, कीं खरोखर संकुचित मनोवृत्तीच्या समाजनिंदेला धुडकावून लावण्याचें मनोधैर्य तिच्यांत आहे तें—

बाकी सारें ठीक असलें तरी आपल्या मित्रमंडळींतून उठून एकाएकीं इकडे आल्यानें मधून मधून फार उदासवाणें वाटतें. एक जागचें रोपटें उपटून दुसरीकडे लावलें म्हणजे पुन्हां मूळ धरीपर्यंत तें मलूल होणारच. विशेषतः संध्याकाळच्या वेळीं फार खिन्नता येते. तुझ्यासारखा लेखक

असतों तर एखादी कविता नाहींतर लघुकथा खरडली असती या अनुभवावर. पण माझ्यांत नुसत्या ओल्या भावना आहेत, त्यांना कलेचें वळण लावणारी विचारांची शक्ति नाहीं हें माझें मलाच ठाऊक आहे.

एवढा बेचैनीचा प्रकार सोडून दिल्यास आमचें घर आणि वातावरण अगदीं तुझ्या चोखंदळ वृत्तीलाही पटेल असें आहे. आतांच पहा—शहराच्या मध्यभागीं असलेल्या सुरसागराचें निळें पाणी हेलावतांना माझ्या समोरच्या खिडकींतून दिसत आहे. त्याच्या पलीकडील कांठावरून सरकारी संगीत शाळेतल्या सारंगीच्या वर्गाचे एकवटलेले तालबद्ध सूर येत आहेत. दुरून 'तारकेश्वरा'च्या देवळांतल्या चौघड्याचे गंभीर ध्वनि ऐकूं येत आहेत. आकाशांत वीज सळसळत जावी तशी तिरप्या रांगेनें सुरसागराच्या कांठानें विजेच्या दिव्यांची रांग प्रज्वलित होऊन पळत जात आहे. मनांतली हुरहुर कमी करण्यासाठीं संभाषणाऐवजीं हें पत्र तुला लिहीत बसलों आहे. नाहींतर खुषींत असतों तर क्रिकेटच्या ग्रांऊडवर नाहींतर टेनिसकोर्टावर असतों मी. नारायणकडील कांहीं कमीजास्त कळल्यास मला लिही.

तुझा,
वसंत

१३

INDIAN POST AND TELEGRAPH.

Express

Delhi—Ex. 10-4.

| TO | SUDHA | SANE | POONA | COLLEGE. |
|---|---|---|---|---|
| GAJANANARAO | | SANE | SERIOUSLY | ILL |
| MAYO | | HOSPITAL | START | ANXIOUS |
| | | | ASHOKA | |

दिल्ली

तार—जरुरीची—

गजाननराव साने फार आजारी असून मेयो हॉस्पिटलमध्यें आहेत. लवकर निघा. काळजी लागली आहे.

—अशोक.

# १४ उन-सावली.

चांदणी चौक,
दिल्ली

प्रिया सुनंदा

हिला नमस्ते. वि. वि.

चार कागद फाडतें मी, काय लिहूं अन् कसं लिहूं हेंच समजत नाहीं मला. मनुष्य फार सुखांत असला म्हणजे देवांनाही त्याचा मत्सर वाटूं लागतो, आणि त्याच्यावर कुठून तरी संकटें येतात, अशी कल्पना मी वाचली होती-तीच पटायला लागली आहे मला आतां. मागचं पत्र किती आनंदांत आणि उत्साहांत टाकलं होतं तुला! त्या वेळीं अगदीं कल्पनाही नव्हती कीं हें पुढचं रडवं उदासवाणं पत्र तुला इतक्या लांबच्या दिल्लीसारख्या ठिकाणाहून पाठवीन म्हणून.

एकाएकीं बाबा फार आजारी असल्याची तार आली, आणि मला इथें तातडीनें निघून यावें लागलें. आठ दिवस झाले त्याला. अजून ते हॉस्पीटल मध्येंच असले तरी आतां जीवाची भीति नाहीं असं डॉक्टर म्हणतात.

पण मला कससंच वाटतं तें दुसऱ्याच गोष्टीचं. मला आलेल्या तारेवर अशोक अशी सही होती. मी इथें आल्यावरच पाहिलं त्या स्वारीला. विलायतेला जाऊन आलेले एक फेल्ड-आय्. सी. एस्. आहेत ते. बाबांच्या खात्याचे मुख्य म्हणून इंपीरीयल सेक्रेटरीएटमध्यें आहेत, पण थाट पहावा तर गव्हर्नराच्यावर. एवढे मोठे अधिकारी आपल्याबद्दल इतका आपलेपणा दाखवून व्यवस्था विचारपूस करीत आहेत, यानेंच बाबांना स्वर्ग दोन बोटें उरला आहे. इतके अनुभवी, जगांत मुरलेले, व्यवहारी पुरुषः पण दुसऱ्यांच्या वागण्यामागचे हेतु त्यांना कळूं नयेत ? दुसऱ्यांच्या घरांत चाललेल्या प्रकाराबद्दल अगदीं पाताळयंत्रीपणानें ते चौकशा करून छडा लावतील. आपल्यावर पाळी आली म्हणजे मात्र त्यांचा हा सारा धूर्तपणा कामाला येत नाहीं असं दिसतं. मी मात्र आल्यावर पहिल्या नजरेतच त्यांची वृत्ति ओळखली.

माणसांनीं शब्दांच्या बुरख्याखालीं आपले मनोविकार कितीही लप-विले तरी ते त्यांच्या डोळ्यांच्या जाळीदार खिडकींतून डोकावतातच. सारा वेळ अगदीं आस्थेचं सोंग आणून ' वेल् सुधाबाई–वेल् सुधाबाई ' म्हणून माझ्या मागें असतात ते. दिल्ली फोर्ट पुन्हा पाहून येऊं. आमचं व्हाइसरॉय हाउस आंतून दाखवितों तुम्हांला, म्हणून सारखा त्रास देत होते मला. मग शेवटीं निक्षून सांगितलं त्यांना कीं ' बाबांना बरं वाटल्या-वर आपण सारेच जाऊं पहायला म्हणून. ' अन् मग स्वारीनं जें आंबट तोंड केलं, तें पाहून मला वाटलं कीं माझी सुनंदा इथें कॅमेरा घेऊन असती तर चढाओढीसाठीं एक स्नॅप घेऊन पाठवून दिला असता तिनं.

कोण जाणे कां ! इतक्या पाहाण्यासारख्या जागा असूनही माझं पाऊलच उचलत नाहीं. हॉस्पिटलमध्यें नाहींतर सुन्या घरांतल्या सज्जांत कुठें तरी पहात, नाहींतर घरांतल्या म्हाताऱ्या ' धनिया ' मोलकरणीशीं कांहींतरी गप्पा मारीत वेळ काढतें कसाबसा.

तसं म्हटलं तर माझा जन्मच दिल्लींतला. पुणं मुंबईच परकं वाटून या जन्मग्रामांत शांतिसमाधान वाटायला पाहिजे—पण कां कुणाला ठाऊक, मनाला हुरहुर लागली आहे सारखी. आगामी संकटांची, दुःखांची ही पूर्वसूचना तर नसेल ?

दुःख !—दोन अक्षरांच्या या शब्दांतच इतका अर्थ भरला आहे कीं, जगाच्या आदिपासून सारे धर्म, सारे तत्त्वज्ञानी त्यांतल्या गूढ अर्थाची फोड करीत आहेत, पण जगाच्या अंतापर्यंत तें कोडें त्यांना सुटेल असें वाटत नाहीं. इतका दयाळू, सर्वशक्तिमान् परमेश्वर म्हणायचा—पण त्यानेंही आपल्या लाडक्या–आपल्या रूपाचेंच प्रतिबिंब असणाऱ्या–मान-वाच्या उरांत ही दुःखाची सुरी कां मारून ठेवावी ?

इथें उदासवाणी एकटी बसलें म्हणून खूप खूप विचार करतें मी या प्रश्नावर. पूर्वीपासूनच न सुटणाऱ्या कोड्यांशीं विचारांनीं खेळत बस-ण्याचा मला चाळा आहे. त्यासाठींच बी. ए. साठीं तत्त्वज्ञान विषय घेतला मी. पण अनेक धर्म, अनेक तत्त्वज्ञानी यांचे परस्पर विरोधी विचार पाहूनच मी गोंधळून जातें–एकाचा दुसऱ्याला मेळ नाहीं.

ख्रिस्ती धर्मानं म्हणावं नंदनवनांत आदमइवानें देवाची आज्ञा मोडून

ज्ञानाचं सफरचंद खाल्लं अन् म्हणून हा दुःखाचा शाप साऱ्या मनुष्य जातीच्या कपाळीं बसला. आपल्या तत्त्वज्ञानानें ' कर्म 'कटकट लावावी अन् म्हणावं गेल्या जन्मींच्या कृत्यांचीं फळं म्हणून हीं सुखदुःखं आपल्या मागें. हार्डी अन् शोपेनहॉर वाचतें तेव्हां तर अगदीं निराशेनें वैतागून जातो माझा जीव. त्यांचं म्हणणं देव, कर्म सारं झूट. कुठें असलीच तर एक छांदिष्ट अन् आंधळी शक्ति या जगावर सत्ता गाजवीत आहे. तुम्ही बरें वागा, वाइट वागा; दया दाखवा कीं खून पाडा— तिला त्याची दिक्कत नाहीं. अगदीं आंधळेपणानें तिची सुखदुःखांची खैरात चालायची. आपण मारे म्हणावं नीतीनें वागण्यांत सुख, आणि अनीतीनें वागण्यांत दुःख आहे—पण जगांत पहावं तर अनेक लफंगे सुखांत, आणि सज्जन दुःखांत दिसतात. त्यावर यांचें हेंच उत्तर. एखाद्या राजानं हत्तीच्या अंबारीवरून मोहरा उधळाव्यात. कुठें पडतील, कोणा योग्य, अयोग्य मनुष्याच्या हातीं जातील नेम नाहीं. तशी सुखदुःखांची उधळण चालली आहे जगांत ! किती किती उदासवाणं तत्त्व हें ?

हीं सारीं मतं पाहून मला आपलं वाटतं मानवी अपूर्णतेला दुःख अवश्यच आहे, नाहींतर पूर्ण सुखानं उद्दाम बनून मनुष्य निर्माणकर्त्या परमेश्वरालाच विसरायचा. कुंतीनें कृष्णापासून दुःखच मागून घेतलं होतं अशी आपल्याकडे कथा आहे ना ? रहाटगाडग्यासारखं हें सुखदुःखाचं चक्र सारखं फिरत चाललं आहे. टाळूं म्हटल्यानें दुःख टाळतां येत नाहीं; अन् आणूं म्हणून सुख ओढून आणतां येत नाहीं. म्हणून आल्या सुखानं हुरळून जाऊं नये, आणि दुःखानं अगदीं कपाळ फोडून घेऊं नये—हें सारं—सारं—मनाला कळतं पण आचरणाला वळत नाहीं एवढंच.

गाण्याच्या तालावर लहान मुली गोफ विणतात ना ?—क्षणोक्षणीं बदलणाऱ्या, रंगीबेरंगीं रेशमी पीळ पडणाऱ्या गोफासारखंच, सुखदुःखांनीं नटलेलं, क्षणाक्षणाला बदलणारं असं आपलं जीवन आहे. माझ्या भोंवतालची ही दिल्लीच किती बदलली आहे, आणि सारखी बदलते आहे पहा ! पांडवांच्या इंद्रप्रस्थापासून दहा दिल्ल्या झाल्या म्हणतात ! मागचा इतिहास सोडून दिला तरी आजही दिल्लींत फिरून आलं तर किती चमत्कारिक गोंधळाचे विचार मनांत उचंबळतात !—एकीकडे

मातीच्या ढिगाच्या खालीं पुरलेला खंडित असा तो ' **पुराना किल्ला** ' त्यालाच पांडवांचं इंद्रप्रस्थ मानून आपण त्याच्या वैभवाचीं चित्रं डोळ्यांसमोर उभीं करायचीं. त्या जुन्या किल्ल्यासमोर आजची इंग्रजांनीं वसविलेली ' **नवी दिल्ली** '. तें भव्य गोलाकृति बांधणीचं हिंदुस्थानचं पार्लमेंट—हजारों वर्षांच्या अंतराच्या दोन संस्कृति एकासमोर एक उभ्या आहेत इथें !

लांब कशाला ? मी लहान होतें तेव्हांपासून आमचा हा चांदणीचौकच किती बदलत गेला आहे आतांपर्यंत ! पूर्वीचा हा चौक अगदीं जुन्या मोगल राजवटीची आठवण करून देई. दुतर्फा झाडांच्या रांगेतून वहात जाणारा पाण्याचा पाट पाहून भर रस्त्याऐवजीं बागेतून हिंडण्याचा भास व्हायचा. इकडच्या लोकांना भडक रंगांची फार हौस. आमच्या घराच्या सज्जावरून खालीं पाहिलं तर लाल, हिरवा, पिवळा, जांभळा, केशरी या त्यांच्या आवडत्या रंगांचा एक मिश्र प्रवाहच वाहत चालला आहे असं वाटायचं ती गर्दी पाहून. पण आजच्या चांदणीचौकांतला लांब, सरळ, काळाकुट्ट डांबरी रस्ता, आणि त्याच्या दोन्ही बाजूंच्या उंच इमारती—या दृश्याला चांदणी चौक हें नांव शोभतही नाहीं. चौकाच्या तोंडाशीं असलेला जुनापुराणा घड्याळी बुरुज, आणि समोर धीर गंभीर वृत्तीनें पुराण पुरुषासारखा उभा ठाकलेला, तांबड्या दगडीबुरुजांमधला कमानदार लाहोर दरवाजा यांच्याकडे पाहूनच या जुन्या चांदणीचौकाची ओळख पटवून घ्यावयाची.

या चांदणीचौकासारखंच मनुष्याचं जीवितही एखादेवेळीं बदलून जात असेल कां ?

जाऊं दे—हे आपले माझे वेड्यासारखे विचार आहेत. ते उगाळीत बाबांच्या उशाशीं बसतें इथें. अशा वेळीं माझा सारा अल्लडपणा, आनंदीपणा मावळून अगदीं उदास पोक्तपणाचे विचार येऊं लागतात. कुणाला उलगडलं नाहीं, कुणाला उलगडणार नाहीं असं जीविताचं कोडं उगीच चाळा म्हणून विसकटीत बसतें झालं. कशी तरी लवकर सुटका होऊन तिकडे येईपर्यंत मनाची प्रसन्नता पुन्हां मिळेलसं वाटत नाहीं. तुमी,

—सुधा

# १५ प्रो. सुधाकर आणि शिस्त.

शनिवार पेठ, पुणें.

मित्रवर्य नारायणराव

यांसी अरविंदाचा सा. न. वि. वि.—

वसंताचीं पत्रें नेमानें येत नाहींत. त्याला तुझ्याकडे पत्र पाठविण्याची आठवण दिली आहेच. तुझ्या मागील पत्रांत हे प्रो. सुधाकर कोण? म्हणून तूं पृच्छा केली आहेस तेव्हां त्यांची थोडीशी ओळख करून देतों.

त्यांचा माझा परिचय झाला थोडा चमत्कारिक परिस्थितींत. ते आमच्या वर्गांत व्याख्यान देत असतां प्रथम एकदोन दिवस बरीच गड-बड झाली. बहुसंख्य विद्यार्थी शांतच असतात, परंतु दरवर्गांत दोनतीन वर्षें वाऱ्या करून, वर्गाची मिरासदारी मिरवणारे कांहीं विद्यार्थी असतातच. वर्गांतल्या साऱ्या खोड्या आणि गोंगाटाचा मक्ता यांनींच घेतलेला असतो. त्यांची हिकमत अशी कीं, प्रोफेसरांच्या लक्षांत न यावें म्हणून पांगापांग करून दूरदूर बसावयाचें, तेंही साधारण उंच विद्यार्थ्यांच्या मागें सोइस्कर-पणें लपतां येईल अशा जागीं. एकानें पहिली निशाणी दिली म्हणजे एकदम एखादी घोडेस्वारांची पलटण दौडत जावी तसा बाकांचा धड-धडाट होई आणि लागलीच उंच विद्यार्थ्यांच्या मेढेकोटामागें ते लपून जात. नवख्या प्रोफेसराला या '**गनीमी काव्या**'नें "दे माय" करून सोडणारे अनेक '**मऱ्हाठी बाण्याचे**' वीर मला ठाऊक आहेत.

हंसणें एकच असलें तरी त्याचे अर्थ अनेक होतात. त्याप्रमाणेंच या बांकांच्या आवाजाचेही ( स्टॅंपिंगचे )—प्रशंसा, आनंद, कंटाळा, कुचेष्टा, राग असे अनेक अर्थ होतात. त्या अर्थांच्या छटा हळुहळू कळत जातात. प्रथम प्रो. सुधाकरांनीं तिकडे लक्ष न देतां आपलें व्याख्यान सुरू ठेवलें. पण एक दिवशीं प्रमाणाबाहेर हा दंगा गेल्यावर केवळ अंदाजानें दोघा-चौघा जणांस उभें राहवयास सांगितलें. दोन सराइत "बाकांच्या तब-लजीं"मध्यें मीही अकारण सापडलों. आमचीं नांवें नंबर टिपून घेऊन नंतर भेटण्यास त्यांनीं सांगितलें.

एक गोष्ट या प्रकारांतही माझ्या निदर्शनास आली. साऱ्या वर्गा-तल्या घोळक्यांत निर्भयपणें बांकें बडविणारा विद्यार्थी एकदां खड्या-सारखा निवडला जाऊन, समक्ष भेटीसाठीं प्रोफेसरांच्या खोलींत उभा राहिला म्हणजे मात्र त्याची सारी वीरश्री लोपते, आणि तोंडचें पाणी पळून जातें—माझ्या बरोबरीच्या सहाध्यायांची अशीच स्थिति झाली. त्यांच्याकडून लेखी माफी लिहून घेतल्यावर ते माझ्याकडे वळले.

—पटवर्धन ! तुम्हाला आतांपर्यंत मी अभ्यासू विद्यार्थी समजत होतों. तुम्हीही सांपडलांत कां अशा संगतींत ?

—माझ्या शेजारच्या बाकावर कोणी बसावें हें ठरविण्याचा अधिकार मला दिलेला नाहीं सर ! मी उत्तर दिलें— माझ्या शेजारीं त्यांनीं बसून बाकाचा नगारा वाजविला याबद्दल मला दोषी ठरवून शिक्षा करायची असली तर करा खुशाल—सत्ता आहे तुमच्या हातांत—

ते जरा चपापले—आणि म्हणाले,

खऱ्या खोट्याचा विचार न करतां केवळ सत्ता आहे म्हणून मी शिक्षा करतों असें तुमचें म्हणणें आहे कां ?

शिक्षा करतांना तुमच्यापेक्षां मलाच अधिक यातना होत आहेत. विद्या-र्थ्यांशीं मित्रत्वाच्या नात्यानें रहाण्याची आशा नव्हे तीव्र इच्छा असलेल्या व्यक्तीला नाइलाजानें त्यांचेंच शत्रुत्व संपादन करण्याची वेळ यावी, यापेक्षां यातनेचा प्रसंग कोणता ? पण आजच्या बेशिस्तीला मी पोरपणा समजून मित्रत्वानें तिची उपेक्षा केली तर त्याचा अर्थ माझी नालायकी म्हणून करण्यासही अधिकारी तयार होतील. चांगल्या हेतूचा विपर्यास किती सहज-पणें करतां येतो हें अजून तुम्हाला कळायचंय्, पटवर्धन !

त्यांच्या शब्दांतल्या जिव्हाळ्यानें माझ्या मनाला चटका बसला. आम्हा विद्यार्थ्यांच्या सहसा लक्ष्यांत न येणारी या प्रश्नाची एक दुसरी बाजूही मला समजली.

आपल्या कृत्यांबद्दल ओशाळे झालेल्या त्या दोघां विद्यार्थ्यांनीं खरी हकीकत सांगून माझा निरपराधीपणा सिद्ध केला. ते गेल्यावर सुधाकरांनीं सहज विचारलें.

—मी बरंच ऐकतों आहे हल्लीं तुमचं नांव—कुठून आलांत तुम्ही ?

—सांगलीहून

—असं कां! वा! मीही होतों बरींच वर्षे सांगलीला. खरंच, तिथल्या कॉलेजची आठवण झाली कीं पूर्वीच्या शहरापासून दूर असलेल्या तपोवनांतील विद्याश्रमांची कल्पना डोळ्यापुढें येते नाहीं?

त्यानंतर सांगली, मिरज, बुधगांव, हरीपूर वगैरे अनेक स्थळविशेषां-बद्दल आमचीं बोलणीं झालीं. मीही कांहीं लिहितों सवरतों हें ऐकून त्यांना फारच आपलेपणा वाटला. दुसऱ्या दिवशीं त्यांनीं बोलाविल्या-प्रमाणें संध्याकाळीं मी त्यांच्या घरीं गेलों होतों. माझ्या कविता, लेख, लघु-कथा वगैरे आस्थेनें वाचून त्यांच्या परिचयाच्या मासिकांतून त्यांना प्रसिद्धि देण्याची खटपट करण्याचें त्यांनीं कबूल केलें आहे.

या वरवरच्या गप्पा झाल्या तरी त्यांच्या आवडीचा विषय म्हणजे आजच्या कॉलेजांतील विद्यार्थिवर्गाची सर्वांगीण प्रगति कशी होईल याचा विचार. अध्यापक व विद्यार्थी यांचे संबंध सलोख्याचे आणि मित्रत्वाचे कसे होतील याबद्दल त्यांचे विचार मला बरेच आवडले. काल वर्गांत घडलेल्या प्रसंगाचा पुन्हा उल्लेख झाल्यावर त्यांनीं उठून कपाटांतील दोन चार कागद माझ्यापुढें टाकले. आजच्या कॉलेजांतील बेशिस्त आणि बजबजपुरीवर तोडगा म्हणून त्यांनीं दोन तीन योजना तयार केल्या आहेत. त्यांतली शेवटची म्हणजे विद्यार्थ्यांचे प्रतिनिधि आणि कॉलेजांचे चालक यांच्या सहकार्याची योजना मला फारच आवडली. कॉलेजच्या वरिष्ठ चालक वर्गांना पटेल किंवा नाहीं, या शंकेनें ती आतांपर्यंत त्यांच्या-जवळ तशीच पडून राहिली होती. तिचा विचार करून, विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें त्यांत दुरुस्ती—सुधारणा सुचविण्यासाटीं त्यांनी ती माझ्याजवळ दिली. तिची एक प्रत मी तुला सोबत पाठवीत आहे. तिकडील नवीन सविस्तर हकीकत लिही आणि या योजनेबद्दल तुला कांहीं सुधारणा सुच-वावयाच्या असल्यास त्याही लिही.

तुझा,

**अरविंद.**

# १६. कॉलेजांतील वर्ग आणि विद्यार्थ्यांची शिस्त

**योजनांचें टांचण—**

आज कॉलेजांतील मोठमोठ्या वर्गांत आणि समारंभांत जी बेशिस्त आणि बजबजपुरी माजली आहे त्याचीं कारणें अनेक आहेत. त्याची खोल तात्त्विक मीमांसा करण्याची सध्यां आपल्याला जरूरी नाहीं. ती यापूर्वी अनेकांनीं केलेली आहेच. त्याच्यावर कांहीं उपाययोजना करतां आली तरच पहावयाचें आहे.

नाटक, सिनेमा, रेल्वेचें तिकिट ऑफिस, सार्वजनिक समारंभ वगैरे प्रसंगीं धक्काबुक्की आणि बेशिस्तीचें जें प्रदर्शन अज्ञांकडूनच नव्हे, सुज्ञांकडूनही केलें जातें, तीच मनस्थिति या बेशिस्तीच्या मुळाशीं आहे. हा सामान्य विशेष सोडून दिल्यास दोन तीन ठळक कारणें माझ्या नजरेस येतात. तीं दूर केल्यास या प्रकारास आळा बसेल असें माझें मत आहे.

पहिलें कारण म्हणजे हल्लींच्या कॉलेजांतील वर्गांचा अफाटपणा. दीडदीडशें पेक्षांही अधिक, भिन्नवृत्तीचे विद्यार्थी असलेल्या वर्गाला एकटा अध्यापक आपल्या ठराविक विषयाच्या, किंवा पाठ्यपुस्तकाच्या विवरणानें नेहेमींच कसा आकर्षित करून ठेवूं शकणार? **सर्व अपराधांचें, गुन्ह्यांचें मूळ, अनुकूल संधींत असतें.** संधि सांपडली तर सावाचाही गुन्हेगार बनतो. शंभर दीडशें मुलांच्या घोळक्यांतून बेशिस्त विद्यार्थी नेमके ओळखून काढणें कठीण. शिक्षेचें अभय हें त्यांचें चिलखत असल्यानें हवा तसा दंगा ते करूं शकतात. हा शंभर दीडशें मुलांचा वर्ग म्हणजे आवळ्या भोपळ्यांची मोट. शिक्षणाकडे लक्ष्य असलेले, व्याख्यान लक्षपूर्वक ऐकण्याची तयारी करून आलेले विद्यार्थी फार तर पन्नास. बाकीचे पन्नास निदान स्वस्थ तरी बसणारे. मागच्या बांकावरचे पंचवीस डुलक्या घेणारे. खरे उपद्रवी विद्यार्थी वीस पंचवीसच. ठराविक व्याख्यानांचा कंटाळा आला म्हणजे विरंगुळा आणण्यासाठीं, एकाद्या वेळीं उगीच गम्मत म्हणून, एखादे वेळीं विद्यार्थिनींवर छाप ठेवण्यासाठीं, वर्ग व्यवस्थेचा पट उध-

ळून लावण्यांत या विद्यार्थींना भूषण वाटत असतें. यांतील बहुतेक विद्यार्थी सुखवस्तु व सधन वर्गांतले असतात. या प्रकारांत सांपडलों तरी रुपया दोन रुपयांवर दंड होत नाहीं, ही त्यांची अटकळच बहुधा खरी ठरते. मग वर्गाची सहानुभूति आणि तोंपर्यंतची मौज या आधीं पदरांत पडलेली असतेच ! लहान लहान वर्ग करणें हा या प्रकारावर पहिला रामबाण उपाय असला तरी त्यासाठीं अध्यापक आणि इमारतींची वाढ करावी लागणार. त्या खर्चामुळें बहुतेक संस्था मागें पाय घेतात, आणि असले बहुसंख्य वर्ग वर्षानुवर्षे चालू रहातात. अशा प्रचंड वर्गांत धुमाकूळ घालणारे तेच विद्यार्थी त्याच अध्यापकाच्या लहान लहान ऐच्छिक वर्गांत मात्र निमूटपणें बसलेले आढळतात. यावरून अध्यापकाच्या लायकीवरच वर्गाच्या बेशिस्तीनें सर्व खापर फोडतां येत नाही हें दिसून येतें.

वर्ग लहान करणें हा पहिला उपाय खर्चाचा म्हणून सोडून दिला तर दुसरा उपाय तरी बिनखर्चाचा आहे. परंतु त्यासाठीं प्रथम थोडासा तत्त्वनिर्णय झाला पाहिजे. जोंपर्यंत वर्गांत वाटेल तें झालें तरी प्रत्येक विद्यार्थ्यानें वर्गांत सक्तीनें बसलेंच पाहिजे असा नियम आहे तोंपर्यंत अशा अवाढव्य वर्गांतील बेशिस्त चालावयाचीच. अशा बेशिस्त वर्गांतील दीडशें मुलांचा श्रोतृगण हवा, कीं व्यासंगी व शांत अशा पन्नास मेहनती विद्यार्थ्यांचा वर्ग हवा ? या प्रश्नांचा अधिकाऱ्यांनीं विचार करण्याची वेळ आली आहे असें मला वाटतें. ऑक्सफर्ड व केंब्रिज् येथेंही अशीच ऐच्छिक व्याख्यानांची सोय आहेच. त्यामुळें हें धोरण म्हणजे कांहीं क्रांतिकारक वाटण्याचें कारण नाहीं. बाकीच्या हजिरी प्रिय विद्यार्थ्यांची सोय कचेरींतील पटावरील सहीनें व्हावी. तिसऱ्या विस्तृत योजनेच्या वर्णनापूर्वी थोडासा उपोद्घात केला पाहिजे—

विद्यालय हें एखादें लोकसत्ताक राज्य नसून अनियंत्रित राज्य आहे, अशी आज विद्यार्थ्यांची भावना आहे. प्रिन्सिपाल हा या राज्यांतील सत्ताधिकारी, इतर अध्यापक हे छोटेमोठे अधिकारी व विद्यार्थी हे प्रजाजन. जोंपर्यंत या अधिराज्याच्या व्यवस्थेंत विद्यार्थ्यांच्या प्रतिनिधींचा सल्ला घेतली जात नाहीं, तोंपर्यंत त्यांच्याबद्दलचे प्रश्न ते स्वतः होऊन

सोडवून दाखविण्याबद्दल उत्सुकता दाखवितील अशी आशा कोणी करावी ? तात्त्विक ध्येयवादी व्याख्यानें, दडपशाही, शासन वगैरे अनेक प्रकार आजच्या गोंधळाला अपुरेच पडणार. संमेलन किंवा जिमखाना वगैरे खात्यांतच सहकार करून भागत नाहीं. विद्यार्थ्यांच्या शिस्तीचा विचार करावयाचा असतांना, विद्यार्थ्यांना बाजूला ठेवून अध्यापकांनींच स्वतःच्या सत्तेनें तो सोडवूं पहाणें हा प्रयत्न अनेकदां करण्यांत आला असूनही अयशस्वी ठरला आहे. वरील दोन योजना न पटल्यास खालील तिसरी योजना प्रयोग म्हणून एकदां उपयोगांत आणून पहाणें इष्ट होईल. इंग्लंडमधील रग्बी वगैरे मोठ्या शाळांमधून ( पब्लिक स्कूल्स मधून ) चालू असलेल्या वर्गनेत्यांच्या ( प्रिफेक्ट् किंवा प्रिपोस्टर सिस्टिम् ) शीं या प्रयोगाचें बरेंचसें साम्य आहे.

वर्षाच्या आरंभीं जिमखान्याच्या निरनिराळ्या खात्यांतील निवडणुकी होतात, त्यांतच दर वर्गाच्या किंवा तुकड्यांच्या प्रतिनिधींची एक नवी निवडणूक ठेवावी. प्रत्येक वर्गाचे असे दोन प्रतिनिधि निवडले जावेत. वर्गांतील शिस्त, व्यवस्था, वर्गाच्या हिताचे सर्व प्रश्न, अडचणी, तक्रारी यांचा निकाल त्यांनीं वर्गाचे प्रतिनिधी म्हणून त्या त्या विषयाच्या अध्यापकाबरोबर विचार विनिमय करून करावयाचा हें त्यांचें कार्य राहील. सध्यां दरवर्गांत असलेल्या नादार विद्यार्थ्यांनींही संस्थेचें कांहींतरी कार्य करणें अवश्य आहे. असे दोन तीन अथवा अधिक विद्यार्थीही प्रतिनिधींची इच्छा असल्यास वरील प्रतिनिधींच्या मदतीस देता येतील. परीक्षेच्या विषयांतील किंवा पाठ्यपुस्तकांतील शंका, शिस्त, गडबड, न समजलेला भाग, अधिक माहिती, तक्रारी, सहली, वर्गसंमेलनें, व्याख्यानें वगैरे बाबी या प्रतिनिधींनीं वर्गाच्या विचारानें, अध्यापकवर्गापुढें ठेवून त्यांच्या सहकार्यानें सोडवाव्यात.

ही योजना यशस्वी करण्यासाठीं एका पोट-योजनेची जरूरी आहे. ही योजना बरेच ठिकाणीं आजही नाममात्र सुरू असली तरी तिचा संपूर्ण अंमल मात्र क्वचितच दिसतो. विद्यार्थ्यांची हजिरी घेतांना त्यांना नंबर दिले असले तरी त्यांनीं त्याच नंबरावर बसलें पाहिजे हा साधा व प्राथमिक नियमही अनेक वर्गांतून व संस्थांतून पाळला जात नाहीं. घंटा

झाल्यावर गर्दीनें आंत येऊन जी जागा सांपडेल तेथेंच बसावयाचें असा शिरस्ता दिसतो. यासाठीं पहिली महत्त्वाची सुरवात म्हणजे प्रत्येक बांकावर अशा नंबरांच्या कायम पट्टया ठोकून ठेवून प्रत्येकानें स्वतःच्या नंबराच्या जागेवरच बसलें पाहिजे असा सक्त नियम केला पाहिजे. दृष्टीनें अधू विद्यार्थ्यांची प्रथम सोय होईलच.

वर्गातील अशा नंबरांचे तीन चार गट करून प्रत्येकांत वर उल्लेखिलेला एक प्रतिनिधि, मदतनीस, किंवा त्याचें कार्य करणारा दुसरा विद्यार्थी असावा.

अध्यापकानें आपलें कार्य पूर्ण तयारीनें, जबाबदारीनें व आपल्या श्रोतृगणांना पूर्ण समजेल अशा रीतीनें करावें हें उघडच आहे. त्यांतही वर्गात बेशिस्त किंवा दंगा झाला तर अध्यापकानें त्या गटांतील विद्यार्थ्यांच्या प्रतिनिधीकडे विचारणा करावी. प्रश्न किंवा तक्रार असल्यास तिचा योग्य परामर्श घेतला जावा. अकारण बेशिस्त असल्यास त्या विद्यार्थ्यांना प्रथम योग्य तें शासन करण्यांत यावें. परंतु या योजनेच्या येथवरच्या पायऱ्या बरोबर पाळल्या गेल्यास या शेवटल्या उपायाच्या उपयोग करण्यापर्यंत पाळी बहुधा येणारच नाहीं.

संमेलन, समारंभ, व्याख्यानें अशा प्रसंगींही खेंचाखेंच व गर्दी न करतां प्रत्येक वर्गाकरितां ठरीव जागा राखून ठेवण्यांत याव्या, व त्यांत प्रतिनिधि व मदतनीसांनींच व्यवस्था ठेवावी.

या कार्याबद्दल प्रतिनिधि व मदतनीसांना वर्षाचे अखेरीस प्रशस्ति पत्रकें देण्यांत यावींत.

जरा विस्तारानें लिहिलें तरी मूलतत्वांच्या दृष्टीनें पाहिलें तर माझी योजना अगदीं साधी आहे. **विद्यार्थ्यांचें सहकार्य आणि सहविचार यावर आधारलेली ही योजना केवळ अध्यापक किंवा चालकांच्याच एकांगीं शिस्तीच्या धोरणापेक्षां अधिक यशस्वी व अधिक लोकप्रिय होईल अशी माझी आशा आहे.**

या योजनेचें महत्त्व केवळ कॉलेजच्या वर्गापुरतेंच नाहीं. चार वर्षे अशा शिस्तींत रुळलेला विद्यार्थी पुढील आयुष्यांतही अशाच शिस्तवार-

पणें वागेल यांत शंका रहाणार नाहीं. कारण ही शिस्त केवळ दडपशाही मुळें किंवा हडेलहप्पीमुळें लादलेली नसून सहकार्य, सहविचार, सहानुभूति आणि ध्येयवाद यांवर आधारलेली आहे.

केवळ तात्त्विक चर्चा व तांत्रिक अडचणी यांच्या अक्षतांनींच या योजनेची बोळवण न करतां निदान एक दोन वर्षे तरी तिला संधि देऊन नंतर तिच्या यशापयशाबद्दल ठाम मत ठरवावें अशी विनंति आहे.

—सुधाकर

# १७. काळाच्या दाढेंतून

चांदणी चौक'
दिल्ली

प्रिय सुनंदा

हिला सप्रेम नमस्कार.

माझें मागचें पत्रही तुला मिळालें असेलच. त्याला उत्तर न पाठविण्याबद्दल मी तुला दोष देत नाहीं, कारण त्यांतलं लांबलचक चऱ्हाट वाचून तुला कंटाळाही आला असेल.

मला वाटतं पुष्कळशीं पत्रं ज्याला पाठवायचीं त्याच्यासाठीं लिहिलेलीं नसून, ज्यानं पाठविलीं त्याच्या स्वतःच्या विरंगुळ्यासाठीं लिहिलेलीं असतात. त्यांतून तुला माझा स्वभाव माहीत आहेच. समोर माणूस असले म्हणजे सारखं बोलत रहावंस वाटतं, नसलं तरीही आपलं कागद घेऊन दूरच्या मैत्रिणीशीं निःशब्द संभाषण करावसं वाटतं. बोलभांडपणात तुझी माझी जोडी आहे म्हणून ठीक, नाहींतर अगदीं कंटाळलीच असतीस तूं. मागल्याच वर्षीं आठवतं तुला, आपल्या वटवटीला कंटाळून ती हंसा तर कानांत दड्या घालण्यापर्यंत पाळी आणी.

कालच बाबांना हॉस्पिटलमधून घरीं आणलं. नको नको म्हणत असतांही ते अशोकराव टॅक्सी आणण्यापासून घरीं बाबांची व्यवस्था लागेपर्यंत सारख्या घिरट्या घालीत होते. उशाशीं बसून कुजकुज चाललेली असायची नेहमीं. मी आंत आलें कीं दोघे गप्प. यानेंच स्वतःच्या घरांतही मला अगदीं चोरट्यासारखं वाटूं लागलं आहे.

या प्रकारानं कंटाळून आमच्या घरांतल्या म्हाताऱ्या मोलकरणीशीं काल गप्पा मारीत बसलें होतें. अगदीं लहान होतें मी तेव्हांपासून मला तिचा लळा. गांवांतल्या गप्पा, वडिलांचा आजार, माझं बालपण या साध्या विषयांचे सांधे बदलीत बदलीत तिची गाडी आपली माझ्या लग्नाच्या स्टेशनावर येऊन थांबायची—मला रागही यायचा, अन् हंसूंही यायचं तिच्या भोळ्या कावेबाजपणाचं.

आई नाहीं पण आईचं आतडं आहे तिचं. तिची माया पाहून माझ्या डोळ्यालाही पाणी आलं. जर आई असती तर माझे असे धिंडवडे निघाले असते कां ? तिच्या मांडीवर डोकें ठेवून खूप खूप रडलें असतें मी, अन् मग मन हलकं झाल्यावर इतकं निक्षून हट्टानं सांगितलं असतं कीं माझी बाजू घेऊन बाबांच्या मनांतून तिनं केव्हांच हा लग्नाचा विचार काढून टाकला असता—पण ही बिचारी 'धनिया' काय बोलणार बाबांपुढें ? आणि मी तरी तिला माझे पुढचे बेत, माझ्या आकांक्षा काय सांगू—?

माझा राग जाणून थोडावेळ तीही फुरगुंटून बसे, पण थोड्या वेळानं पुन्हां दिल्लींतल्या साऱ्या महाराष्ट्रीय समाजांतल्या घडामोडींचं रसभरित वर्णन पाल्हाळानें सांगूं लागे. असं आहे हें आमचं परदेशी रत्न.

बाबांच्या प्रकृतीची काळजी दूर झाली. आतां शक्य तितक्या लवकर त्यांची परवानगी घेऊन पुण्याला पळणार आहे मी. पुढचं पत्र तिकडू-नच पाठवीन तुला.

सुधा.

# १८ प्रलय-काल !

सुरसागर नजीक,
बडोदें

मित्रवर्य अरविंद यास

सा. न. वि. वि—

तूं पाठविलेल्या दोन तारा, आणि तुझ्या, नारायणाच्या पत्रांचा जुडगा आतां एकदमच माझ्या खोलींत येऊन पडला आहे. कारण मध्यें पंधरा दिवस बडोदं जगाला मेलें अन् जग बडोद्याला मेलें असें झालें होतें. पत्रें तर राहोंच पण तारा आणि रेल्वेही बंद—कारण सारे तारांचे खांब आणि रेल्वेचे रूळ पुराच्या सोसाट्यांत वाहून गेले होते. आमच्या वाड्यांतले म्हातारे कोतारे तर, हजारों वर्षें येणार येणार गाजत असलेला **प्रलयकाळ** हाच म्हणून समजून शेवटली तयारी करायला लागले, आणि वटपत्रावरील बालरूप परमेश्वराच्या दर्शनाची वाट पाहूं लागले !

नेहमीं **कमिटी—बागे**जवळील पुलाखालून, चिखलाच्या ओहळांतून ओढ्यासारखी वाहणारी **विश्वामित्री** नदी, पावसाच्या संतत झडीनें ( एकाएकीं श्रीमंत झालेल्या हलक्या स्त्रीप्रमाणें ) इतकी ' फुगून ' गेली कीं तिच्या डौलाच्या थैमानाला सारें बडोदें शहर थिटें पडूं लागलें. नेहमीं धूळ तुडवीत आम्हीं ज्या हमरस्त्यावरून जायचे ते ते रस्तेही चार पांच फूट पाण्याखालीं दडले होते, आणि त्यावरून तराफे आणि छोटीं होडगीं मजेनें फिरत होतीं. त्यांच्या योगानें आमच्या बडोद्याला आठ दिवस अगदीं ' व्हेनिस 'ची शोभा आली होती.

पहिल्या दिवशीं भोंवतालच्या लोकांचे ' रेल आवी, रेल आवी ' हे उद्गार ऐकून मी गोंधळूनच गेलों होतों. माझा आपला सरळ अर्थ. ' रेल ' म्हणजे रूळ. म्हणजे आगगाडी अन् ती शहरांत आली ही काय भानगड आहे ? पुष्कळ वर्षांपूर्वी बडोद्यांत ट्रामगाड्या असत त्या केव्हांच नाहीशा झाल्या आहेत; त्या पुन्हां येणार कीं काय ? कॉलेज सुटतांना जयंत, आणि हंसा बरोबर घरीं परततांना त्यांना मी गोंधळून विचारलें. हंसा तर तोंडाला पदर लावून हंसायलाच लागली; आपल्या नांवाप्रमाणेंच.

मग जयंतनें सांगितलें कीं गुजरातींत ' रेल ' शब्दाचा अर्थ पाण्याचा पूर असा होतो !

त्या दिवशीं आम्हीं जे घरीं आलों त्यानंतर पंधरा दिवस कॉलेज बंद. कारण आठवडाभर तर त्याला पाण्याचा वेढाच पडला होता, आणि पुढें पुरामुळें निराश्रित बनलेल्यांच्या धर्मशाळेचें स्वरूप आमच्या कॉलेजला आलें होतें.

आपल्या सांगलीच्या कृष्णाबाईचा दरवर्षीचा पूर मी पहात असे, पण तिच्या पुढें ओहळासारख्या दिसणाऱ्या विश्वामित्रीच्या पुरानें कांहीं अनर्थ होईल हें मला प्रथम खरें वाटेच ना. इतरांचे जीव मुठींत असले तरी आमच्यासारख्या फटिंगांची मात्र फार मौज झाली पंधरा दिवस.

ठरावीक चाकोरींत फिरणाऱ्या जीवनाला नाविन्याचा थारेपालट मिळाला, पण कल्पनेच्या आकाशांत मोकळेपणानें गिरगिरणारा जीवाचा चंडोल मात्र आतां प्रेमाच्या पिंजऱ्यांत अडकून पडला आहे. त्याच्या पारधीची हकीकत पुढें देइनच.

किरकोळ अडचणी म्हणजे दूधवाले शहराबाहेर अडकून पडल्यानें, शहरांतलीं हॉटेलें बंद झाल्यानें दहा दिवस चहा मिळाला नाहीं, नीट जेवण मिळालें नाहीं एवढेंच. बाकी रेसिडेन्सीच्या विद्यार्थ्यांइतकें आमचे हाल झाले नाहींत. त्यांच्या इमारतींना पांच दिवस पाण्याचा वेढा पडल्यानें कोणाला अन्नाचा कण मिळाला नाहीं. शेवटीं महामुष्किलीनें तराफ्यांवरून कॉलेजतर्फे पाठविलेले शिजलेल्या भातभाजीचे हंडे मिळाले तेव्हां त्या साऱ्यांचें उपोषण सुटलें ! हॉस्पिटलमधले कितीक अर्धमेले रोगी या काळांत खतम झाले—कमिटी बागेतले वाघ, सिंह बिचारे पिंजऱ्यांतच बुडून मेले. नंतर किती तरी दिवस मेलेले पशुपक्षी वहात येऊन रस्त्याच्या बाजूला तारेच्या कुंपणांत अडकून पडलेले दिसत. विश्वामित्रीच्या पुलावरून चार फूट पाणी वहात असतां जयंत देसाई आणि मी त्यांतून फिरून आलों. जाळण्याची सोयच न उरल्यानें नुसतीं चादरींत बांधून पाण्यांत फेंकून दिलेलीं दोन प्रेतें अगदीं माझ्या पायाजवळून वहात गेलीं !

आठव्या दिवशीं पूर ओसरला तरीही पावसाचा मारा सुरू होताच.

त्या सतत धारेंत शेकडों घरें धडाधड कोसळून पडलीं आणि अनेक जीवांना त्यांत जिवंत समाधि मिळाली.

केवळ सांगोवांगी हकीकत नाहीं माझी—अगदीं अनुभवांतली गोष्ट आहे—आणि अशाच प्रसंगांतल्या सुखदुःख मिश्रित भावनांनीं अगदीं गोंधळून जाऊन तुझा सल्ला घेण्यासाठीं हें पत्र तुला लिहीत आहे. मात्र थट्टा करायची वेळ नाहीं, ही हें लक्ष्यांत असूं दे; आणि नंतरच उत्तर लिही.

पुराच्या चौथ्या दिवसाची दुपार होती. रात्रंदिवस मुसळधार पाऊस सुरू होता. भरदिवसा अंधारून रात्रीचा भास होई. पुराबद्दलच्या गप्पा मारीत, पत्ते खेळत आम्ही वाड्याच्या सज्जांत बसलों होतों. खालीं रस्त्यावरून चारपांच फूट खोलीचा पाण्याचा लोंढा खळाळून वहात होता आणि आमच्या घराचें जोतेंही त्यांत बुडून गेलें होतें. आकाशांतून जणूं काय सतत शरवृष्टि व्हावी तसे पाण्याचे तिरपे तीर सळसळत येऊन घरांच्या भिंतीवर आघात करीत होते—त्यांतच कधीं कल्पनाही येणार नाहीं असें दृश्य मला पहायला मिळालें.

खेळांत आपण पत्यांचा बंगला करतों. बाजूचें व आधाराचें पान काढून घेतलें म्हणजे तो एकाएकीं साराच खचतो तसा प्रकार मोठ्या प्रमाणांत माझ्या डोळ्यासमोर घडून आला. आमच्या समोरच हंसाच्या घराचें, एकावर एक अशा तीन मजल्यांच्या भिंतींचें एक पाखें ( करा म्हणतात त्याला इकडे, ) बघतां बघतां बाकीच्या तीन बाजूंपासून सुटून एखाद्या मोठ्या तक्त्याप्रमाणें धाडकन् खालीं आलें आणि त्यावर आधारलेला छपराचा कांहीं भागही कडकडत खालीं आला. लिहितांना लांबण वाटते, पण हा सारा प्रकार एका क्षणांत डोळ्याचें पातें लवतें न लवतें तेवढ्यांत झाला.

मग जो हलकल्लोळ उडाला त्याचें वर्णनही करणें शक्य नाहीं. एकीकडे ढगांचा गडगडाट, दुसरीकडे कोसळत्या छपराचा कडाकडाट आणि त्यांत भेदरलेल्या बायकामुलांच्या किंकाळ्या ! अशा प्रसंगीं विचार करण्याची फुरसद नसतेच. त्यावेळीं आणखी काय काय झालें, आणि मी काय केलें याची सगळी आठवणही मला उरली नाहीं. एखादा चित्रपट तुटायला झाला म्हणजे अत्यंत वेगानें गिरगिरत जावा, आणि पडद्यावर

त्याचीं सारीं अस्पष्ट एकांत एक मिसळलेलीं अंधुक चित्रें उमटावीत तसें यापुढील सारे प्रसंग माझ्या मनावर उमटलेले आहेत. चित्रपट शेवटीं तुटला म्हणजे त्यांतलें एकच चित्र अचलपणें पडद्यावर खिळून रहातें त्या प्रमाणेंच यांतलें शेवटलें चित्रच आतांही माझ्या हृदयावर ठसलें आहे– आणि तें जन्मभर तसें राहील अशी माझी खात्री आहे.

धरणीकंपाप्रमाणें सारी आळी हलून समोरच्या घराचा भाग कोसळून पडल्याबरोबर सज्जांतून उडी टाकून, पाण्याचा लोंढा कापून मी क्षणांत समोर पोंचलों. घरांतून पुरुषांच्या ओरडण्याचा आणि बायकांच्या किंचाळण्याचा गोंधळ चालला होता. उरलेला छपराचा भाग कोसळला आणि वरून एक किंकाळी येऊन क्षणभर सारें अगदीं शांत झालें. जयंताच्या घरांतलीं सारीं मंडळी खालीं जमली. तिकडे पाहून जयंत मोठमोठ्यानें ओरडूं लागला–' हंसा क्यां छो ? हंसा ! ' ( कुठें आहेस हंसा ? ) कुठूनही आवाज आला नाहीं–तिची अभ्यासाची खोली तिसऱ्या मजल्यावर. छपर कोसळून ती आंत अडकली असली पाहिजे हें साऱ्यांच्या लक्ष्यांत आलें ' दोर आणा, शिड्या आणा, ' म्हणून बरेच लोक उभ्याउभ्याच तोंड पाटिलकी करीत होते, वरच्या जिन्याचा मार्ग पडक्या छपराच्या वाशाकौलांनीं बुजून गेला होता. शेवटला उपाय म्हणजे पडक्या विटांच्या भिंतीवरून तिसऱ्या मजल्याच्या सरळ सुळका चढून जाणें. माझ्या बरोबर जयंत आणि दोघे तिघेही वर चढत होते; पण दुसऱ्या मजल्यापर्यंत चढून खालीं पाहिल्याबरोबर त्यांचे डोळे फिरूं लागले. शेवटीं तो नाद सोडून बुजलेल्या जिन्याचा मार्ग थोडा थोडा मोकळा करीत ते खालींच थांबले. मी तरी तशा तिरमिरींत थेटवर कसा गेलों याचें आतां मलाही आश्चर्य वाटूं लागतें. वरपर्यंत गेल्यावरही छपराचे मोडके वासे आणि द्रोणासारखे होऊन पडलेले पत्रे यांनीं माझा रस्ता अडविला होता. त्यांतल्या एका वाशानें तो ढीग जरा दूर करून मी आंत गेलों.

छपराची तुळई कोसळून आंतला पलंग आणि आराम खुर्ची यांचे तुकडे झाले होते. टेबलाजवळ वाचीत बसलेली हंसा खुर्चीवरच बेशुद्ध होऊन, टेबलावर ओणवून पसरली होती. कोसळलेल्या कडीपाटाच्या उभ्या फळ्या तिच्या अंगावर तिरप्या पडून ती तशीच जखडून पडली

होती. फळ्या वासे बाजूला करून, बाजूला गळणाऱ्या पाण्याची ओंजळ मी तिच्या तोंडावर शिंपडली. तिनें हळूंहळूं डोळे उघडले—परंतु डोळे उघडे असूनही भीती आणि गोंधळामुळें ती बेभानच होती. थोड्या वेळानें मात्र तिनें मला ओळखलें.

'कोण वसंतराव ?' ती उद्गारली—

पण समोर नजर फिरवून, कड्यासारखी तुटलेली ती भिंत, भोंवतीं खचलेलें तें छपर आणि लाकडांचा खच पाहून ती पुन्हां भीतीनें थरथरली. माझा हात तिनें घट्ट धरून ठेवला होता—'ओ मा ! बचाव' (आईग ! वांचीव यांतून) म्हणून किंकाळी फोडून ती पुन्हां बेशुद्ध झाली. खालीं जाण्याच्या जिन्याचें तोंड वासे विटांनीं बुजून गेलें होतें—माझ्या समोर पहातां पहातां छपराखालच्या भिंतीला तडा जात होत्या आणि त्यांचें लहान मोठे तुकडे पडत होते—त्या आवेशांतच धडपड करून, सारी अडगळ दूर करून जिन्याचें तोंड मी कसेंबसें खुलें केलें आणि बेभान हंसाला तसेंच खांद्यावर टाकून कष्टानें मार्ग काढून खालीं आलों.

'ओ मारी दीकरी' (माझी बाळी ती) म्हणून हंबरडा फोडून तिच्या आईनें तिला मांडीवर घेतले—

'धन छे मारा वीरलानें' (धन्य आहे तुझी) म्हणून माझ्या डोक्यावरून हात ओवाळून तिनें आपल्या कानावर बोटें मोडलीं.

हंसाचें गोड ओझें हलकें झाल्यावर माझ्या दशेकडे माझें लक्ष्य गेलें. माझा शर्ट फाटून रक्तानें माखला होता. वाशाचा एक तीक्ष्ण कोपरा लागून खांद्यावर जखम झाली होती. हंसा हळूहळू शुद्धीवर येऊन उठून बसली. आईबरोबर आंत गेली. जयंतनें माझी जखम बांधली—

—आणि एका निराळ्याच जगांतून पुन्हां व्यवहाराच्या जगांत उतरल्यासारखें मला वाटूं लागलें—

तुटलेल्या चित्रपटाच्या पडद्यावर स्थिर झालेल्या एकाच चित्राची कल्पना मी तुला दिली होती——

हें पत्र लिहितांना अजून माझ्या खांद्याची जखम ठणकत आहे. तिच्या बारीक तापानें डोकेंही सुन्न झालें आहे—पण त्यांतही मी डोळे मिटले कीं एकच चित्र दिसतें——

मी पाणी शिंपडल्यावर हंसाच्या उघडलेल्या काळ्याभोर नितळ डोळ्यांतल्या भावना–गोंधळ–भीति–ओळख–लज्जा–विश्वास यांच्या मागून एक तरंगत जाणाऱ्या छटा, तिनें थरथरत्या हातानें धरून ठेवलेला माझा हात, आणि विश्वासानें अंगावर टाकून दिलेला शरीराचा भार–कांहीं केल्या हें चित्र डोळ्यासमोरून हालत नाहीं.

पूर ओसरल्यावर जयंतबरोबर कितीकदां ती माझ्या प्रकृतीची पुसतपास करण्यासाठीं येऊन गेली. तिच्या पायीं झालेला खांद्यावरचा वण थोड्याच दिवसांत बराही होईल, पण हृदयावरचा ? त्याची तिला कल्पना असेल कां ? एकादेवेळीं विचार करीत बसलों तर अंधुकपणें वाटतें कीं तीहि असावी—कारण यापूर्वी परकेपणाच्या बेफिकीरीनें आणि मोकळेपणानें भिरभिरणारी, धिटाईनें भिडणारी तिची नजर आतां माझ्याशीं बोलतांना खालीं वळते–तासभर जरी बोललों तरी ती गेल्यावर काय बोललों याचा आढावा घेतल्यावर आठवण मात्र शून्य. पण या तुटक्या, निरर्थक बोलण्यांतला शब्दांपलीकडला अर्थ मनाला कळला नाहीं तरी हृदयाला पटतो–त्या आनंदांत जग तुच्छ वाटतें आणि तिच्या तुटक्या शब्दांचे ओघळलेले मोतीच मी एकट्यानें ओंवीत बसतों. कसल्या चमत्कारीक शक्तीनें पूर्वीच्या साध्या मैत्रीचें रूपांतर या प्रबल प्रेमभावनेंत झालें कुणाला ठाऊक ?

पण जाऊं दे–उगीच मनाचे मांडे खाऊन कुणाचें पोट भरणार आहे ?–माझा आपला भावना प्रधान स्वभाव ठाऊक आहे तुला; वाहवलों कीं वाहवलों. आपण आहोंत या परिस्थितींत हे विचारहि मी कुणा परक्यासमोर मांडले तर अब्रम्हण्यम् ओरडून टीकेचा वर्षाव करील तो माझ्यावर !

झालेली सारी हकीकत खडान् खडा एकमेकांना कळवायची म्हणून सायंकाळच्या सूर्याला साक्षी ठेऊन सांगलीच्या माळावर आपण घेतलेली शपथ मला मोडवत नाहीं म्हणून, आणि तुझ्या सहानुभूतीची मला खात्री वाटते म्हणून ही पोटउकल तुझ्यापुढें केली. पंधरा दिवस कॉलेज बंद असल्यानें तुझ्यासारख्या स्कॉलरला तिकडची कांहीं हकीगत देतां येत नाहीं. भलतीच हकीकत मात्र लिहून गेलों झालं.

प्रो. सुधाकरांची योजना मलाही फार आवडली. कॉलेजांच्या अधिकारी वर्गाला मात्र ती आवडायला पटायला हवी. तेवढं मात्र कठीण दिसतं. तुझं सविस्तर पत्र येऊं दे. नारायणाला खुशाली कळीव. त्याला मी पुढें लिहीन.

—वसंत

# १९ 'शोक' कीं अशोक?

पुणें, ता.

प्रिय सुनंदा हिला.

सप्रेम नमस्कार

सुटलें बाई एकदांची. पुणं गांठल्यावर हायसं वाटलं मला. बाबा बरे होऊन आतां नोकरीवर रुजू झाले आहेत. त्यांची व्यवस्था लावून मी तावडतोब इकडे निघून आलें. जास्त रहाणं बरं वाटेनाच मला. इकडे आल्यावरच माझा आनंद नी उल्हास मला परत मिळाला. गेल्या महिन्यांत दिल्लीला असतांना असे गंभीर नी उदास विचार सारखे मनांत वावरत होते कीं, इथें आल्यावर नवलच वाटतं त्यांचं. एकाच व्यक्तीची निरनिराळ्या परिस्थितींत निरनिराळीं रूपं होऊन, त्याचे विचार, भावना, या साऱ्या बदलून जात असतील कां असा प्रश्न पडतो मला.

तें जाऊं दे. पण नवल हें बघ कीं बाबांची शुश्रूषा केली मी--पण मी पडलें घरची-अन् त्यांनीं त्या अशोकांची स्तुति करून अन् आभार मानून अगदीं स्वर्गाला नेऊन पोंचविलें आहे त्यांना. तेव्हांपासूनच मला चमत्कारिक वाटत होतं. पुष्कळदां मी आडून पाहिलं कीं ते सारखें बाबांच्या कानाशीं लागून किती तर बोलत असत. मी खोलींत आलें कीं आपले दोघं गप्प. शेवटीं मला वाटत होतं तसं झालंच. मी निघण्याच्या आधल्या दिवशींच त्यांनीं अगदीं विलायती पद्धतीनें मला मागणी घातली. मला पाहिल्याबरोबर प्रथमदर्शनीं प्रेम त्यांना कसं वाटायला लागलं, इतक्या दिवसांच्या सहवासानं तें कसं दृढ झालं, अन् मी नकार दिला तर अगदीं जगणंसुद्धां कसं अशक्य होईल हें सारं त्यांनीं अगदीं नाटकी पद्धतीनं खुलवून सांगितलं. त्यांचं दिल्लीच घरंदाज घराणं, सरकारी नोकरी, पुढील बढती, ते मला देण्यास तयार असलेली स्वतंत्रता वगैरे व्यावहारिक फायदेसुद्धां त्यांनीं पुढें मांडले.

अगदीं चमत्कारिक वाटलं-अन् रागही आला मला. माझ्या सारख्या अनोळखी स्त्रीला त्यांनीं इतक्या तडकाफडकी मागणी घालावी-आणि

तीही इतक्या विश्वासाच्या अविर्भावानें कीं जणूं काय मी त्यांच्या मागणीची वाटच पहात होतें. या लोंचटपणाचा राग येऊन मी गप्पच होतें. मग त्यांनीं अगदीं मानभावीपणानं सांगितलं

'घाई करूं नका—नीट विचार करून सांगा इवंतर—'

मग मात्र मी जरा फणकाऱ्यानंच त्यांना म्हणालें, 'विचार कसला करायचा त्यांत ! अजून बी. ए. देखील झालें नाहीं मी, एवढ्यांत लग्न करायचा विचारदेखिल शिवत नाहीं माझ्या मनाला. अन् बी. ए. होऊनही मी लग्नच करणारही नाहीं. आईच्या मागें म्हातारपणीं बाबांची काळजी घेणारं कोणीच नाहीं. तेव्हां त्यांच्याकडे लक्ष देणं माझं कर्तव्य आहे. अन् समजा जरी माझा तसा विचार असता तरीही मी नकारच दिला असतां कारण इतक्या तुटपुंज्या ओळखीवर तुम्ही तडकपणें अशी मागणी घालावीं हें मला अगदीं गैर वाटतं; तेव्हां माझा नकार कायम समाजायला हरकत नाहीं तुम्हांला.' इतकं जीव तोडून मी सांगत होतें तरी वाईट वाटण्याऐवजीं बाजूच्या खिडकीवाटें तोंड वळवून ते आपले गालांतल्या गालांत हंसतच होते. त्यानं जास्तच चिडलें मी. रागाच्या भरांत आणखीही कांहीं टाकून बोललें असेन मी त्यांना. मग कशीतरी निघून आलें शक्य तितक्या लवकर. आतां बाबा कदाचित् त्यांची बाजू घेऊन माझ्यामागं टुमणं लावतील, पण एकदां त्रागा करून मला लग्नच करायचं नाहीं म्हणून सांगितलं कीं तेही गप्प बसतील अशी माझी खात्री आहे. माझ्या मनाविरुद्ध कांहीं एक करणार नाहींत ते.

अशा रितीनें एक घाव नि दोन तुकडे करून मी इकडे आलें, पण पुन्हां झालेल्या प्रकाराबद्दल मी जितका विचार करतें तितका अधिक अधिक गोंधळच होतो माझा.

अशोकांना मी नकार दिला—भावी पति या नात्यानें त्यांचा विचारही मनांत आला तर शहारेच येतात माझ्या अंगावर—पण असं कां व्हावं हेंच समजत नाहीं मला. तसं पाहिलं तर अशोकांनीं मला मागणी घातली यांत गैर केलं असं नाहीं. मी मात्र त्यांना नकार देतांना इतकं रागावून, तोडून कां बोललें हें आतां माझं मलाच समजत नाहीं. त्रयस्थ दृष्टीनें पाहिलं तर मी आतांपर्यंत पाहिलेल्या साऱ्या पुरुषांपेक्षां ते अधिक सुरेख

आणि ऐटदार आहेत. त्यांच्या मूळच्या गोऱ्या रंगावर विलायतच्या हवेचा तांबूस तजेला आला आहे. डोळ्याला चष्मा असला तरी त्यांतून त्यांची तीक्ष्ण आणि भेदक दृष्टि अगदीं काळजाचा ठाव घेते. बोलणं, चालणं, वागणं यांतली सलगी मला जरी जास्त फाजील वाटली तरी विलायती रीतिरिवाजांच्या मानानं त्यांत वावगं कांहीं नाहीं. इतर कोणा बद्दल मी इतकं तपशीलवारपणें लिहिलं असतं तर माझं त्यांच्यावर प्रेम आहे असं ठरवून तूं केव्हांच मोकळी झाली असतीस. पण इतकं रूप आणि आकर्षकपणा अंगीं असूनही ते मला नकोसे कां वाटतात हें माझं मलाच कळत नाहीं. हें कोडं सोडवायला मी वाङ्मयाकडे धांव घेतली तर त्यांतला प्रकारही मला पटत नाहीं. सौंदर्यापोटीं प्रेम असतं हा नियमच घालून दिल्यासारखा आहे त्यांनीं. कथा, कादंबरी, काव्य चाळायला घ्यावं, अन् प्रेमाचीं वर्णनं आलीं कीं पानभर त्या नायकाच्या देखण्या स्वरूपाचं, अंगयष्टीचं वर्णन आणि नायिकेच्या सुंदर तनुलतिकेचं वर्णन ! सर्वसामान्य स्वरूपाच्या स्त्रीपुरुषांला प्रेमच करतां येत नाहीं अशी तर त्यांची समजूत नसेल ?

अशोकांच्या उदाहरणावरून तर माझी उलट समजूत झाली आहे कीं प्रेमाऐवजीं, आनंदाऐवजीं, तिरस्कार आणि तुटकपणा वाटावा असेही कांहीं भडक सौंदर्याचे प्रकार असूं शकतील, कीं त्यांच्या त्या झगझगीत दिपवून टाकणाऱ्या सौंदर्यापेक्षां शांत, सौम्य परंतु मोहक अशा सामान्य स्वरूपानेंच अधिक परिणाम व्हावा.

आतां या माझ्या चाचपडत चाललेल्या कल्पनांची एखादा मानसशास्त्रज्ञ चांगलीच हजिरी घेऊं शकेल. पण कांहीं म्हटलं तरी हा माझा अनुभव आहे खरा.

तुला माहीतच आहे कीं, जवळ दुसरं कोणी बोलायला नसलं तर मी आपली पुष्कळदा मनाशींच बोलत बसतें. प्रश्न माझे, अन् उत्तरंही माझींच. काल वेणी घालतांना आरसा पुढं घेऊन बसलें होतें मी. तेव्हां आरशांतल्या सुधाला पुन्हां पुन्हां डिवचून विचारलं मी.

"कां ग सुधा ? अशोक कां नकोसे वाटतात तुला ? त्यांच्या विरुद्ध

प्रत्यक्ष अशा कांहींच गोष्टी माहीत नाहींत तुला. दुसऱ्या कोणावर प्रेमही नाहीं तुझं—मग ते इतके देखणे, इतके आकर्षक·········

अन् एकदम थांबलें मी. आतलं मन सांगू लागलं.

ते इतके आकर्षक आहेत म्हणूनच नकोसे वाटतात मला बरं सुधाबाई. अग एवढ्यांतच त्यांचा आकर्षकपणा मला कळून आला तर तोच इतर स्त्रियांना कशावरून कळाला नसेल यापूर्वी ? इथें ? विलायतेंत ?

—काय चमत्कारिक कल्पना ही ?—— वा सुधाबाई, म्हंजे सुंदर नी आकर्षक होणं गुन्हा आहे वाटतं ? अन् एखाद्या कुरूप मनुष्यालाच मुद्दाम निवडून लग्न करणार कां त्याच्याशीं !

——गुन्हां बिन्हा जाणत नाहीं मी. पण लग्न करायचं असलं तर असं माणूस लाभलं पाहिजे कीं तें जन्मभर केवळ माझंच असं मला वाटलं पाहिजे——माझ्या प्रेमावरच संतोष मानण्याची वृत्ति पाहिजे त्याची—अन् लिहितेंच आतां—हांस खुशाल हवी तर——इतरांपेक्षां माझ्यांतच कांहीं तरी विशेष आहे असं वाटून माझ्याच कोडकौतुक, हौशी पुरवायला हव्यात त्यांनीं. मग अशी एकनिष्ठ प्रेमाला प्रेम देणारी व्यक्ति रूपानें, वैभवानें जरा डावी असली तरी चालेल. नाहीं तर आपलं लग्न करून आपल्या रूपवैभवाच्या आकर्षणानं चार उनाड साळकाया माळकाया गोळा करून त्यांनीं खिदळायचं, अन् आम्ही मात्र सुशिक्षित असूनही चार भिंतींत कोंडून घेऊन, झुरुझुरुं होऊन दिवस काढायचे, नाहीं तर फटकून वागून, त्यांच्यासारखं आम्हीही वागायचं——काय पण चित्र आहे संसाराचं ! यासाठीं आधींच काळजी घेऊन, विचार आकांक्षा ठरवून, मगच या संसाराच्या रंगणांत पाऊल टाकावं असं वाटतं मला. उगीच आपले विचार मनांत मावेनात माझ्या म्हणून सांगितले तुला——पटोत कीं न पटोत माझा आग्रह नाहीं——तुझ्याकडील हकीकत बऱ्याच दिवसांत कळली नाहीं——चांगलं लांब पत्र आलं पाहिजे तुझं.

—सुधा.

२०

राजा की मंडी
आग्रा.
ता.

अशोकराय घरफोडे—देहली—प्रति जयगोपाळ.

महाशय.

आजकल बाजार में पैसे की बडी तंगी है, यह तो आपकोही मालुम होगा. आपने करज चुकानेके वायदे तो कइ बार किये, लेकिन् लेनेदेने का नाम तक न लिया. आपको याद होगा कि आपका मकान रेहन[1] रखकर आपने अठरहा हजार रुपिये कुल हमारे दुकानसे लीये थे, जिसका दो साल हुवे सूद[2] तक अपने नहीं दिया. आप अब एक बडे सरकारी अफसर बनगये हो, इस लिये हमने कुछ जलदी नही की; लेकिन् पीछले महिनेमें कलकत्तेके सन[3] के बेपारमें हमें बडा नुकसान उठाना पडा. इसलिये हमे इस वख्त बडी रक्म की सख्त जरुरत है. सूद और असल के साथ सब रकम आप एक महिनेमें हमारे दुकानपर जमा कर दें—

आप बडे पढे लिखे आदमी है, और आशा है कि हमें कचेरी दरबार करनेकी नौबत[4] न आयेगी.

इसपर भी अगर एक महिनेके अंदर आप रक्म न चुकाएंगे तो हमें मजबूरन्[5] आप महाशयपर नालिश[6] करनी होगी.

भवदीय.

सुखलाल रामचरण.

---

१ गहाण; तारण. २ व्याज. ३ ताग. ४ अप्रिय प्रसंग. ५ नाइलाजानें. ६ फिर्याद.

## २१ ( मूळ इंग्रजी )

इंपीरीयल सेक्रेटेरीएट,

दिल्ली

सुखलाल रामशरण, आग्रा

यांस अशोक घरफोडे यांचा जयगोपाळ.

मागील व्याजमुद्दलाबद्दल तगाद्याचें तुमचें पत्र पोचलें. पंधरा वीस हजार रुपये म्हणजे कांहीं फार मोठी रक्कम नव्हे. इकडील नोकरींत मला लवकरच मोठी बढती मिळणार आहे. शिवाय माझें लग्नही लवकरच होणार असून, हुंड्याच्या वीस हजारांच्या नोटा एक रकमेनें तुमच्या अंगावर टाकून मी मोकळा होइन. याबद्दल बिलकुल शंका नको.

तुमच्या पत्रांतली फिर्यादी अर्यादीची भाषा वाचून मात्र मला राग आला. एकदोन वर्षांचें तुमचें व्याज थकलें असेल, परंतु फिर्यादीच्या धमक्या द्यावयाच्या असल्यास छदामही सीध्या रीतीनें तुम्हाला मिळणार नाहीं. हें लक्ष्यांत असू द्या. एकमेकांच्या सोईनें घेतल्यास वर्षांत तुमच्या रकमेची फेड होईल. तेव्हां आतां याप्रमाणें तुमचा मार्ग मोकळा आहे—योग्य त्या रीतीनें वागावें.

—अशोक घरफोडे

# २२ कांटेरी वाट.

शनिवार पेठ
पुणें

मित्रवर्य वसंतास—

इतक्या दिवसांनीं आलेलें तुझें पत्र वाचून जीव भांड्यांत पडला. मला भीति वाटत होती त्या अर्थानें नव्हे, तरी दुसऱ्या अर्थानें तरी या पुरामुळें तूं बराच '**वहावलास**' हें मात्र खरें. तुझी भावनाप्रधान आणि कल्पनांचे मनोरे रचण्याची वृत्ति मला माहीत आहे म्हणून तूं लिहिलेल्या साऱ्या प्रकरणाबद्दल मी तुला दोन सावधागिरीचे शब्द लिहीत आहे. सुधाच्या आणि माझ्या परिचयाबद्दल मी तुला मागें लिहिलें आहेच. तुझ्याप्रमाणें काव्याच्या भावनांच्या पूरांत जरी मी मग्न नसलों, केवळ तुझ्यासारखीं तिचीं चित्रेंच डोळ्यापुढें ठेवून, जगाला विसरून प्रेमाची स्मरणी ओढीत बसलों नसलों तरी मला तिच्याबद्दल जिव्हाळा वाटूं लागला आहे हें खरें आहे. तथापि कोणत्याही गोष्टीचा खोल विचार करण्याची माझी प्रवृत्ति असल्यानें तुझ्यासारखा मी भावनेनें वेडा झालों नाहीं. मी कृष्णाकांठचा गरीब विद्यार्थि. कठीण परिस्थितीशीं तोंड देऊन, अडचणींत स्वावलंबनानें शिक्षण पुरें करणारा, आणि ती दिल्लींतल्या सेक्रेटेरीएट मधील बड्या ऑफिसरची मुलगी. हा सामाजिक फरक मी डोळ्याआड होऊं दिला नाहीं.

प्रेम करायचं म्हणजे चौकांत उभें राहून डंका वाजवावा लागत नाहीं, किंवा उगीच प्रेमविषयाभोंवतीं लघळपणें घिरट्या घालून, कांहीं तरी (आपल्यामतें काव्यमय, पण डोकें शाबूत असलेल्या कोणालाही बाष्कळ आणि निरर्थक वाटेल असं काहींतरी) बोलायचेंही नाहीं. प्रेम म्हणजे पोरखेळ नव्हे कीं सहज उचलून मन मानेल तेथवर खेळावें, आणि कंटाळा आला, किंवा डाव उलटायचीं चिन्हें दिसूं लागलीं कीं पट उधळून नामानिराळें व्हावें. प्रेम म्हणजे सृष्टीच्या उत्पत्तीपासून जगाला चैतन्य देणारें तेज आहे. थिल्लरपणें वाटे जाणाऱ्याला तें भाजूनच

काढील. शुद्ध भावनांनीं प्रेरित होऊन, आत्मारामाला साक्षी ठेवून, ह्या ब्राह्मतेजाची उपासना करावी लागते. एका दिव्यावरून लागलेल्या दिव्याप्रमाणें, एका तेजावरून दुसऱ्या हृदयांतही त्याच तेजाची चिर ज्योति प्रकट झाली, तर त्या दुहेरी प्रभेनें जीविताचा सारा अंधःकार उजळला जाईल—मात्र उगीच एखादी सनकाडी क्षणभर पेटावी आणि विझून जावी, अशा जाळालाच ही ज्योत समजूं नये ही काळजी घेतली पाहिजे. माझी अशी खात्री होईपर्यंत, जिवाच्या शब्दाला शिवाचा पडसाद मिळेपर्यंत भलत्या आशा धरून मी चालत नाहीं, आणि सुधेचा सहवासही पणाला लावीत नाहीं. तिच्या वागणुकीवरून निदान अकृत्रिम स्नेह तरी असावा अशी मला खात्री वाटते. या स्नेहांतूनच प्रेमाची ज्योत प्रकट झाली तर ठीकच—नाहींतर चारुदत्ताप्रमाणें

कुसुमचाप मनिं जागृत झाला ।  
परि तो मनिंच्या मनींच निमाला ।  
क्षुद्र नराचा कोप जैसा ।।—

अशी माझी अवस्था व्हायची.

तुझ्या निवडीबद्दल मी कांहींच म्हणत नाहीं. मात्र, आपल्यावर आक्रमण होऊ नये, परकी व्यक्ति बळेंच वैवाहिक संबंधानें आपल्या समाजांत शिरूं नये अशी प्रबळ भावना प्रत्येक समाजात असते हें लक्षांत ठेव. तूंच मागें लिहिल्याप्रमाणें पोटजातींच्या एकीकरणाच्या कितीही गप्पा पुढारी मारोत, एकंदरींत बहुजनसमाज या अशा संबंधाला कसून विरोध करतोच. हे संबंध यशस्वी होणें हें केवळ दोन्ही व्यक्तींच्या व्यक्तिमत्वावर, आणि नैतिक सामर्थ्यावर अवलंबून असतें. या साऱ्या विरोधाला न जुमानतां त्यांची फळी फोडून जाण्याचें धैर्य तुम्हां दोघांत असलें, दोन्ही समाजांनीं तुम्हांला दूर लोटलें तरी एकमेकांच्या सहवासांतच सारी सामाजिक जीवनाची भूक भागवून घेण्याइतकी तृप्ति तुम्हांला लाभण्यासारखी असली, तरच या मार्गांत पाउल टाक—यासाठीं प्रथम तुझ्या हंसाची कितपत तयारी आहे हें नीट तावून सुलाखून पाहून घे. नाहींपेक्षां असले प्रयत्न साधल्यास टीकास्पद, आणि फसल्यास हास्यास्पदही होतात; हा इशारा मी मित्रत्वाच्या नात्यानें तुला आधीं देऊन ठेवतों.

लहान मुलें गंमत म्हणून काडी ओढून जाळाची मजा पहातात, पण एकदा बोटाला चटका बसला म्हणजे विवळत, तिलाच शिव्या शाप देत, ती फेंकून देतात—तसा प्रकार होऊं नये म्हणून फार जपायला पाहिजे तुला. जाऊं दे.

जरा निवांतपणा असावा म्हणून रात्रीं अकराला मी तुला पत्र लिहित बसलों आहे, पण खाली दाराशीं बसविलेल्या गणपतीपुढें कोण आरडाओरड नी गोंधळ माजला आहे त्याचे पडसाद येथवर येत आहेत. हा गाढवाचा आवाज कुठून?—होय. एक कलावंत नकलाकार पशूंच्या ओरडण्याच्या नकला करीत आहेत गणपतीसमोर! असा प्रकार पाहून एखादे वेळीं भयंकर वैताग येतो—आज जर शिवरामपंतांची तेजस्वी लेखणी असती तर ती तळमळीनें तरारून म्हणाली असती—" बा गणपते! काय ही तुझी दशा! फुकट—अगदीं फुकट विघ्नहर्ता म्हणून मिरवतोस—फुकट मंगलमूर्ति म्हणून तुझें नांव. सिंदुरासुरांसारख्या दैत्यांचा निःपात करणारा बालशाली तूं, आणि तुझ्यापुढें हे तुझे भक्त म्हणविणारे नाचतात काय, नकला करतात काय, हेल काढतात काय; आवडतें हें तुला सारें? मूर्तिमंत काळाच्याही गळ्यांत फेंकल्यावर त्याला फरपटत खेंचून आणणारा तुझ्या हातांतला तो प्रभावी पाश! पण आज आमच्या गळ्याभोंवतीं कसले पाश एकावर एक पडत आहेत पहा—पारतंत्र्य, दुही, अधार्मिकता, बेकारी, अन्नान्नदशा, विलासीवृत्ति, परधार्जिणेपणा—यांनीं आमच्या समाजाचे प्राण कंठाशीं आले आहेत—हे पाश टाकणाऱ्या राक्षसी शक्ति तुझ्यापुढें नंगानाच करीत आहेत तरी तुझा तो प्रभावी पाश अजून हातांत तसाच? एका घावानिशीं प्रचंड विश्वाची खांडोळी करून टाकील असा तुझा फरश. अरे तो तरी सरसावून या नरराक्षसांचा निःपात कर......आणि तसें तुझ्या मनांत नसलेंच तर मग कशाला उगीच तुझा अभयहस्त दाखवून आम्हाला खोटी आशा दाखवितोस?

फुकट फुकट सारें ——गणपते! काल फिरला कीं देवही फिरतात—— तुझ्या हातांत आज पाश आहे, पण तो आमच्या गळ्याभोंवतीं फेंकायला, फरश आहे तो आमचींच शकलें पाडायला, आणि अभयहस्त आहे तो आमच्या शत्रूंना अभय देण्यासाठीं——असं तरी म्हणूं का? म्हणजे तरी

क्रोधविष्ट होऊन, तुझ्या सुखासनावरून उठून या पिशाच्चांचा संहार करशील तूं ! मग तुझ्या आरक्त नेत्रांच्या अग्नींत मला रागानें जाळून भस्म केलेंस तरी चालेल——पण गणपते ! तुला साक्षी ठेवून तुझ्यापुढें चाललेल्या, तुझे भक्त म्हणविणाऱ्यांच्या या मर्कटचेष्टा उघड्या डोळ्यांनीं आतां नाहीं पाहवत !"

जाऊं दे—कुठें त्यांची, देशाभिमानाची आग प्यालेली लेखणी, आणि क्षुद्रवर्णनांची शाई प्यालेली माझी यःकश्चित् लेखणी—पण माझा अधिकार नसला तरी तळमळ मात्र तितकीच वाटते यांत शंका नाहीं. जागृति आणि सामाजिक संघटनेसाठीं लोकमान्यांनी या उत्सवाला एवढें महत्त्व दिलें, पण आज त्याला बहुतेक ठिकाणीं नुसतें तमाशाचें नाहीं तर जलशाचें स्वरूप आलें आहे. सावरकर आणि कवि गोविंदांच्या मेळ्यांनीं एक वेळ महाराष्ट्रांत राजकीय चैतन्य विजेसारखें खेळविलें होतें. थेट अशिक्षितांपर्यंत साऱ्या महाराष्ट्राच्या आकांक्षांचा साद पोंचत होता. हल्लींच्या मेळ्यांतून मात्र पक्षोपपक्षांच्या कुचाळ्या, आणि स्त्रियांविषयींचा आचरटपणा एवढे भाग शिल्लक राहिले आहेत. हौस म्हणून काढलेल्या लहान मुलामुलींच्या मेळ्यांतून आतां धार्मिक स्वरूप लोपून केवळ धंदेवाइकपणा शिरून पुष्कळांना तर नाटककंपन्यांचें स्वरूप आलें आहे. हा सारा प्रकार पाहून या उत्सवाची विटंबना आणखी कोठवर खालीं पोंचणार याची मला कल्पनाच करवत नाहीं.

आमच्या कॉलेजच्या क्लबाक्लबांतही गणपति बसतात. कालच जाऊन आलों तिकडून. दुर्वा फुलें वहाण्यापलीकडे पूजेचे चार मंत्र येणारे विद्यार्थी मिळणें कठीण. नुसती ताट वाट्या वाजवून आरती करावयाची, कोणाचें गाणें करायचें एवढेंच. अशा विस्कळितपणापेक्षां साऱ्या क्लबांनीं मिळून एकजुटीनें एक मोठा गणपति बसविला, एकत्र जमलेल्या वर्गणीतून उद्बोधक भरगच्च कार्यक्रम केला तर ?

माझे विचार कदाचित् चुकीचेही असतील. पण केवळ या उत्सवाकडेच नव्हे, तर माझ्या भोंवतीच्या साऱ्याच सामाजिक जीवनाकडे, काव्य, नाट्य, कथा, वृत्तपत्रादिकांकडे मी पाहतों, तेव्हां त्या साऱ्यामागें एक विशिष्ट मनोवृत्तीच मला दिसूं लागते—ती म्हणजे गेल्या दहा वर्षांत

तणासारखी फोंफावलेली उपहास आणि थिल्लरपणाची वृत्ति. महाराष्ट्र जात्याच फाजील गंभीर आहे; महाराष्ट्रांत विनोदबुद्धीच नाहीं अशी मागें तक्रार करण्यांत येत असे. त्याची प्रतिक्रिया म्हणून कीं काय हल्लीं गंभीर आणि महत्त्वाच्या बाबतींचीही थट्टा आणि टिंगलबाजी करण्याची लोकांची प्रवृत्ति वाढत चाललेली दिसते. या उत्सवांतच पहा. व्याख्यान असलें तर व्याख्यात्यांपुढें बिचारा गणपति आणि चिटणीस हेच श्रोते, तर शेजारच्या नकलांच्या कार्यक्रमाला इतकी गर्दी आणि खेंचाखेंच कीं, शेवटीं नकलाकाराला टेबलावर उभें राहूनच आपल्या बाष्कळपणाचें प्रदर्शन करावें लागतें.

उपहास, विनोद, हे विचारांत समतोलपणा येण्यासाठीं अवश्य आहेत, हें मला मान्य आहे—पण तीं केवळ विचारांचीं तोंडी लावणीं—केवळ चटण्या कोशिंबिरीच खाऊन राहूं, आणि इतर पौष्टिक अन्न अगदीं नकोच असें कोणी म्हणूं लागला तर ? आणि गंभीरपणें कोणी इशारा दिला कीं 'आले मोठे शिष्ट,' म्हणून त्याची ही रेवडी उडालीच. या भीतिनें चांगले चांगले विचारकर्तेहि हल्लींच्या समाज आणि वाङ्मयकार्यापासून फटकून राहूं लागले आहेत हें मीं पाहिलें आहे.

जाऊंदे. लहान तोंडी कशाला मोठे घांस हवेत आपल्याला? इकडील गणेशोत्सव पाहून मनांत आलेले हे विचार—अगदी रहावेना म्हणून तुझ्यापुढें उघड केले एवढेंच. तिकडे या उत्सवाचें रूप कसें आहे याची मला कल्पना नाहीं. सवड असल्यास पुढील पत्रांत कळीव.

दुसरें म्हणजे सोबत चिठ्ठीवर मला अत्यंत जरूर असलेल्या तीन पुस्तकांचीं व त्यांच्या लेखकांचीं नांवें दिलीं आहेत. इकडील साऱ्या लायब्रऱ्या धुंडाळूनही ती मला मिळालीं नाहींत कुठें यादींत नांवें दिसलींच तर वाचायला गेलीं, किंवा हरवलीं अशीं उत्तरें माझ्या वांट्याला आलीं. शेवटीं कंटाळून तुला लिहित आहे—तिकडे मिळालीं तर ताबडतोब पाठीव. आठ दिवसांत परत करीन. तुझ्या उत्तराची वाट पहात आहे.

तुझा

**अरविंद.**

# २३ केरांतलें मुसळ !

लॅबर्नेम् रोड
मुंबई

प्रिय सुधास

सुनंदेचा सा. नमस्कार.

तुझीं मागचीं तीन लांबलचक एकामागून एक टाकलेलीं पत्रं पोंचलीं. त्यांतलं तत्त्वज्ञान आणि विचारांची पिंजण पाहून कुणा भलत्याचीं पत्रें चुकून माझ्याकडे तर आलीं नाहींत म्हणून मला शंकाच वाटूं लागली. मी पहिल्या पत्रांत तुला ' काकूबाई ' म्हणून नांव दिलं होतं तें खरं ठरलंच म्हणायचं-शेवटीं आपल्या गांभीर्याच्या वळणावर गेलीसच तूं.

अन् कायग ? हें एकदमच हें लग्नाच्या मागण्याचं पीक भलत्याकाळीं कुठून उगवलं ? तुला जशी कुणा अशोक नांवाच्या अनोळखी ऑफिसरनें मागणी घातली आहे, त्याप्रमाणें इकडच्या पोर्टट्रस्ट मधल्या कुणा इंजिनीयर कडून माझ्याबद्दल बाबांकडेही एक मागणी आली आहे. अशोकच्या मागणीनें गोंधळून जाऊन तुझी अगदीं त्रेधा उडाली, आणि त्यांना नकार देऊनही तो कां द्यावा लागला याबद्दल अगदीं विस्तारानं भाष्य केलंस तें वाचून फार मौज वाटली मला. अशोक इतके देखणे असूनही तुला कां नकोसे वाटतात हें तुला कळलं नाहीं आणि त्या नावडीच्या बुडाशीं असणाऱ्या अनेक भावनांचं तूं आपल्या परीनं विश्लेषण का काय म्हणतात तें केलंस तें चुकीचं असं कसं म्हणूं मी ?

पण केरांतल्या सुया वेंचतांना चांगलं भलं मोठं मुसळ तुझ्या नजरेआड झालं हें मात्र खरं. तुला अजून स्पष्टपणें कळलं नसलं तरी खरी गोष्ट ही कीं न कळतांच अरविंदांवर तुझं आधींच प्रेम बसलेलं असावं, आणि अशा रीतीनें एक ठिकाणीं आधींच मन गेल्यानें अशोकांची मागणी तुला इतकी अप्रिय वाटून शहारे आले तुझ्या अंगावर. त्यांच्याबद्दल तूं केलेली मल्लीनाथी खरी धरली तरी त्यांना नकार देण्यासाठीं, आणि स्वतःची मारून मुटकून खात्री करण्यासाठीं तूं सारीं खोलांतलीं कारणं शोधून काढलीस असंच मला वाटतं. मात्र माझं ऐकशील तर

अरविंदाच्या प्रतिशब्दाबद्दल खात्री असल्याखेरीज उगीच मनांत कांहीं आशा बांधून ठेवूं नकोस.

आशांचा मनांत मांडलेला संसार एकदां जर विस्कटला, तर तो साऱ्या जन्मांत पुन्हां मनासारखा सरळ होत नाहीं, असं माझ्या एकदोन मैत्रिणींच्या संसारांवरून मला दिसून आलं आहे.

अन् हे बघ ! अरविंद आहे सांगलीचा—खुटकन् वडिलांची तार यायची, अन् घरीं जाऊन चार दिवसांनीं करवतीकांठी धोतर नेसून, मनगटावर सोन्याचं घड्याळ बांधून यायचा, अन् तुला दादही नसायची त्याची. तेव्हां आतां म्हटलं नुसतं मनांतलं चोरटं, बुजरं प्रेम नको तुझं. माझं तर मत आहे कीं, उगीच लाडं लाडं, लाजरेपणानं हे प्रेमाचे शब्द बोलण्यापेक्षां आयुष्यांतला एक महत्त्वाचा प्रसंग म्हणून आपलं सरळ इतर गोष्टींसारखं बोलणं करावं—एक घाव नी दोन तुकडे—इतकं लाजणं, मुरडणं नी चोरणं हवंय् कशाला ?

माझंच बघ, तो बाबांकडे मागणी घालणारा इंजीनियर परवां आला होता चहाला. बाबांच्या खोलींत बसून कांहींतरी हळुहळू गोष्टी चालल्या होत्या त्यांच्या. अन् मी गेलें तडक आंत त्यांनीं न बोलावतांच, अन् त्यांच्यासमोर खुर्ची ओढून बसलें. विचारलं त्यांनाच 'तुम्हाला— माझ्याशीं लग्न करायचं आहे कीं माझ्या बाबांशीं ?—नाहीं, तुम्ही आपले सारखे बाबांशी कानगोष्टी करतांना दिसतां म्हणून विचारलं—आर्धी ओळख देखही नाहीं तुमची माझी, अन् एकदम इतक्या सहजपणें हा लग्नाचा सौदा जुळवायला लागलांत तुम्ही—माझ्या भावनांची विचारांची कांहीं किंमत वाटली कां तुम्हाला ? पैशानं, अधिकारानं जीवंत पुतळ्या विकत मिळतात, सहचारिणी नव्हे—रस्ता चुकलांत तुम्ही—मागणी घालायची असली पुन्हां, तर सरळ माझ्याकडे या." अन् गोरामोरा होऊन तो जो तेव्हांपासून आपल्या इंजिनच्या बॉयलरमध्यें दडी मारून बसला आहे तो पुन्हां फिरकला नाहीं इकडे ! !

तुझी

सुनंदा.

# २४ गुजरातेंतील गणपति

सुरसागर नजीक

बडोदें

मित्रवर्य अरविंद

यास न. वि. वि.

तुझें मागील लांबलचक पत्र पावलें. प्रेमाबद्दल तूं जी मल्लीनाथी केलीस ती मला पुष्कळशीं कळते. पण एकंदरीत तुझ्या माझ्या स्वभावांतला फरक आहे, त्याप्रमाणें आपल्या वागण्यांतही फरक रहाणारच. तरीही तुझा ध्येयवाद पाहून तुझ्याबद्दल अभिमान वाटतो आणि कौतुकही वाटतें. तिकडच्या गणेशोत्सवांतल्या प्रकारांबद्दलचे तुझे विचार मात्र अनपेक्षित होते. ज्या शहरांत उच्च ध्येयांनीं प्रेरित होऊन हा उत्सव प्रथम निघाला, त्या शहरांतच त्याचा केवळ मनोरंजनाचा उरूस व्हावा हें केवढें दुर्भाग्य ! त्या मानानें कोणताही गाजावाजा न करतां बडोद्यांतल्या गणेशोत्सवानें चांगलें कार्य चालविलें आहे म्हणायचें.

इकडे गुजराती वर्गांत गणेशोत्सवाबद्दल फारशी आस्था दिसत नाहीं. मात्र या निमित्तानें सारा महाराष्ट्रीय वर्ग एकत्र जमून, उत्सवाचें मूळ उद्दिष्ट निदान इथें तरी सिद्धीस जातें यांत शंका नाहीं. इथल्या दर मराठी आळींत, आणि दर आखाड्यांत गणपतीची स्थापना होतांना लाठी–काठी–लेझीम–बाजांबरोबर निघालेली गणरायांची मिरवणूक पहायला तूं इथें हवा होतास. व्याख्यानें, पोवाडे, खेळांचे सामने वगैरे प्रकार इथें थोड्या प्रमाणांत होतात, पण त्यांच्या विरळपणामुळेंच त्यांचें महत्त्व वाटतें–तिकडल्यासारखी ‘एक ना धड भाराभर चिंध्या’ ही स्थिति सुदैवानें येथें नाहीं. गणेशोत्सवांत पुण्याचे मेळे आणि मुंबईचीं गाणीं प्रसिद्ध आहेत; त्याप्रमाणें इकडला सरकारी उत्सव प्रसिद्ध आहे. येथील ‘**इंदुमती–महालांत**’ दहा दिवसपर्यंत, रात्रीं आठ वाजेपासून सकाळीं चारवाजेपर्यंत सुतासारखे आंखीव कार्यक्रम अचूक पार पडतात, आणि साऱ्यांना एक पैही खर्च न करतां ते पहायला, ऐकायला मिळतात हें विशेष आहे. अस्सल थाटाचे गोंधळी, भराडी, भाटचारणांचे पोवाडे यावेळींच ऐकायला मिळतात.

कडकडीत तापविलेला डफ, टीपेवर खेंचून लावलेली तुणतुण्याची तार, आणि खणखणीत खंजरी; याच पिढीजात साथीवर, खड्या सुरावर म्हटलेले अस्सल शाहीरी घराण्यांतल्या बाडांतले पोवाडे एकदां ऐकायला हवेत. ते एकदा ऐकले म्हणजे मग—डफ तुणतुणें मागें उगीच नांवाला ठेवून, हार्मोनियमच्या साथीवर, बारीक किरट्या आवाजांत स्वतःचे कृत्रिम मोडके तोडके पोवाडे गाऊन 'शाहीर' म्हणविणाऱ्यांचे पोवाडेगायन म्हणजे या प्रकाराचें विडम्बनच वाटूं लागतें. जुन्या काळचीं ललितें इथेंच पहायला मिळतात—अस्सल तंजावरकडचें तांडवनृत्य, कथ्थकी नाच यांचीं दुर्मिळ दृश्येंही या समारंभांत पहायला मिळतात. साऱ्या सरकारी 'कलावंत खात्या'चा मुजरा होतो. खाशा स्वाऱ्यांशिवाय ज्यांचा कधीं सूरही दुसऱ्याला ऐकायला मिळणार नाहीं अशा लावण्यमयी गायिकांचीं गाणीं, बीनकार, सरोदिये, सारंगिये यांचें कौशल्य! साऱ्या कलांचा मीनाबाजार भरलेला असतो. अशा रीतीनें मनोरंजक आणि उद्बोधक अशा दोन्ही तऱ्हेच्या कार्यक्रमांची ही पर्वणीच असते.

तूं मागितलेलीं पुस्तकें इकडल्या सेंट्रल लायब्ररींत तेव्हांच सांपडलीं. तीं रजिस्टर पोस्टानें पाठवीत आहे. मात्र तीं पंधरा दिवसाच्या आंत परत पाठीव नाहीं तर फुकट दंड भरावा लागून नांवही उगीच कमी होईल माझें—बाकी तुझ्यासारख्या व्यवस्थित मित्राकडून असें होणें शक्यच नाहीं म्हणा. नारायणाचें बरेच दिवसांत पत्र नाहीं; त्यालाही आज पत्र टाकीत आहे.

तुझा,

**वसंत.**

# २५ संमेलनाचा सोहळा

पुणें

अचला भांडारकर

हिला सुधाचा सप्रेम नमस्कार वि. वि.

काल तुझं पत्र पाहिलं अन् मी नवलच केलं, ही कुठली सुंठ फुलली म्हणून ! आतांपर्यंत तुझं एकही पत्र नव्हतं–तूं अन् सुनंदा आपल्या नेहमीं गळ्यांत गळा घालून फिरायच्या. ती असलं म्हणजे झालं. बिचाऱ्या परदेशी सुधाची कुणाला आठवण होणार ? त्यांतूनही मी समजलेंच. तुझ्या सुनंदेचा मुक्काम माझ्याकडे होता म्हणून तरी तुझं हें पत्र–गाड्याबरोबर नळ्याची यात्रा–तिच्या पत्रांबरोबर माझ्यासाठींही एक चिठ्ठी–जाऊं दे. पत्र लिहिण्यांत मी तुझ्यासारखी 'हिमटी' नाहीं–लांबलचक पत्र लिहिण्याची हौसच आहे मला; त्यामुळें इकडच्या संमेलनाबद्दल तूं विचारलीस ती सारी–तुझ्या अपेक्षेच्या पलीकडे सविस्तर माहिती मी या पत्रांत लिहून पाठविणार आहे. मला लिहिण्याचा कंटाळा येणार नाहीं, तुला वाचण्याचा येऊं नये म्हणजे झालं.

पहिली टर्म जवळ जवळ संपलीच आतां. संमेलनाची आवराआवर केली कीं सहामाही परिक्षा होऊन घरीं जायल्या साऱ्या मोकळ्या. दिल्लीला जातांना मुंबईला उतरून, साऱ्यांना भेटून पुढें जाणार आहे मी. माझ्या प्रकृतीची तूं विचारपूस केलीस–आतां प्रत्यक्ष दिसेलच झालेला फरक.

कॉलेजचं संमेलन आणि एकादा लग्नसमारंभ यांत बराच सारखेपणा दिसतो मला. आधीं यंदा 'कर्तव्य' आहे कीं नाहीं यावरच खडाजंगी. बरं यंदा 'उरकायचंच' म्हणून ठरलं म्हणजे मग साऱ्यांत मोठा प्रश्न 'योग्य व्यक्तीच्या' ( अध्यक्षाच्या ) निवडीचा. 'स्थळां'च्या याद्या व्हायच्या, त्यांतून एकेकांचे नकार यायचे–अटी यायच्या, मान-पानांनीं नकोसं व्हायचं. या याद्यांतून नावं गळत गळत शेवटीं, ज्यानं आपले तीळ तांदुळ खाल्ले असतील, ज्याच्याशीं मागल्या जन्माचे ऋणानु-बंध असतील, ती व्यक्ति लाभायची, स्वीकाराचा साखरपुडा व्हायचा.

अन् त्यावर्षीच्या संमेलन कन्यकेशीं त्यांचं लग्न व्हायचं. कॉलेजचं सभागृह हाच लग्नमंडप, परिचय करून देणारे प्रिन्सिपॉल हे उपाध्याय, विद्यार्थिनी या 'करवल्या', विद्यार्थि अन् अध्यापक हे वऱ्हाडी ! मग नाटक चेटक, खेळ गाणीं, जेवणाऱ्या पंक्ति, ताशे चौघडे, हसणीं खिदळणीं अन् कडकडून भांडणीं; अबोले, अगदीं लग्न घरासारखेंच. प्रतिनिधि, स्वयंसेवक, सेविकांची घाई, धांवपळ, ओरडून ओरडून बसलेले आवाज, सारा हुबेहूब तोच प्रकार, पण थांबवतेंच बाई हें रूपक; नाहींतर तूं खंवचटपणें म्हणायचीस कीं पुणं म्हणजे महाराष्ट्राची लग्नाची बाजारपेठ, त्यानं मलाही लग्नाच्या रूपकाशिवाय कांहीं सुचत नाहीं म्हणून. त्यांतून मुंबईची उपहासाची वृत्ति तुझ्या अंगांत मुरलेली.

वरचं माझं रूपक कांहीं बाबतींत लंगडं असलं तरी एकंदरींत गोंधळ नी बेशिस्तीच्या बाबतींत खरं ठरेल असं मागील सांगोवांगी हकीकतींवरून मला वाटत होतें. पण यावर्षी अगदीं जादूची कांडी फिरल्यागत फरक झाला होता या संमेलनांत. शेवटीं कळलं कीं या साऱ्या शिस्तवार योजनांचं श्रेय अरविंदांकडेच होतं. मुनंदा तिकडे आल्यावर सांगेल कोण आहेत ते. मॅनेजिंग कमिटींत निवडून आल्यापासून ते अन् चेअरमन् यांच्या कानगोष्टी चालल्या होत्या. त्या इतक्या गुप्तरीतीनें कीं त्यानीं शेवटपर्यंत मलाही थांग लागूं दिला नाहीं. आतां एकदां चांगली रागावणार आहे त्यांच्यावर ही गोष्ट काढून. दररोज साऱ्या स्वयंसेवकांच्या सेविकांच्या कवायती व्हायच्या, पण त्यापुढें सारेंच गुलदस्तांत. शेवटीं एकदम संमेलनाचा कार्यक्रम फळ्यावर लागला अन् मग जो तो आश्चर्य करूं लागला ही काय नवी टूम आहे म्हणून !

संमेलनाच्या दिवशीं पहाटें चौघडा वाजूं लागला आणि उपहारापासून या वर्षीच्या नवीन तऱ्हेची चुणूक साऱ्यांना दिसून आली. बहुतेक ठिकाणचा कार्यक्रम म्हणजे साऱ्या विद्यार्थ्यांनीं गर्दी खेंचाखेंच करून, मेंढ्यासारखं जमायचं, अन् दाराशीं गर्दी करून, उघड्यावर व्यवस्था असेल तर बाजूची लाकडं मोडून, आंत घुसूनच, फराळावर तुटून पडायचं— शिस्तवारपणा दाखवूं पहाणाऱ्यांच्या वांट्याला फक्त रिकाम्या कपबशा उरायच्या—अन् त्याही बहुतेक फुटक्याच ! या वेळीं साराच प्रकार निराळा.

सारे विद्यार्थी ग्राउंडवर जमतात तों दोऱ्या आंखून वर नांवाच्या पताका फडकणाऱ्या प्रत्येक वर्गाच्या जागा त्यांची वाट पहात होत्या. प्रत्येक जागेपुढें भला मोठा मेगाफोनचा कर्णा घेऊन स्वयंसेवक सूचना देत होते. अघाडीला त्या त्या वर्गातले यू. टी. सीचे विद्यार्थी आणि स्वयंसेवक यांनी प्रत्येक वर्गातल्या विद्यार्थ्यांची शिस्तवार सैन्याच्या तुकडी सारखी रचना केली. मुख्य पाहुणे उपाहाराच्या जागेशीं येऊन उभे राहिल्यावर, प्रत्येक वर्गातल्या विद्यार्थ्यांनीं त्यांच्या पुढून शिस्तीनें ' मार्च पास्टची रपेट ' करून आपली ठराविक जागा घेतली. दोघा विद्यार्थिनींनीं उंचवर धरलेली वर्गाची पताका त्यांच्या जवळून जातांना त्यांना सलामी देऊन लवविण्यांत आली. एफ्. वाय्. इंटर बी. ए. बी. एस्. सी मिळून हजार विद्यार्थी असतील. पण स्वयंसेवकांनीं इतकी चोख रचना केली त्यांची कीं, सारे त्याच रांगानीं परत जातांना टेकडीवरून एका सिनेमा कंपनीनें त्यांची छोटीशी फिल्मही घेतली. उपाहारानंतर आम्ही सारे सभागृहांत व्याख्यानासाठी जमलों.

दर वर्षींचें संमेलनाचें भाषण म्हणजे इतक्या गोंगाटांत, टाळ्या, शिट्या, स्टँपिंगच्या गोंधळांत पार पडायचें कीं, तें आटपल्यावर बिचाऱ्या पाहुण्याला, आणि व्यवस्था ठेवणाऱ्या मंडळींना एखादा दुखरा दांत काढून टाकल्याइतकें हायसें होत असेल !

पण या वेळीं सभागृहांतही प्रत्येक वर्गाला जागा आंखून दिलेली. प्रत्येक रांगेची सुरुवात, शेवट आणि मध्यावर त्या त्या वर्गातले स्वयंसेवक आणि यू. टी. सीचे विद्यार्थि उभे केले असून त्यांच्याकडूनच शिस्त आणि शांतता राखली गेली; आणि अध्यापक वर्गाच्या दडपशाहींची ठरीव तक्रार करून, बेदिली उत्पन्न करण्याचा उपद्व्यापी विद्यार्थ्यांचा डावही फसला. ही सारी नवीन व्यवस्था पाहून मुख्य पाहुणेही इतके खूष झाले कीं, त्यांचा उपदेशाचा मुख्य विषय बाजूलाच राहून त्यांनीं या शिस्तवार दृश्यावरून सुचलेले विचार बोलून दाखविले—व्याख्यानाच्या शेवटीं त्यांनीं टाकलेल्या प्रश्नांनीं विद्यार्थ्यांबरोबर अध्यापकांनाही बराच विचार करावा लागेल असें मला वाटतें.

शेवटीं आभाराचें भाषण करतांना प्रिन्सीपालांनीं व्याख्यात्यांचे आभार

मोकळेपणानें अरविंदाकडे पोंचते करून जाहीर केलें कीं, या साऱ्या व्यवस्थेचें श्रेय अरविंदांच्या योजनेला असून आपण फक्त त्यांना शक्य तितकी मदत केली एवढेंच. त्यानंतर एवढा टाळ्यांचा कडकडाट झाला कीं, अगदीं छप्पर कोसळल्याचा भास झाला.

मात्र या शिस्तवारपणानें आमच्या आनंदांत व्यत्यय आला असें समजूं नकोस. खुल्या दिलानें मौजेनें आनंद करायचा म्हणजे कांहीं चौखुरीं धांवून, खिंकाळून, लाथाळीचा गोंधळच केला पाहिजे असें नाहीं. साऱ्या कार्यक्रमांत उल्हासाचें वातावरण होतेंच, पण उगीच गोंगाट करून सारी बचेरीच करायची ह्या प्रवृत्तीला वावच मिळाला नाहीं.

या साऱ्यांत सुनंदा मुद्दाम मुंबईहून आल्यानें दुधांत साखर, नी श्रीखंडांत केशर पडल्यागत झालें.

रीतसर मराठी, गुजराती नाटकें हौसेनें पार पडलीं. त्यांत अरविंदांनीं माझ्याही डोक्यावर एक ओझें ठेवून दिलें होतें. तें म्हणजे खास विद्यार्थिनींच्या '**रासगीतां**'चा कार्यक्रम बसवून घेण्याचें. यावेळीं मला तुम्हा साऱ्यांची फार आठवण झाली. या रासांची खरी पुढारी म्हणजे हंसा देसाई, नंतर तूं, नी सुनंदा——मी आपली तुमच्या मागून. बाकीं काव्य, संगीत आणि नृत्य यांचा किती सुरेख संगम झाला आहे या रासगीतांत? गुजरातनें साऱ्या हिंदुस्थानाला ही एकच कलेची देणगी दिली असती तरी तिचें महत्त्व सर्वश्रेष्ठ राहिलें असतें.

अजून आठवतात मला ते मुंबईचे दिवस. शारदी शुक्लपक्षांत हंसानें आपल्याला अगदीं आग्रहानें ओढून न्यावें त्या बायकांच्या रासांत. तिनें '**दयाराम**'पासून थेट हल्लीच्या '**न्हानालाल** कवि'पर्यंतचे नादमधुर रास निवडून गात जावें, आणि मागून आपण साऱ्यांनीं ते म्हणत जावे—'रास झेलणें' म्हणतात गुजरातींत याला नव्हे? पण इकडे सांताक्रूझच्या रासमंडळाच्या गुजराती प्लेटी लावून, कसेबसे तीन रास मी रेसिडेन्सीच्या मुलींकडून बसवून घेतले. आम्ही साऱ्यांनीं पांढऱ्या शुभ्र गुजराती वेशांत त्यांचा कार्यक्रम केला——निरनिराळ्या रंगांचे झोत टाकण्याची व्यवस्था झाल्यानें तो कार्यक्रम अत्यंत श्रवणीय, प्रेक्षणीय नी यशस्वी होऊन साऱ्या पुण्याच्या तोंडी झाला होता.

साऱ्यांत नवल असेल तर तें सुनंदानें चार दिवसांत इकडे मिळविलेल्या लोकप्रियतेचं.

चार दिवस आमच्या रेसिडेन्सींत नुसती विजेसारखी तळपत होती ती. '**रेसिडेन्सीची राणी**' म्हणून साऱ्यांनीं तिचं नांवही ठेवून दिलं तेवढ्यांत. अगदीं पहाटेपासून माझ्या खोलींत तिच्याभोंवतीं मुलींचा घोळका जमायचा तो ती बापडी रात्रीं झोंपी जाईपर्यंत. तिच्या खेळकर विनोदानं हंसून हंसून, ठसका लागून, साऱ्यांचे डोळे वाहूं लागायचे!

तेवढ्यांत टेहळणी करून आमच्या साऱ्या प्रोफेसरांना एक एक गमतीचं नांव देऊन गेली आहे ती. साऱ्यांच्या तोंडी झालींत तीं नांवं. जेवणांत देखील आडवा पदर खोंवून श्रीखंड वाढायला आम्हां साऱ्यांच्या पुढें तिचा पहिला नंबर! अगदीं तोलून मापून खाणाऱ्या प्रोफेसरांपासून, नुसतं बोटांनीं उष्टावणाऱ्या स्कॉलर काडीजवानांपर्यंत साऱ्यांनीं त्या दिवशीं निदान दुप्पट तरी जेवण केलं असेल, तरी शेवटपर्यंत ती थकली नाहीं वाढून! मुलींच्या पंक्तींत तर अगदीं विचारायला नको--

तिथंच बसल्या बसल्या आमच्या साऱ्या प्रोफेसरांवर आणि मैत्रिणींवर ओंव्या रचून तिनं म्हणून दाखविल्या अन् अशा हंसल्या साऱ्या, कीं त्यांनीं सगळा हॉलच डोक्यावर घेतला होता; आणि साऱ्या खिडक्यांतून डोकावून पहाणाऱ्या विद्यार्थ्यांच्या चेहऱ्यांची नुसती प्रभावळ लागली होती—

साऱ्यांनीं अगदीं भीड घातली तिला कीं पुढच्या टर्मला इकडच्या कॉलेजला या म्हणून. ती आली तेव्हां मी एकटी गेलें होतें तिला उतरून घ्यायला, पण ती गेली तेव्हां मात्र पन्नास मुलींची फौज जमली होती प्लॅटफॉर्मवर तिला पोंचवायला. असा चटका लावून ती आजच परत गेली आहे.

तुझी

**सुधा.**

# २६ " कच्चितप्रश्न "

मित्रवर्य नारायण यांस

अरविंदाचा नमस्कार वि. वि.

कालच आमचें संमेलन यशस्वी रीतीनें पार पडलें. त्यांतील बरीच कामगिरी माझ्यावरही असल्यानें यापूर्वी तुला पत्र लिहितां आलें नाहीं. आतांही त्या कामाचा शीण इतका आला आहे कीं, तुझीं हजार पत्रं बाजूला ठेवून कुशल प्रश्नांवरच या पत्राचा शेवट करणार आहे. शिवाय आतां टर्म संपत आल्यानें परीक्षा आटपून मी आतां लवकरच सांगलीलाच येणार आहे. तेथें सावकाश तुझ्या सर्व प्रश्नाचीं उत्तरें देईन.

दुसरें म्हणजे आमच्या संमेलन प्रसंगीं डॉ. चक्रवर्ती यांचें झालेलें भाषण. त्या भाषणाचा इकडील अध्यापक व विद्यार्थी वर्गावर काय परिणाम झाला असेल, याची मला नीटशी कल्पना नाहीं; परंतु प्रो. सुधाकर आणि माझ्या बोलण्यावरून बऱ्याच मंडळींना व्याख्यात्यांचे सडेतोड प्रश्न फारसे रुचले नसावेत असें दिसून आलें. परंतु खरें तर मला त्यांच्या सरळ सवालांत कोणालाही वैषम्य वाटेल, अपमान वाटेल, उणेपणा वाटेल असें कांहींही आढळलें नाही. अध्यापक, चालक, विद्यार्थीवर्ग सर्वांनीं आत्म-निरीक्षण करून अंतःशुद्धि करावी आणि उत्तरोत्तर प्रगति करावी हाच त्यांचा हेतू. येथील '**सायंकाळ**' पत्रांतील त्यांच्या भाषणाच्या दुसऱ्या भागाचें कात्रण सोबत पाठवीत आहे. (पहिल्या भागांत त्याचे सामान्य शिस्तीबद्दल वगैरे विचार आहेत तो भाग पाठविला नाहीं.) त्याबद्दल तूंही विचार करून ठेव. आतां लवकरच समक्ष भेटूं.

—अरविंद

# २७ पुणें कॉलेजांतील डॉ. चक्रवर्तींचें भाषण.

## "कच्चित्प्रश्न" ( भाग २ रा. )

"........मी इथें आलों आहे, तो उपदेश करण्यासाठीं नव्हे, **विचारण्यासाठीं**. विचारणें–याचे दोन अर्थ होतात–विचार करणें आणि प्रश्न करणें. या दोन्ही अर्थांनीं मी हा शब्द वापरीत आहे. बाकी उपदेश काय ? इतकीं वर्षें उपदेश चाललेच आहेत. एका कानानें ऐकून दुसऱ्या कानानें सोडून द्यावयाचें बोलणें म्हणजे उपदेश अशी एक नवी व्याख्याच हल्लीं होऊं पहात आहे.

विद्यार्थी व अध्यापकवर्ग यांनीं खोल विचार करावा, आत्मनिरीक्षण करावें–आपण ज्या मार्गानें चाललों आहोंत–ज्या रीतीनें कार्य करीत आहोंत तो प्रकार योग्य आहे किंवा नाहीं याचा मनाशीं पडताळा पहावा अशी माझी इच्छा आहे.

**आजच्या कॉलेज-जीवनाशीं निगडित झालेल्या सर्वांना उद्देशून माझें बोलणें आहे. कोणतीही व्यक्ति, संस्था किंवा वर्ग यांना उद्देशून नव्हे.** हा पोकळ उपदेश नव्हे. सूडबुद्धि नव्हे किंवा उणें काढण्याची प्रवृत्ति नव्हे. हें समजून मगच माझें बोलणें ऐका.

महाभारतांतील सभापर्वांत '**कच्चित्प्रश्न**' नांवाचें एक लहानसें सुंदर आख्यान आहे. नारद मुनींनीं धर्मराजाला हे अनेक प्रश्न विचारले आहेत. इंग्रजींत 'क्वश्चन् ऑफ् अॅपील' म्हणतात; त्याप्रमाणें प्रत्येक प्रश्नाचें उत्तर गृहीत धरलेलें आहे. मात्र त्याप्रमाणें परिस्थिति आहे किंवा नाहीं याचा निर्णय धर्मराजाप्रमाणें प्रत्येकानें द्यावयाचा आहे.

आत्मनिरीक्षण करून, सदसद्विवेक बुद्धीला, परमेश्वराला साक्ष ठेवून त्याचीं उत्तरें द्या—कुठं चुकत असलें तर राग किंवा लाज धरूं नका—खरीं उत्तरें द्या, आणि चूक सुधारण्याच्या प्रयत्नाला लागा—अनुकूल उत्तरें देतां आलीं तर मला त्यांत आनंद, समाधान आणि अभिमानच वाटेल.

प्रथम अध्यापक आणि कॉलेजांच्या चालक वर्गाला माझे हे सवाल आहेत—

तुमच्या चालक मंडळींत कॉलेजच्या कार्यासाठीं एकोपा आहेना ? चालकांतील पक्षांच्या दुहीनें विद्यार्थ्यांचें आणि संस्थेच्या हिताचें अहित तर होत नाहींना ?

—तुमच्या अंतर्गत कार्यपद्धतीमुळें विद्यार्थ्यांचा अभ्यास व व्यवसायां-कडे तुमचें दुर्लक्ष्य होत नाहींना ?

—अध्यापक व चालक मंडळींतील उच्चनीच भेदामुळें, आजीव किंवा वरिष्ठ, आणि हंगामी किंवा कायम नोकरवर्ग, प्रोफेसर—लेक्चरर—ट्यूटर—यांतील दर्जाच्या फरकामुळें, कोणाला अन्याय किंवा अपमान सहन करावा लागत नाहींना ? तत्त्वाच्या नांवाखालीं वैयक्तिक किंवा पक्षविषयक आवडी निवडी, मित्रत्व किंवा शत्रुत्वाचे डाव खेळले जात नाहीं ना ?

—तरुण विद्यार्थिवर्गाच्या आकांक्षा, ध्येयवृत्ति, विचार यांचा सहानुभूतीनें विचार करून, त्यांच्याशीं समरस होण्याचा विचार तुम्ही करीत आहांत ना ?

—बौद्धिक शिक्षणाबरोबरच कांहीं व्यावसायिक व्यावहारिक पद्धतीच्या शिक्षणाकडेही तुमचें लक्ष्य आहे ना ?

—अध्यापक वर्ग आणि विद्यार्थिवर्ग यांमध्यें सलोख्याचें, मित्रत्वाचें मोकळेपणाचें, सहकार्याचें वातावरण खेळतें आहे ना ?

—तुमच्या विद्यालयांतील कार्यपद्धतीचे किंवा विद्यार्थ्यांच्या हिताचे प्रश्न कायम रीतीनें सोडविण्यापूर्वी तुम्ही विद्यार्थ्यांबरोबर सहविचार करीत आहां ना ?

—तुमच्या विद्यालयांत येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या सुखसोयींकडे, त्यांच्या अडचणींकडे तुमचें योग्य लक्ष आहे ना ?

—तुमच्या पुस्तकालयांतील ग्रंथ केवळ अध्यापकांचीच मिरासदारी न होतां विद्यार्थ्यांना त्यांचा पूर्ण उपयोग होत आहे ना ?

—सुटीच्या वेळेंत विश्रांति घेण्यासाठीं विद्यार्थ्यांना सोइस्कर अशा

जागा, स्वच्छ आणि स्वस्त अशीं उपाहाराचीं ठिकाणें यांची तुमच्या विद्यालयांत व्यवस्था आहे ना ?

—विद्यार्थ्यांच्या अडचणी, तक्रारी, कूटप्रश्न यांची अध्यापक व चालक वर्गाकडून योग्य दाद घेतली जात आहे ना ?

—डामडौलाच्या व खर्चिक समारंभांत विद्यालयाच्या पैशाची उगीच उधळपट्टी होत नाहीं ना ? दिखाऊ समारंभ, प्रचंड इमारती किंवा मौल्यवान् फर्नीचर यांपेक्षां लायक व गरीब विद्यार्थ्यांना मदत देण्याकडे तुमच्या शिलकीचा उपयोग होत आहे ना ?

—तुमच्या सहकारी अध्यापकांना मतस्वातंत्र्य, लेखन व भाषण स्वातंत्र्य आहे ना ?

—नोकरीच्या लाचारीनें त्यांच्यावर कोणतेंही दडपण आणलें जात नाहीं ना ?

—कार्यक्षमता ही एकच कसोटी त्यांच्याबद्दलच्या निर्णयांना लावली जात आहे ना ?

विद्यार्थ्यांनाही माझे असेच प्रश्न आहेत, त्यांचींही त्यांनीं सचोटीनें उत्तरें द्यावींत.

—पालकांनीं निढळाच्या घामानें खपून मिळविलेला पैसा तुमच्या शिक्षणासाठीं खर्चिला जात आहे, याची जाणीव तुम्हाला सतत आहे ना ? तुमच्या खिशांतील प्रत्येक पैसा बाहेर काढतांना तो निदान स्वतःच्या, देशबांधवांच्या हितार्थ उपयोगी पडणार आहे, याची तुम्ही खात्री करून घेतली आहे ना ? चैनीपेक्षां उपयुक्ततेकडे तुमचें लक्ष्य आहे ना ?

—विद्यालयांतील बौद्धिक शिक्षणाबरोबरच व्यावसायिक हुन्नर किंवा कला संपादन करण्याकडे तुम्ही फावल्या वेळाचा उपयोग करीत आहां ना ?

—बौद्धिक बलाबरोबर शारीरिक व नैतिक बलाची जोपासना करण्याकडे तुमचें लक्ष्य आहे ना ?

तुम्हीं घेत असलेलें शिक्षण, त्यापासून होणारे फायदे हे केवळ तुमच्या खाजगी जीवनाकरतांच नसून, तुमच्या जाति, समाज, देश आणि धर्माच्या संघटनेकडे आणि सेवेकडेही त्यांचा कांहीं भाग वेंचला पाहिजे ही जाणीव तुम्हांला सतत आहे ना ?

—विद्यार्जनाच्या वेळीं, वर्गात असतांना, समारंभाचे वेळीं तुमच्या-कडून बेजबाबदारपणाचें, बेशिस्तपणाचें वर्तन होत नाहीं ना ?

—शेंकडा ब्याण्णव प्रमाणांत अशिक्षित असलेल्या आपल्या देशांतील मूठभर सुशिक्षित म्हणून तुमच्यावर असलेल्या जबाबदारीची तुम्हांला जाणीव आहे ना ?

—विद्यालयाच्या बाहेरही कोणत्याही प्रसंगीं तुमचें वर्तन सभ्यतेस सोडून किंवा सुशिक्षित तरुणांस न साजेसें असें होत नाहीं ना ?

—शारीरिक श्रम किंवा कष्टाच्या व्यवसायांकडे, व त्या व्यवसायांतील श्रमिकांकडे तुम्ही तुच्छतेनें पहात नाहीं ना ?

—तुमच्या विद्यालयांतील स्त्रीवर्गाबद्दल तुम्हांला योग्य तो आदर, व योग्य तें दाक्षिण्य आहे ना ? त्यांबद्दल अनुदार भाषण, किंवा वर्तन तुमच्याकडून होत नाहीं ना ?

सामाजिक, धार्मिक व राष्ट्रीय चळवळींकडे तुमचें योग्य तें लक्ष्य आहे ना ? विद्यार्थ्यांना करतां येईल तेवढी योग्य कामगिरी करण्यांत तुम्ही मागें पाय घेत नाहीं ना ?

——आजचा विद्यार्थीवर्ग विस्कळित, बेफिकीर, भांडखोर आणि चैनी वृत्तीचा आहे; या कांहीं टीकाकारांच्या अनुदार, कुत्सित टीकेचीही तुम्हांला जाणीव आहे ना ? ती टीका खोटी ठरविण्यासाठीं विद्यार्थी-वर्गात शिस्त, संघटना, स्वावलंबन, व्यासंग आणि कार्यनिष्ठपणा आणण्या-साठीं तुमच्यापैकीं प्रत्येकजण यथाशक्ति प्रयत्न करीत आहे ना ?

—शेवटचा प्रश्न म्हणजे, सध्यां तुम्ही घालवीत असलेल्या चार वर्षांच्या विद्यार्थिजीवनावरच तुमच्या उरलेल्या सर्व जीवनाचा भलेबुरेपणा, सुखदुःख, योग्यायोग्य दिशा अवलंबून आहे, हें सतत लक्ष्यांत ठेवूनच तुम्ही प्रत्येक कार्य करीत आहांत ना ?



सांगली, हरभटरोड.
ता.——

# २८ दिवाळीनंतर........?

मित्रवर्य अरविंद यास

नारायणचा साष्टांग नमस्कार.

आनंदानें घालविलेल्या दिवाळीच्या सुट्टीवर अगदीं शेवटीं मात्र विरजण टाकून तूं पुण्याला निघून गेलास, परन्तु त्याचे परिणाम आम्हांला अजून भोगावे लागत आहेत.

सरला भिडेसारख्या सुस्वरूप आणि सुसंपन्न मुलीच्या स्थळाला कांहीं कारण न सांगतां तूं स्पष्ट नकार दिलास, यामुळें इकडील सर्वच मंडळी फार नाखूष आहेत. परवां सहज तुझें पत्र वगैरे आलें आहे काय म्हणून विचारण्यासाठीं तुझ्या घरीं गेलों असतां तुझ्या वडिलांनीं साऱ्या कॉलेज विद्यार्थ्यांना इरसाल शिव्या देऊन, शेवटीं तूं आपला नकार परत न घेतल्यास तुला घराबाहेर घालविण्याचीही धमकी माझ्याजवळ देऊन ठेवली आहे. इकडील परिस्थितीची तुला नीट कल्पना यावी म्हणून तुला तांतडीनें हें पत्र लिहीत आहे.

काय रे ! पण या नकाराच्या मुळाशीं तुझें तें सुधाप्रकरण तर नसावेंना अशी मला शंका येते. दोन स्टुलामध्यें जमिनीवर आपटण्याबद्दलची इंग्रजी म्हण तुझ्या लक्षांत आहे ना ? आम्ही आपले पडलों साधेसुधे. आम्हांला असें वाटतें कीं, तुझ्या वडिलांच्या मताचा तूं अजून शांतपणें विचार करावास. निदान तुझ्या त्या सुधाचें मत तरी काय आहे याबद्दल खडा टाकून पाहिल्याशिवाय उगीच हवेंत किल्ले बांधू नकोस, नाहीं तर ही सारी शेख महंमदीच ठरायची. मी तसा कांहीं अगदीं सनातनी नाहीं, पण आपलीं चार प्रेमलग्नें आणि त्यानंतरचे संसार

आपल्या गांवांतच पाहिले आहेत. म्हणून आपला तुला सांगतों कीं, अशा बी. ए. पर्यंत शिकलेल्या मुली पेलायला सांपत्तिक स्थिति चांगली धडधाकटच पाहिजे, नाहींतर खटके ठरलेलेच असें म्हणतात. तसा मला स्वतःला कांहीं अनुभव नाहीं म्हणा, कारण कॉलेजांतील एकाही मुलीशीं मी अजून बोललों नाहीं. तुझ्या भाग्याचा मला मत्सर वाटतो असेंही समजूं नकोस. आपलं मित्रकर्तव्य म्हणून तुला इशारा देऊन ठेवतों—सावधान !

तुझा,

**नारायण.**

# २९. साठमारी.

सुरसागरनजीक बडोदें,
ता. १५।११।३७.

मित्रवर्य अरविंदास

वसंतचा नमस्कार वि. वि.—

दिवाळीची सुट्टी संपवून मी येथें परत आल्यापासून तुला पत्र लिहि-णार लिहिणार म्हणत होतों, परंतु अनेक गडबडींत तें राहूनच गेलें.

येथें सध्या व्हाइसरॉय यांचा मुक्काम दोनचार दिवसांसाठीं आहे. त्यांच्या स्वागत आणि करमणुकीसाठीं साऱ्या शहरांत धामधूम सुरू आहे. महाराजांबरोबर निघालेली त्यांची जंगी वैभवशाली मिरवणूक, आणि त्यानंतर झालेले साठमारीचे खेळ हे प्रसंग मात्र एकदां पाहिल्यावर जन्मभर न विसरण्यासारखे आहेत.

ताणलेल्या मनाची कमान जरा सैल व्हावी, आणि दैव अनुकूल झाल्यास कदाचित् त्या गर्दीत हंसाशीं दोन शब्द बोलावयालाही मिळावे, या हेतूनें मीही दोन दिवस या उत्सवांत फिरून आलों. तो देखावा आठवून स्मरणांत ठेवावा म्हणून त्याचें सविस्तर वर्णन या पत्रांत लिहून मागील गैरहजीरीचा वचपा काढण्याचें मी ठरविलें आहे—

आज दोन दिवस बडोदें शहराची लोकसंख्या एकदम दुप्पट झाली आहे. भोंवतालच्या साऱ्या खेड्यांतले लोक, बायकामुलें बरोबर घेऊन आल्यानें शहरांत इतकी गर्दी झाली आहे कीं, रस्त्यांतून हिंडणेंही अशक्य झालें आहे. सरकारी मिरवणुकीच्या वेळीं रस्त्याच्या दुतर्फा असलेलीं घरें, छपरें झाडें नुसतीं माणसांनीं फुलून जातात. मिरवणूक येण्या आधींच दोन तास सारे रस्ते रहदारीला बंद असतात आणि दहा दहा पावलांवर घोडे स्वार रांगेनें पेरलेले असतात. या औट घटकेच्या शिलेदारांच्या चेष्टा पहात स्वारी येईपर्यंतचा मधला काळ लोक मौजेनें काढीत असतात.

केव्हांतरी अशा प्रसंगासाठींच घातलेला त्यांचा भारी पोषाक त्यांना चिलखतासारखा रुपत असतो. कंबरेची तलवार, रिकीबीजवळ रोंवलेला लांब भाला आणि डोक्यावरचा जड उंच बांधीव फेटा, या थाटांत चार

तास जीनावर अक्कड बसून थकून गेल्यानें होणारे त्यांचे अंगविक्षेपही पाहण्यासारखे असतात. गर्दींतल्या कोणा वात्रट मुलांनीं फेंकलेल्या खड्यांनीं कांहीं जलाल नवशिकीं घोडीं बिथरून जाऊन मागच्या दोन पायांवर उभीं राहून नाच करूं लागतात, आणि एखादा अश्वारूढ शिले-दार क्षणांत पादचारी होऊन लोटांगण घालूं लागतो ! ! असा घोडा मागच्या दोन पायांवर उभा राहून 'जिलबीचा नाच' करीत आहे, वरच्या स्वाराचें उंच शिमरी पागोटें तिरपें होऊन डोळ्यांवर आलें आहे, अशा थाटांत तलवार, भाला, जीन आणि लगाम आवरतां आवरतां अशा शिलेदाराला दोहोंपेक्षां चार हात असते तर बरें झालें असतें असें वाटत असावें. लोकांच्या हंशानें लाजून, चिडून, इरसाल शेलक्या गुजराती शिव्या मोजीत हा स्वार आपला घोडा सांवरण्याचा प्रयत्न करीत असतो.

लांबून बँड आणि देशी वाद्यांचे आवाज ऐकूं येऊं लागले म्हणजे मिरवणूक जवळ आली समजून साऱ्यांच्या माना उंचावतात.

प्रथम बिनीचेस्वार भरजरी पोषाखांत घोडे उडवीत येतात. नंतर तांबडी पलटण, काळी पलटण अशीं घोडदळें दुडक्या चालीनें खळखळ आवाज करीत जातात. पायदळांच्या मधून भरजरी झुली घातलेले, पुरुष उंचीचे, धिप्पाड पांढरे बैल, चांदी सोन्याच्या दोन महांकाली तोफा ओढीत धीरोद्धतगतीनें चालत असतात. मिरवणुकीच्या मध्याशीं खास बॉडीगार्डोचा तांबडा रिसाला असून मागे सोन्याच्या अंबारींत व्हॉइसरॉय् आणि महाराजांची स्वारी होती.

—"सेनाखासखेल–समशेरबहाद्दर–फर्जंदे खास–दौलते इंग्ली-सीयाऽऽ ! निगा रखो मेहरबान !"

चांदीच्या छड्या घेतलेले दोघांच्या दोन्ही बाजूंचे भालदार जागो-जागीं ललकारी देत असतात.

खाशा स्वाऱ्यानंतर दिवाणांची गाडी, त्यानंतर नगरशेट, मुलकी फौज अधिकारी यांच्या गाड्या असतात. त्यांत मौज वाटते ती मनुष्याच्या हौसेची. मिरवणुकींत शिरलेले कांहीं लोक भाड्याची टॅक्सी करून, नाहीं-तर अगदीं श्यामकर्ण वारूंच्या भाडोत्री गाड्यांत बसून ऐटीनें शेवटीं जात असतात आणि प्रेक्षकही त्यांचें हंशानें स्वागत करतात.

गांवशिंवेबाहेर ' अगड ' नांवाचें एक विस्तीर्ण बंदिस्त मैदान आहे तेथें ही मिरवणूक जाऊन विसर्जन पावली. अगडमधील साठमारी हें दृश्य बडोद्याखेरीज उभ्या हिंदुस्थानांत पहावयाला मिळत नाहीं. सर्कस मधील ' रिंगमास्तर 'च्या चाबकाच्या फटकाऱ्याबरोबर चार वेड्या-वांकड्या उड्या टाकणाऱ्या हत्ती घोड्यांच्या कामांची आपण मुक्तकंठानें प्रशंसा करतों, पण इकडच्या पिढीजाद चालत आलेल्या साठमारी आणि डागदारी या खेळांकडे बडोद्याबाहेरील लोकांचें लक्ष्य जाऊं नये हें नवल नाहीं काय ?

पंचवीस हात उंच तटबंदीवर नाटकगृहाप्रमाणें खुर्च्या मांडलेल्या असतात. खालीं मुख्य मैदानाच्या एका कोपऱ्यांत कुस्त्या आणि वज्रमुष्टीसाठीं लालमातीचे हौदे केलेले असून, बाकीचें मैदान सपाटच असतें. एका कोपऱ्यांत मात्र आठ बिनदरवाजांचीं मोकळीं दारें असलेली एक गोल खोली असते.

मध्यें मांडलेल्या एका मोठ्या टेबलावर शिकविलेल्या पोपटांचे खेळ होऊन सुरवात झाली. सायकल चालविणें, तोफा, बंदुकी उडविणें वगैरे मामुली खेळांनंतर कुस्त्यांचा कार्यक्रम झाला; पण खरें तर तोही दुय्यमच. " या गड्याला जोड—या गड्याला जोड !" म्हणून दोघांत नारळ टाकून झालेल्या हौशी पैलवानांच्या कुस्त्या तूं तिकडेही पाहिल्या असशील. त्यांत तुला नावीन्य वाटणार नाहीं. सरकारी पैलवानांच्या कांहीं कुस्त्या बऱ्या झाल्या पण त्यांतही आपसांत ' मिळून ' बिनचुरशीची दिखाऊ ' लढत ' करण्याची नेहमींची पद्धत दिसून आलीच. जाहीर कुस्त्यांचें महत्त्व हल्लीं इतकें कमी होण्याला ही वृत्तीच कारण आहे असें माझें मत आहे. कोण-त्याही जाहीर कुस्तीचें ठरावीक बिनचूक वर्णन घर बसल्या करतां येईल इतका ठरीव आणि कृत्रिमपणा त्यांत आला आहे.

हात मिळवल्यावर एकामागून एक अवघड डाव, पेंच, त्यावरील तोडी, बंदी करून आपण अगदीं आकसानें लढतों, हें दाखविण्यासाठीं उगीच हुंकार करावे, नाकपट्टी काढली, हात उतरला वगैरे तक्रारी करा-व्यात—जरा कुस्ती रंगांत येतेशी वाटते तों रेटारेटी करून एखादा गडी हौद्याबाहेर गेलाच—त्यांत ' टांग ' नाहींतर ' धोबीपछाड ' करून एखाद्या

गड्याला खालीं घेतला कीं आतां कुस्ती चीतपट होणार म्हणून प्रेक्षकांनीं टाळ्या वाजवाव्यात. पण त्या गड्यानें जी जमिनीला मिठी मारावी ती शेवटपर्यंत. वरच्या गड्यानें मारे त्याला ' घिस्से मारून ' 'स्वारी भरून' अर्धा तास घालवावा आणि शेवटीं पंचांनीं ' बरोबरी ' म्हणून कुस्ती सोडवावी–असाच प्रकार शेंकडा पाऊणशें कुस्त्यांत झाला. गडी 'चीतपट' झाला कीं 'पडेल' म्हणून काळें नांव त्याच्यापुढें लागतें. ही भीति असल्यानें बरेच पैलवान आधींच संगनमत करून होतां होईतों असा प्रसंग येऊच देत नाहींत. या योगानें जाहिरात देऊन केलेल्या बहुतेक कुस्त्यांत हा ठराविकपणा व चुकारपणा येऊन लोकांचें लक्ष्य त्यांच्यावरून उडालेलें आहे.

या कुस्त्यानंतर वज्रमुष्टींचा सामना फार फारच नावीन्यपूर्ण झाला. प्राचीन काळच्या रोममधील कल्झियमच्या खेळांची, आणि आपलेकडील मल्लयुद्धांच्या " रंगा " ची आठवण अशा प्रसंगीं होते. कचकड्याचीं जाड कडीं मुठींवर घालून, एकमेकांवर प्रहार करून बॉक्सिंगप्रमाणें हा खेळ खेळावयाचा असतो. यांत रक्तपाताचा प्रसंग असल्यानें किरकोळ साठमारींत सरकारी वज्रमुष्टी नुसते मोहरमच्या वाघांसारखे उगीच गरगर हात फिरवून त्यांतले डाव करून दाखवितात. सरकार स्वारीचा हुकूम झाला म्हणजेच कडीं चढवून खरीं लढत करण्यांत येते. ती आज आम्हांला पहायला मिळाली. बनारसचा अयोध्याप्रसाद हा प्रसिद्ध वज्रमुष्टी इकडे आला असून त्यानें आव्हान दिल्यानें आजची लढत फार चुरशीची झाली.

कपाळीं शेंदूर लावलेले ते वज्रमुष्टी ' जयबजरंग ' म्हणून गर्जना करीत रंगणाच्या मध्यावर भिडले. आतां हा प्रहार समोरच्या गड्याचें डोकें भेदून जातो कीं काय असे वाटतें तोंच समोरचा गडी शिताफीनें पवित्रा बदलून तो हात कुठें तरी खांद्यावर अडवून निसटून जाई. तेवढ्यांत बनारसवाल्याचा एक कौशल्याचा फटका कानशिलावर लागून सामनेवाल्याच्या डोक्यांतून रक्त वाहूं लागलें–आणि मग त्यांची इतक्या गर्दीची लढत झाली कीं, त्यांच्यावर नजर ठरेना आणि रक्तानें न्हालेल्या त्या वीरापैकीं एक दुसऱ्यापासून ओळखूं ही येईना–शेवटीं वरून खास मनुष्य पाठवून सरकारांना हा चुरशीचा सामना बंद करावा लागला.

हा प्रकार चालला असतांच दारामागून चीत्कार आणि डुरकावण्या ऐकूं येत होत्या. भला मोठा साखळदंड अडकविलेला एक मस्त रेडा आठ-दहा जणांनीं एका दरवाजांतून आणून उभा केला. समोरच्या दरवाजांतून तसाच दुसरा रेडा सोडून शागीर्दांनीं दारें लावून घेतलीं. जमीनीपर्यंत मान टेंकून डरकाळी फोडून, उंच उशी घेऊन त्या दोघा रेड्यांनीं मैदानाच्या मध्यभागीं धडक दिली. शिंगांत शिंगें अडकावून लोखंडी कांबेसारखे पाठ पाय जमिनीवर रोवून ते एकमेकांशीं झुंजत होत.

दुरून पाहणाऱ्यांना वाटे कीं, ते उगीच निश्चल उभे असावेत. रेसभरही कोणी मागें हटेना. मात्र जेव्हां या टक्करींत त्यांपैकीं एका रेड्याचें भलें जाड शिंग एकाद्या काटक्यांसारखे काडकन तुटून, त्या धक्क्यानें त्यानें लोळण घेतली तेव्हां मात्र त्यांच्या झुंजींत किती जोर सामावला होता हें प्रेक्षकांना कळलें. एक भयंकर डुरकाळी फोडून विजयी रेड्यानें त्याच्या पोटांत आपलें शिंग खुपसलें–तो जखमी रेडा पुढें आणि हा पाठीमागें, अशी बेफाम दौड त्या गोल मैदानांत सुरू झाली. असे किती जखमी रेडे प्रेक्षकांच्या दृष्टीसमोर ठार झाले आहेत असें म्हणतात. परंतु यावेळीं तेथील नोकरांनीं तो जखमी रेडा जवळ येतांच त्याला आंत घेऊन चटकन दार बंद केलें आणि मागला रेडा दाराशीं धडका घेत असतांना त्याच्यावर दोर टाकून त्याला पलीकडे नेले. विजयाची फुलाची माळ त्याच्या अंगावर टाकली गेली. हे सारे खेळ म्हणजे खरोखर किरकोळ. मुख्य काम म्हणजे डागदारी आणि हत्तींची साठमारी. त्याच्यासाठीं प्रेक्षकांची चूळबुळ सुरु होती. बारीक तुतारी फुंकावी असे हत्तींचे चीत्कार त्या प्रचंड दरवाजामागून येत होते. त्यांतला एक दारू पाजून मस्त केलेला, गंडस्थळावरून वहाणाऱ्या मदाच्या पाटांनीं भिजलेला असा एक हत्ती झिंगत येऊन एका कोपऱ्यांत उभा राहिला. समोरून एक चपळ घोडेस्वार येऊन त्याच्याभोंवतीं रिंगणें फिरूं लागला. हे घोडे या कामासाठीं मुद्दाम लहानपणापासून तयार केलेले असतात. हत्तीचें तें अवजड धूड गरगर फिरून चिडून त्या स्वाराला सोंडेंत धरण्याचा प्रयत्न करी, पण तेवढ्यांत तो स्वार कोठल्या कोठेच पसार होई. असें होतां होतां तो चिडलेला हत्ती एकदां मात्र चिकाटीनें त्या स्वारामागें लागला. ' गज-

गति ' हा शब्द आपण नेहमीं हळू चालण्याला लावतों. परंतु खरोखर हा अजस्र प्राणी किती जलदीनें अंतर तोडूं शकतो. हें पहावयाला असा प्रसंगच पाहिजे. त्या चिकाटीनें पुढें धावणाऱ्या घोड्याच्या अंगांतून घाम आणि तोंडांतून फेस गळू लागला. अशा कठीण प्रसंगासाठींच मैदानाच्या मध्याशीं ती अरुंद दाराची चिरेबंदी खोली बांधलेली असते. त्या दारांतून तो स्वार चटकन आंत शिरला म्हणजे सुटला. भिंतीवर आपले पाय रोंवून सोंड फिरवीत चित्कार करीत तो हत्ती बाहेर उभा होता. त्याला भिऊन तो घोडा दुसऱ्या दारानें बाहेरही पडेना.

पायीं किंवा घोड्यावरून हत्तीशीं झुंज खेळणें याला डागदारी म्हणतात साठमारी म्हणजे हत्तीची झुंज.

तो हत्ती खोलीशीं धडका देत असतांच समोरच्या दारांतून तसाच दुसरा मदमत्त हत्ती आंत सोडण्यांत आला. दोघांनीं तुताऱ्यासारखे आवाज करून सारें अंग घुसळून मैदानाच्या मध्यावर आपल्या डोक्यांनीं धडक दिली. पावसाळ्यांत विरुद्ध दिशेनें दोन प्रचंड काळे ढग एकमेकावर आपटावेत तसे ते दोन हत्ती एकमेकांना रेटीत, सोंडेंत सोंड व दातांत दांत अडकवून झुंजत होते. त्यांतला पहिला हत्ती अधिक बळकट असल्यानें त्यानें दुसऱ्याला रेटून भिंतीशीं भिडविलें. नेहमीं साठमारींत झुंजलेला, भानावर असलेला हत्ती सामनेवाला गुडघ्यावर टेकला म्हणजे त्याला सोडून देऊन वरल्या सोंडेनें सलाम करून दूर होतो. पण आज त्या हत्तीला खून चढल्यासारखा झाला होता. आपल्या दातांच्या प्रहारांनीं रक्तबंबाळ करून सोंडेनें घातलेला विळखा तो सोडीना. शेवटीं दोनचार माहूत धीरानें रिंगणांत उतरले.

अशा वेळीं मत्त हत्तीपुढें जाणें फार धोक्याचें असतें. प्रत्यक्ष स्वतःच्या माहुतालाही बेफाम हत्तीनें तुडवून ठार केल्याचीं उदाहरणें लोक सांगतात; परंतु अशा प्रसंगालाही तोड आहे. भाल्यांना, अंकुशांनाही भीत नाहीं इतका पेटलेल्या दारूला हत्ती भितो. तसे सुरनळे पेटवून माहुतांनीं जखमी हत्तीला आंत नेलें. परंतु बिथरलेला हत्ती मात्र आटोक्यांत येण्याचीं चिन्हें दिसेना. कोणी जवळ गेल्याबरोबर तो अंगावर धावून येई. या कामासाठींच तयार केलेली दोन माणसें शेवटीं आंत उतरलीं.

करवतीसारख्या पात्यांचे, बळकट स्प्रिंग असलेलें सांडस हत्तीच्या पाया-वर सोडण्याचे असतात. मुख्य अडचण म्हणजे ते बरोबर हत्तीच्या पायाभोंवतालीं रुतून बसले पाहिजेत. हें काम म्हणजे जिवावरचेंच असतें. पहिला चिमटा बरोबर फेकणाऱ्याला सरकारकडून इनाम मिळतें. शेवटीं बरेच वेळा सोंडेचे फटकारे खाऊन एकानें शिताफीनें त्याच्या मागें जाऊन पायांत तो चिमटा अडकाविला. कितीही मस्त हत्ती असला तरी एकदां ते लांब तीक्ष्ण दांते चरचर कांपत त्याच्या मांसांत जाऊन घट्ट रुतले, कीं तो अगदीं गरीब गाय बनून कोणाही माहुताला जवळ येऊं देतो.

हा खेळ आटपला तोंच बँडनें बडोद्याच्या राष्ट्रगीतांचे सूर काढले व सारे प्रेक्षक उभे राहून चिंचोळ्या दारानें माणसांची रीघ लागली. सगळीकडे आरडाओरड गर्दी आणि गोंधळ. हीच माझी संधी होती. हंसाच्या बरोबरील मंडळी त्या घोळक्यांत असतांनाच पुढें जाऊन बाजूला तिच्याशीं दोन शब्द बोलून कांहीं तरी सोक्ष मोक्ष करण्याचें मी ठरविलें.

"—आतां आणखी किती दिवस छळणार आहेस हंसा ? मी एका शब्दालाही महाग झालों कां ?

इतक्यांत मागच्या घोळक्यांतून तिच्या आईची रागाची हांक ऐकूं आली.

'अली हंसली'! ( अग हंसा )

तिनें गुरकून मागें पाहिलें.

'माझी परिस्थिती डोळ्यांनीं दिसतेय, तरी तुम्हांला हें बोलवतं ? उद्यां रविवार आहे, शक्य तितका प्रयत्न करून बागेंत बँडस्टँडचे मागें भेटेन मी तुम्हांला. पण आतां येथें थांबूं नका क्षणभर. आईनें पाहिलं तर······'? तितक्यांत सोन्याच्या चुका बसवलेले आपले तांबडे दांत करकरां खात, रागानें हातवारे करीत तिची आई पुढें आली, आणि मी बाजूच्या गर्दीत नाहींसा झालों.

उद्यां मी हंसाला भेटणार. सोक्षमोक्षच आहे आमच्या नशिबाचा. परंतु धीर करून मी तिला स्पष्टपणें मागणी घालण्याचें ठरविलें आहे. या अनिश्चित भवितव्यामुळें आज रात्रभर झोंप येईल असेंही मला वाटत नाहीं, त्यामुळेंच तुला हें लांबलचक पत्र लिहून रात्रीं एक वाजेपर्यंत वेळ

मी कसाबसा काढला. साऱ्या निद्रिस्त जगांत मीच एकटा भुतासारखा जागा राहून, या ओळी खरडीत बसलों आहे. वद्यपक्षाचें अंधुक चांदणें पडल्यानें रस्त्यावरचे दिवेही आतां मालविले गेले आहेत. समोरच सूरसागराच्या संथ लाटांवर चंद्रकोरीचें प्रतिबिंब होडीप्रमाणे हिसळत आहे. खालीं रस्त्यावरून ' जागते रहो ' म्हणून गस्तवाल्याची बांग ऐकूं येत आहे. पण तुला वाचण्याचा त्रास दिला हाच पुष्कळ. पुरे करतोंच आतां.

तुझा,

वसंत.

## ३० पुण्याचें पाणी.

शनिवार पेठ,
पुणें.

मित्रवर्य नारायणराव यांसी वि. वि.

इकडे आल्यापासून माझे व्याप आणि उपद्व्याप हे फार वाढत चालले आहेत असें तूं मागील पत्रांत लिहिलेंस तें खरेंच आहे. बाकी इकडची हवाच अशी दिसते की, स्वस्थ बसूं म्हटलें तरी बसवणार नाहीं. सहज पुण्यांत फिरलें तरी दर दहा घरा गणिक एकेका संस्थेचा अनुप्रास लागलेला आहे असें वाटतें. उपयोगी संस्थांबरोबरच अनेक विक्षिप्तपणाच्या संस्थाही येथें सांपडतील, हें सारें तुला लिहिण्याचें कारण म्हणजे हल्लीं आहेत त्या अनेक संस्थांत आणखी एका संस्थेची भर टाकण्याचें पुण्य किंवा पाप करण्याच्या मी बेतांत आहे. कोणतीही गोष्ट करायची असल्यास त्यांतील अडचणी आणि दोषस्थळें हुडकून काढा-यचीं असलीं तर ती आमच्या नारायणरावांनींच, असा पूर्वींपासूनच तुझा लौकिक आहे. सुधेबद्दल मी केलेले उल्लेख, आणि माहिती यांवर तूं पाखडलेल्या टीकेनें त्याचा चांगला अनुभव मला आला आहेच; म्हणून सध्यां माझ्या डोक्यांत घोळणारा एक बेत मी तुझ्यापुढें मांडीत आहे. तो तुला कितपत पटतो, त्यांत किती अडचणी हटकून येणार तें सारें अगदीं निर्भीडपणें मला कळविल्यास त्यांच्या आधारानें पुढील मार्ग काढणें मला शक्य होईल. सल्ला देणाऱ्या डॉक्टर किंवा वकीलापुढें अगदीं प्रारंभीपासूनची हकीकत सांगतात, तशी साग्र संगीत हकीकतच मी तुझ्यापुढें ठेवतों.

प्रसंग साधाच होता. परंतु बरेच दिवस माझ्या मनांत घोळणाऱ्या विचारानें त्यांना तोंड फोडलें. कॉलेजमधून घरीं परत जात असतांना मित्रांच्या एका टोळीनें मला काल हटकलें. त्यांच्या आरडाओरड व हंशावरून काहींतरी आनंदाचा प्रकार झाला असावा अशी माझी कल्पना झाली. येथील एका क्रिकेट मॅचच्या शेवटाबद्दल लावलेली पैज हरल्यामुळें त्यानंतर एक छोटीशी मेजवानी देण्याचा प्रसंग त्या मित्रावर आला

होता, आणि त्या प्रसंगाच्या तयारीनेंच ते सारे चालले होते. मी नको-नको म्हणत असतांही त्यांनीं मला ओढून नेलें. कॉलेजजवळच्या एका रेस्टॉरंटकडे साऱ्याचा मोर्चा वळला.

अंधारलेल्या छपराखालीं एका खोलींत दाटीदाटीनें मांडलेल्या खुर्च्या-आणि त्याच्या समोर डगडग हलणारीं लोखंडी पायांचीं टेबलें हा देखावा आंत गेल्याबरोबर दिसला. कपांच्या बुडांची एकमेकांना छेदणाऱ्या वर्तुळांची नक्षी त्या साऱ्या टेबलावर उठून दिसत होती. लोखंडी घमेल्यांत आणि टिनच्या डब्यांत भरून ठेवलेले शेव, चिवडा, शंकरपाळीं इत्यादि पदार्थ, वर बरण्यांत भरून ठेवलेले कित्येक दिवसांचे लाडू आणि शिळे केक हे पदार्थ तेथें डौलानें झळकत होते. पडद्या पलीकडे दिवसभर उकळत असलेला चहाचा बंब उसासे टाकीत होता. आंतल्या खोलींतून चालू असलेल्या तळणीचा कुबट दर्प बाहेर येत होता. तें दृश्य पाहून 'एक सोडा' वरच मी माझी सुटका करून घेतली. बरोबरच्या मित्रांनीं मात्र फुकट मिळालेल्या या अनपेक्षीत मेजवानीवर चांगलाच हात मारला. बाहेर जातांना मात्र पैज हरलेल्या मित्राच्या खोलीचा नंबर देऊन, 'मांडून ठेवा बुवा'! अशी 'शार्दूलविक्रीडित' ललकारी देऊन सारे बाहेर पडले. बाहेर जातांना साळसूद शेरा मात्र हा. 'ए! फारच वाईट व्यवस्था बुवा या हॉटेलची. खरं तर बाहेरच्या रेस्टोरांमध्येंच जायला पाहिजे. पण आमचे पानसे आपलें पाकीट खोलीवर विसरलेले असायचेच, म्हणून म्हटलं आपलं खात्याचंच हॉटेल बरं'

आम्ही सारे रेसिडेन्सींत पानसे याच्या खोलीवरच जमलों, तरीही त्यांची कुरकुर चालूच होती. हा सारा प्रकार पाहून मी म्हणालों—'हे पहा दोस्त, त्यांना कां उगीच नांवं ठेवतां? त्यांचा हा बोलून चालून धंदाच. शक्य तितका फायदा काढण्याकडे त्यांची प्रवृत्ति असली तर त्यांना कां नांवं ठेवावीं? दोष आपल्या साऱ्यांचा आहे. इथें आपण हजार विद्यार्थी असून हॉटेलवाल्याच्या नांवानें शिळीं शंकरपाळीं फोडीत कां होईना, त्याच्या कडवट चहाचे पेले फस्त करतोंच कीं नाहीं? पण रागावून दोन शिव्या हासडण्याखेरीज आपण इतक्या वर्षांत काय केलें

आहे ! आपल्यापैकींच कोणी तरी ही व्यवस्था करण्याची तयारी दाखविली आहे कां ?'

साऱ्या खोलींत हास्याचा कल्लोळ उठला.

—वा ! छान, राजे ! छान ! कमाल केलीत, म्हणजे उद्यांपासून आम्ही हॉटेलवाल्यांचे धंदे करावेत कीं काय ? फार चांगली योजना आहे. हें पहा एक हॉटेल झालं. मग त्याच्या शेजारीं हेअरकटिंग सलून नको कां ? ती देखील खाशी सोय होईल. कॉलेजमध्यें काय करतां ? म्हणून कोणी दांत विचकून विचारलेंच तर 'करतों हजामती' म्हणून शपथेवर खरें सांगायला हरकत नाहीं. आणि हें पहा, सलूनमधून बाहेर पडल्यावर, बूट पॉलीश करावयासही कोणीतरी पाहिजेच नाहीं कां ? अरे बाबा बी. ए. झाल्यावर बूटपॉलीश करायचं त्याच्या आधींच संवय ठेवली तर काय वाईट ! कां पटवर्धन राजे ! असंच तुमचं म्हणणं नाहीं कां ?'

'हें पहा—मी उत्तरलों 'उपहास करायचाच तर वाटेल त्या गंभीर विषयाचाही करतां येईल. प्रत्यक्ष हल्लींच्या शिक्षणाचा काय कमी उपहास होत आहे बाहेर ? माझे विचार आधीं पूर्णपणें ऐकून घे, अन् मग हवी तितकी थट्टा कर. कॉलेजांत आमचे इकॉनामिक्सचे प्रोफेसर कंठशोष करून सांगतात कीं सुशिक्षित विद्यार्थ्यांनीं पदवीनंतर व्यापार धंद्याकडे लक्ष्य द्यावें; पण मधल्या सुट्टींत लागणाऱ्या एका चहाच्या कपाचीसुद्धां आम्हांला स्वतंत्र सोय करून घेतां येत नाहीं, मग मोठ्या धंद्यांत आम्ही कुठून प्रगति करणार ? आपण आपल्या भोंवतालच्या परिस्थितीपुरतंच पाहूं. दुपारची सुट्टी झाली कीं कॉलेजचे हजार विद्यार्थी चहा फराळाकरितां धांवत सुटतात. स्वस्त हवे असेल तर घाणेरडें, व चांगले हवें असेल तर महाग असे चहाचे पेले आणि खाद्य उडवून पुढच्या तासासाठीं परत येतात.

मी म्हणतों, आपण विद्यार्थ्यांनीं एक को-ऑपरेटिव्ह सोसायटी काढून, त्यांतूनच आपल्याला हवी तशी व्यवस्था कां करून घेऊं नये ? केवळ हॉटेलच नव्हे, तर त्याबरोबर विद्यार्थ्यांना उपयुक्त अशा सर्व वस्तूंचें एक छोटेसें स्टोअरसुद्धां चालवतां येईल. अगदीं कागदवह्यांपासून थेट पोमेड, स्नो, कपबशांपर्यंत ठराविक मालासाठीं कॉलेजचे हजारो

विद्यार्थी हजार दुकानें धुंडाळतात. त्यांना आपल्या जाळ्यांत ओढण्या-साठीं बाहेरची झकपक करून, दुकानदार चोपून दीडपट भाव त्यांच्या-कडून काढून घेतात. कॉलेजच्या आवाराभोंवतालीच पहा; हरतऱ्हेच्या आकर्षणांनीं, कमींतकमी मोबदला देऊन, विद्यार्थ्यांकडून जास्तींत जास्ती पैसा शोषून घेणारीं कितीतरी दुकानें गबर होत आहेत. त्यांच्यापेक्षां किती तरी स्वस्तपणें हा सारा माल आपल्या संस्थेतून देतां येईल.'

'—नुसती शेखमहंमदी करायला काय जातं ? पण भांडवलाची काय वाट ? का कॉलेज देणार आहे हजार दोन हजार आम्हांला उचलून ?' एका मित्रानें जरा खंवचटपणें प्रश्न केला.

'कशाला हात पसरायला पाहिजे, दुसऱ्यापुढें?' मी म्हणालों. रुपाया-पासून दहा रुपयांपर्यंतचे शेअर्स काढले तर कामापुरतें भांडवल सहज विद्यार्थ्यांतच जमेल. यांत नुकसानीचाही प्रश्न नाहीं. कॉलेज सोडतांना, किंवा वर्षाअखेरी, कोणीही आपली रक्कम परत घ्यावी. आपल्यांतलेच गरीब विद्यार्थी अगदीं आनंदानें अल्प मदतीच्या मोबदल्यावर आळी-पाळीनें त्याच्यावर देखरेख करतील. पैसा देऊन ओशाळे न करतां, गरीब, कर्तबगार, पण स्वाभिमानी विद्यार्थ्यांनाही योग्य ती मदत करतां येईल. कॉलेजविद्यार्थी म्हणजे पोशाखी, चैनी परधार्जिणा, आणि ऐदी ही कुत्सित टीकाकारांची टीकाही आपण कृतीनेंच फोल करून दाखविली पाहिजे.

हॉटेलच घ्या. दररोज साधा पण निरनिराळा बेत ठेवून, चवदार पदार्थांबरोबरच आरोग्यदायक, सत्त्वयुक्त पदार्थ अशी व्यवस्था, आणि नमुनेदार स्वच्छता यांची जोड दिल्यास आपलें 'कॅफे कॉलेज' एक नमुनेदार संस्था होईल. त्याची उपयुक्तता आपल्या पुरतीच नाहीं. दुपा-रच्या एक कपभर चहासाठीं अध्यापकांच्या क्लबांत प्रत्येकाला दरमहा दीड रुपया मोजावा लागतो. त्याची व्यवस्था आपल्याकडेच घेतां येईल. छोटीं मोठीं गॅदरिंगें, चहापार्ट्या, मॅचेसच्या वेळचे अल्पोपहार, एक ना दोन. मागणी काय अगदीं नको वाटेल इतकी मागणी आहे'

"—अरे बाबा, समजा आम्ही मनांत आणलं, तरी पण प्रिन्सिपॉल

रेक्टर वगैरे बसले आहेत ना ! हजार अडचणी आहेत.'' आमच्यामागं पानसे म्हणाला, " आधीं योजना मांडून ती यशस्वी करण्याची तयारी दाखविलींत कां तुम्ही ? '' मी विचारलें. ''कारणाशिवाय ते उगीचच मोडता घालतील असें मला वाटत नाहीं. अभ्यासांत व्यत्यय न येतां धंदे शिक्षणाचा ओनामा गिरवून आपण स्वतंत्र वृत्ति दाखविली तर त्यांना समाधानच वाटेल असें मला वाटतें. ''

' कल्पना कांहीं तशी वाईट नाहीं ' मित्रांनीं नाखुषीनें कबूल केले. एक म्हणाला, " असंच कर, तुझी त्या सुधाकर प्रोफेसराची ओळख आहे ना ? त्यांच्यापुढं ठेव ही योजना, आणि जाऊं देत प्रिन्सिपॉलपर्यंत. आम्ही आहोंतच तुझ्यामागें मदत द्यायला. ''

या बैठकींत ठरल्याप्रमाणें सुधाकरांना मीं माझी योजना सांगितली आणि ते मला काल प्रिन्सिपॉलांच्या बंगल्यावर घेऊन गेले होते. त्यांच्या-बद्दल आम्हांला जरा धास्तीच वाटते, आणि आम्ही दोन पावलें दूरच असतो, पण त्यांच्या करड्या शिस्तीमुळेंच कॉलेजांतील सर्व कामें यंत्रा-सारखीं चालू असतात हें आम्ही विसरतों. त्या दिवशीं चांगलें तासभर बोलणें झालें आमचें. कॉलेजमध्यें असतांना ते तितके करडे आणि अबोल दिसतात तितकेच विनोदी व मननोकळे ते घरीं असतांना दिस-तात, हें मला त्यावेळीं कळून आलें. माझी सारी योजना तपशीलवार लिहिण्यास सांगून, विद्यार्थ्यांचा योग्य पाठिंबा मिळाल्यास कॉलेजतर्फे शक्य ती मदत करण्याचें त्यांनी मला वचन दिलें. सध्यां मी ती योजना तपशीलवार लिहून काढीत आहे. तूं आपल्या कंपूचा ऑडिटर. साऱ्यांचे दोष तूं काढायचे, तेव्हां या योजनेंतील खांचखळगे मला लिहून कळीव म्हणजे शेवटचा मसुदा करतांना त्यांचा उपयोग करतां येईल.

तुझा,
अरविंद.

# ३१. 'प्रेम कीं लौकिक?'

सुरसागर नजीक, बडोदें.

मित्रवर्य नारायणराव यांस

ा. न. वि. वि.

तुझें पत्र कालच मिळालें. तूं आणि अरविंद यांनीं पत्रांतून बरीचशी अभ्यासाची पृच्छा केली आहे. तिच्याबद्दल मात्र मला फारसें लिहितां येत नाहीं हें खरें. आमच्या कॉलेजांत बडे युरोपियन प्रोफेसर आहेत, आणि बी. ए.ला परीक्षकही आहेत, म्हणून तुम्ही दोघांनीं हा प्रश्नांचा भडिमार माझ्यावरच चालविलेला दिसतो. पण खरं म्हणायचं तर माझा बराचसा वेळ क्रिकेटच्या ग्राऊंडवर आणि टेनिसच्या कोर्टावरच जात असल्यानें त्यांच्या व्याख्यानांतल्या खांचाखोंची मला फारशा कळत नाहींतच. तेव्हां गंगेत राहून कोरडा म्हणून मला म्हटलें तरी चालेल. अरविंद बोलून चालून स्कॉलर. तो अभ्यासाच्या विमानांत बसून फर्स्टक्लासच्या स्वर्गांत उडत चालला, म्हणजे त्याच्या विमानाचे खुर धरून तूंही लोंबकळत जाशील—त्याला माझ्या मदतीची जरूर नाहीं. परीक्षेला दोन महिने राहिले म्हणजे साऱ्या नोट्स्—गाइड्स्चा उभा डोंगर पोखरून काढणार आहे मी, तोंपर्यंत स्वस्थ.

तुझ्या पत्रातली अरविंदाच्या सुधा-प्रकरणावरील टीका वाचून मला मौज वाटली. अगदीं 'सोमयाजी' दीक्षितांचा मुलगा शोभतोस तूं—तुला टीका करायला खाद्य हवें असलें तर अरविंदापेक्षांही जहाल अशी हकीकत मी लिहूं शकेन. प्रेमावर टीका करणारे, प्रेमाला असार आणि क्षुद्र, थिल्लर अशी भावना समजून, ती जीवन आणि वाङ्मयांतून हद्दपार करण्याची भाषा बोलणारे लोक या साऱ्यांना खऱ्या प्रेमभावनेचा अनुभवच नसावा असें मला वाटतें. प्रेम ही कावीळ असली तरी तिनें जग पिवळें दिसण्याऐवजीं सुंदर आणि अगदीं नवीन असें दिसूं लागतें. आजच हंसाला भेटून आल्यावर पूर्वी रुक्ष वाटणारें बडोदें मला यक्ष नगरीसारखें वाटूं लागलें आहे, आणि भकास वाटणारा '**कमेटी—बाग**'

देखील हिरव्या नंदनवनासारखा दिसूं लागला आहे. कधीं चुकूनही काव्य न वाचणारा मी. पण न कळतांच आतां एखादा गज़ल गुणगुणूं लागलों आहे.

'हंसा—'!!

तिला नांव देण्यांतही तिच्या वडिलांनीं चतुराई दाखविली आहे. दुसरें नांवच तिच्या बाबतींत शक्य वाटत नाहीं. हंसा सारखा तिचा गौर-वर्ण, हंसासारखी मानेची लाडकी मुरड, हंसासारखाच गोल प्रमाणशीर बांधा, आणि हंसावर ताण करणारा विशेष म्हणजे किंचित् अनुनासिक गोड मंजुळ आवाज! आभाळांतल्या ढगांना मुशींत ओतून बनविल्या-प्रमाणें भासणारी, श्वासानेंही खळी पडेल अशी मृदुता. तिकडे पाहून मनाला वाटावें कीं या मृदु देहांत हाडांसारखे कठोर पदार्थ नसावेतच मुळीं. त्यांत योग्य अशा प्रादेशिक वेशभूषेची भर पडली म्हणजे हें सौंदर्य मला अगदीं मादक आणि अत्यंत आकर्षक वाटतें. इकडे आल्यावर गुर्जरचारणांकडून मी एक प्राचीन काव्यमय प्रेमकथा ऐकली. आपल्या प्रियतमेच्या भेटीसाठीं एक गुराखी दररोज एक नदी पोहून पैलतीरीं जात असे, आणि कधीं कधीं एखाद्या मातीच्या घागरीचा आधार घेऊन तीही पोहून येत असे. अशा परिस्थितींतच एका प्रचंड तुफानांत पुरानें वाहून तो बुडून मेला अशी ती हृदयद्रावक कथा आहे. हंसाच्या प्राप्तीची आशा करायची तर त्या प्रेमी जीवांप्रमाणेंच दक्षिणी गुजराती समाजांतील तुटकपणाची परकेपणाची खाडी पोहून मला जावें लागणार आहे—मग यश येवो कीं अपयश. पण वेड्यासारखें हें हंसापुराण मी तुला कां ऐकवीत बसलों याचा प्रश्न पडायचा तुला. याचें कारण म्हणजे हें पुराण संपून फलश्रुति ऐकण्याची मुवेळ आली आहे म्हणून. ही बातमी माझ्या मनांत मावत नसल्यानें अरविंदाला आणि तुला आतांच पत्रांत लिहीत आहे. आपल्या शपथेप्रमाणें ही सविस्तर वार्ता तुम्हांला मी कळविली आहे—मात्र आमच्या जमदग्नि वडिलांच्या कानीं ती इतक्यांत जातां कामा नये, कारण अजून प्रेमाच्या कांटेरी वाटेंतला बराचसा पल्ला आम्हांला गांठायचा आहे. एकदां ही परीक्षा आटपून मी स्वतंत्र झालों, आणि मे महिन्यांतच हंसा ही कायदेशीर रीतीनें 'मेजर'—सज्ञान झाली म्हणजे

मग कोणाच्याही अडथळ्यांना मी जुमावणार नाहीं. तोंपर्यंत आमचा थोडासा गौणपक्ष आहे खरा.

हंसाचा आणि माझा परिचय कसा झाला, ही ओळख वाढत जाऊन शेवटीं पुराच्या संकटांत मी तिची सुटका केल्यापासून माझ्या प्रेमाला तिचा प्रतिशब्द कसा मिळत गेला, हें सारें माझ्या पत्रांतून मी लिहिलें आहेच. शेवटीं शेवटीं मात्र तिची भेट घेणेंही मुष्कील झालें इतकी पाळत तिच्या नात्याच्या मंडळींनीं ठेवली होती.

शेवटीं कालच इकडच्या मोठ्या बागेंत एका निवांत जागीं तिची भेट घेऊन मी तिला निर्वाणीचा प्रश्न टाकला. तो सारा देखावा अजून माझ्या डोळ्यासमोर उभा आहे.

येथील सार्वजनिक बागेंत, चौफेर हिरवळीच्या पटांगणाच्या मध्यभागीं एक सुंदर गोल असें संगीतगृह आहे. भोंवतालीं आरस्पान आणि ब्रॉंझचे केलेले प्राचीन ग्रीक व रोमन देवदेवींचें अंगसौष्ठव दाखविणारे सुंदर पुतळे उभे केले आहेत. पाश्चात्य वाद्यमेळांप्रमाणें हिंदी वाद्यमेळांचें संगीत दर रविवारीं इकडे ऐकविण्यांत येतें. मौलाबक्षांनीं हा प्रकार इकडे रूढ केला आहे. सारंगी, सतार, जलतरंग, सनई, मुरली, दिलरुबा, स्वरमंडळ, ताउस, सुंदरी, बीन वगैरे अनेक वाद्यें वाजविणारे एक वर्तुळ करून बसतात, आणि पाश्चिमात्य जलशांतील 'कंडक्टर' प्रमाणें एक लहान छडी घेऊन, संगीत–नायक मध्यावर असतो. प्रारंभीं राग, ताल, त्याचे स्वर, वगैरे सांगून, सारंगीवर त्याच्या 'अस्ताई'चे सूर काढण्यांत येतात. पहिल्या समेवर आल्याबरोबर सारीं वाद्यें तो चरण उचलून घेतात. दोन आवर्तनें होऊन पुन्हां 'सम' आल्याबरोबर सारीं वाद्यें बंद करून नायक एखाद्या वाद्याला छडीनें खूण करतो आणि त्यानें एकस्थाने आपापल्या वाद्याच्या फिरतीच्या करामती दाखवावयाच्या असतात. तो समेवर आला कीं पुन्हां सार्‍यांचा 'कोरस' सुरू होतो.

संगीतगृहाभोंवतालची गर्दी टाळून दूर झाडांच्या आडोशाला एका दगडी बांकावर आम्ही बसलों होतों. ती आमची ठरावीक जागा, पण हंसावरील पहार्‍याच्या योगानें कित्येक महिन्यांनीं आज आम्ही तिथें मोकळेपणानें बसूं शकलों होतों. शेवटीं मी तिला विचारलेंच.

" हंसा ! हा लपंडावाचा खेळ किती दिवस चालायचा ! केव्हांतरी धीर केलाच पाहिजे. सांगू या जगाला कीं प्रेमापुढें आम्हांला या कृत्रिम समाजसीमाची पर्वा नाहीं म्हणून. आहे कां तुझी तयारी ? " पांच दहा मिनिटें ती खाली पहात विचार करीतच बसली होती- माझी उतावळी अपेक्षा होती की ती चटकन् होय म्हणेल म्हणून—माज्या शांततेंत मागील संगीतगृहांतल्या नायकाचा गंभीर आवाज तेवढा येत होता—

"---ये रागका नाम **भीमपलास.** इसमें गंधार और निषाद कोमल लगते है और मध्यम शुद्ध.

नी सा गमप—गमप—गमपनीसा—रागका यह स्वरूप—तीनताल—

एक दो तीन चार । पांच छे सात आठ । नव दस ग्यारा बारा । अजहुन । आ ऽऽ ये । स्या ऽऽ म । मोरी आली । अजहुन । ......

माज्या वाद्यांच्या स्वरांचा ताफा त्रि-तालाच्या दुडक्या चालीनें दौडत जात होता.

हंसानें मान उंचावली. " वसंतराव ! तुमच्याप्रमाणें मलाही वाटतं कीं आपण एकदां निश्चय करून हें उदाहरण घालून द्यावं—बुजून मागें पाय घेऊं नये—माझ्या प्रेमाबद्दल तुम्ही शंका घेऊं नका—पण मला तुमच्या इतकं उतावीळ—अविचारी म्हणा होतां येत नाहीं. आमच्या समाजांत '**महा-जन**' आणि '**न्यात**' ( जात ) यांचं किती बंड आहे हें तुम्हां दाक्षिण्यांना कळायचं नाहीं. तरीपण माझे वडील बरेच सुधारक वृत्तीचे आहेत हें त्यांतल्या त्यांत बरं आहे. मी अन् जयंत मिळून सांगून पाहूं त्यांना. त्यांचा निर्णय कळला म्हणजे पत्रानें कळवीन तुम्हांला. तोंपर्यंत घरींबिरीं भेट घेण्याचा मात्र प्रयत्न करूं नका तुम्ही. माझी आई इतकी जुन्या संकुचित वृत्तीची आहे कीं, आतांच तिनं मला शब्दांनीं टोंचून टोंचून घायाळ केलं आहे—नुसत्या संशयानेंच. अगदीं घराबाहेर पडण्याची सुद्धां मनाई आहे मला. शेवटीं मैत्रिणीकडे जातें म्हणून सांगून कशीतरी बाहेर पडलें मी आज. माझ्या बरोबरही येऊं नका तुम्ही—जगाला तोंड देण्याइतकी आपली बळकट तयारी झाल्याशिवायच त्याला डिवचण्यांत काय अर्थ आहे ? जातें मी.'

ती निघून गेली आणि मी तासभर व्यग्रपणें संगीताचे सूर ऐकत बसलों

होतों. तिच्या शेवटल्या फाजील कांटेकोर आणि सावधपणाच्या शब्दांनीं माझ्या उत्साहावर थोडं विरजण पडलं खरं, परंतु नंतर विचार करून मी ठरविलं कीं एकंदरीनें पहातां तिनें नकार कांहीं दिला नाहीं. अडचणी आहेत—नसतात कशांत ? पण माझी खात्री आहे कीं, आज ना उद्यां त्या दूर करून आम्ही प्रेमसिद्धी करून घेऊंच घेऊं. इतक्या आशा-वादीपणानें मी तुला हें पत्र लिहीत आहे याचें कारण हेंच आहे. मध्यं-तरी ती मला विसरली की काय या शंकेंनच मी व्यग्र होतों—ती शंकातरी अस्थानीं ठरली यानेंच मला मूठभर मांस चढलें आहे. माझ्याकडून होईल तितकें जयंत देसाईचें मत अनुकूल करून तिच्या वडिलांच्या मनाचा थांग लावण्याचा आतां मी प्रयत्न करणार आहे. शेवटचा निर्वाणीचा उपाय आहेच, पण तितका प्रसंग येऊं नये असें वाटतें.

तुझा,

वसंत.

## ३२ वसतिगृहांत.

शनिवार, पेठ पुणें.
ता.

मित्रवर्य वसंत यांसः—

वर्तमानपत्रें चाळीत असतां तुमचें कॉलेज आणि गुजरात कॉलेज यांमध्यें नॉर्थकोट शील्ड ची फायनल मॅच होणार आहे हें वाचलें. महाराष्ट्रीय वर्तमान पत्रांत तिकडील मॅचेसचीं सविस्तर वर्णनें येत नाहींत. टाइम्समध्यें पहावें तर केवळ दोन्ही बाजूंच्या खेळाडूंचे स्कोअर आणि गोलंदाजांच्या चेंडूच्या पृथक्करणाचीं कोष्टकें ! एरव्हीं मी क्रिकेटसारख्या खर्चिक खेळांचा फारसा भोक्ता नाहीं. परंतु या मॅचच्या खेळाडूंमध्यें तुझा समावेश झाला असल्यानें आपलेपणा वाटतो. नारायणाच्या मागील पत्रांतही हीच पृच्छा होती. दक्षिण महाराष्ट्राचा क्रिकेटचा लौकिक तुझ्यावर अवलबूंन आहे. मॅच् आटोपल्याबरोबर मला सविस्तर पत्र टाक.

तुझ्या आणि नारायणाच्या बऱ्याच काळापूर्वील पत्रांत इकडील वसतिगृहांतील जीवनाबद्दल कुतूहल आणि शंका प्रदर्शित केल्या होत्या. परंतु अपुऱ्या अनुभवावरून लिहूं नये म्हणून आतांपर्यंत या जीवनाबद्दल उल्लेख केला नाहीं. मात्र त्यानंतर बरेच वेळ वसतिगृहांतील माझ्या अनेक विद्यार्थ्यांच्या खोल्यांतून मी राहून आलों. आतां सव्वा टर्मचें अवलोकन आणि अभ्यासाच्या आधारावर इकडील रेसिडेन्सीच्या विद्यार्थीजीवनावर या पत्रांत दोन ओळी लिहिण्याचें ठरविलें आहे. त्यावरील माझे विचार, टीका, टिपणी वगैरे आतां तुझ्यापुढें आहेत. तुझ्या अनुभवावरून त्यांना कांहीं दुरुस्ती जोडावयाची असल्यास मला अवश्य कळीव.

गर्दीच्या शहरांत, स्वस्त भाड्याच्या कोंदट खोलींत रहाणाऱ्या माझ्यासारख्या विद्यार्थ्यांपेक्षां खुल्या मैदानांतील, राजशाही बांधणीच्या खोल्यांतून रहाणारे विद्यार्थी भाग्यशाली तर खरेच. भोंवतालीं सपाट हिरवीगार मैदानें, समोर नजर अडविणाऱ्या उंच टेकड्या, आणि आभाळाला खळी देणारीं त्यावरचीं देवळें. अगदीं जवळ भोंवतालीं पाहिलें तर नागरीक जीवनाच्या सर्व सुखसोयी अगदीं हांकेवरच.

टेनीस कोर्टें, लायब्ररी, स्नानगृहें, भोजनगृहें सर्व कांहीं हाताशींच. अशा स्वतंत्र आणि स्वयंपूर्ण विद्यानगरांतच त्यांचें वास्तव्य असतें. अभ्यासाच्या खेळाच्या आणि उनाडचैनी करण्याच्याही सर्व प्रकारच्या सोयी तेथें असतात, आणि आपापल्या भक्तीप्रमाणें जो तो बऱ्या वाईट गोष्टी आत्मसात् करून घेतो.

सकाळीं साताच्या सुमाराला तूं या रेसिडेन्सीकडे बघशील तर एकाद्या मोठ्या रेल्वे जंक्शनवर एंजिनांचा वाफ सोडण्याचा आवाज येतो, तसा आवाज घुमत असलेला तुला ऐकूं येईल. साऱ्या खोल्यांतून पेटलेल्या स्टोव्हज्चा आवाज असतो हा. त्यांचा भरदार सूर लागलेला आहे, कपबशांचा खणखणीत ताल धरला गेला आहे, अशा सांथीच्या सजावटींत खोली खोलींतून आमच्या कॉलेज–कुमारांचें गायन सुरू असतें. हा बेफि-कीर आनंदी आणि प्रसन्न देखावा या दिवसांत मनांत भरून घेतला कीं, त्याची जन्मभर आठवण राहील.

अनेक वर्षें लोटतील, मिळविलेलें ज्ञान पुसलेल्या पाटीप्रमाणें मनांतून निपटून जाईल, जीवनार्थ कलहाच्या धकाधकींत आपणही झगडत, कोठें-तरी भटकत, सुखदुःखांच्या ऊन सांवल्यांत तापत निवत राहूं; पण या कॉलेजच्या वर्षांतले अनुभव मात्र त्या परिस्थितींतही मनाला हुरूप देतील. आतां माझ्या चंद्रमौळी खोलींत येऊनही मी स्टोव्ह पेटविला कीं, मना-पुढें हें चित्र उभें राहतें—

पूर्वेकडे नुकतें तांबडें सूर्यबिंब फुललें आहे, झोपेनें भारावलेल्या डोळ्यांनीं आपण दार उघडून दूध आंत घेतलें आहे, आणि खोलींतल्या सोबत्याला एक स्नेहाळ शिवी देऊन उठविलें आहे. पांच मिनिटांनीं एका टेबलावर स्टोव्ह फुसफुसत आहे, मानेमागें हाताची मिठी मारून कॉटवर वळकटीला टेकून आपण उगीचच कांहींतरी मनोहर विचारमालिकेंत गुरफटून गेलों आहोंत. भोंवतालच्या खोल्यांत कोणी गाणीं ललकारीत आहेत, कोणी अलगुजाचे सूर काढीत आहेत, कोणी नुकत्याच आलेल्या दैनिकावरून मिस्किल नजर फिरवून त्यांतील बातम्या, अथवा डोळ्यांत भरणाऱ्या जाहिराती आपल्या इरसाल फटकळ धांवत्या टीकेसह वाचीत आहेत.

चहा संपल्यावर खोलीला कुलूप ठोकून, टेनीस कोर्टाच्या घंटेकडे लक्ष्य देऊन, रॅकेट फिरवीत खेळासाठीं निघालों आहोंत—

कॉलेजच्या चार वर्षांत नित्य परिचयामुळें अशीं चित्रें अगदीं सामान्य वाटलीं तरी त्याची खरी किंमत कॉलेजचें जीवन संपवून जगाच्या धड-पडींत उडी घेतल्यावरच खरोखर पटते असें प्रो. सुधाकर मला अनेकदां बोलून दाखवितात.

यानंतर मोटमोठ्या बॉयलरमधून गरम पाणी खेळविलेल्या स्नान-गृहांत अकरा वाजेपर्यंत नुसते कानटळ्या बसविण्याइतके धरणीकंप होत असतात. श्रीमंत विद्यार्थ्यांच्या तैनातींतील स्नानगृहांचे नौकरच त्यांचेसाठीं पाणी काढून, टॉवेलचे क्रम लावून वर्दी देतात, बाकी इतरेजनांना मात्र स्नान म्हणजे तासाभराचा कार्यक्रमच असतो. एकेका बंद दारावर दोन दोन तीन तीन मागण्या लागलेल्या असतात; आणि गरम पाण्याच्या नळासमोर बादल्यांची फर्लांगभर लांब रांग लागलेली असते. त्यांचा खण-खणाट, नौकरांची आरडाओरड, दारें ठोठावण्याचे आवाज, पाण्याचा खळ-खळाट आणि हंशाचे लोट, यांतूनच प्रत्येक बंद दारामागून मोटमोठ्यानें गाण्याचे आवाज येत असतात. संगीत शास्त्रज्ञांनीं गाण्याचे अनेक प्रकार केले आहेत. परंतु स्नानगृहांतील गाणें हा आधुनिक विद्यालयीन प्रकार मला त्यांत नवीन घालावासा वाटतो. चारचौघांत कधीं कधीं तोंड न उघडणारे, बारीक, किरट्या, कोत्या, फुटक्या, किंवा भसाड्या आवाजाचे विद्यार्थी देखील या नव्या गायन प्रकाराचे शौकी असतात. एकदां स्नानाच्या खोलीचें दार लागलें, बादलींत थंड पाण्याचा नळ सुटला म्हणजे त्याचा सूर लावून, आवाज अगदीं तार सप्तकापर्यंत खेंचून, ओरडून साऱ्यांचें गाणें चालूं असतें. लोकप्रिय बोलपटांतील, ग्रामोफोनमधील, पदांची सहज उजळणी करावयाची असेल तर या स्नानगृहांत तासभर येऊन गेलें तरी काम भागेल. गोल धोतर गुंडाळून, ओल्या कपड्यांचा गोळा क्लबमध्यें टाकून, तांब्या भरून घेऊन सारे खोल्यांकडे वळतात. कॉलेज सुरूं असलें म्हणजे साडेनऊ पासूनच क्लबमध्यें ताटवाट्यांचा चौघडा झडूं लागतो. क्लबच्या स्थापनेपासूनचे फोटो भिंतीवर लटकत असतात. क्षेत्राच्या ठिकाणीं वंशपरंपरा घराण्याच्या यात्रा तेथें उपाध्यायाजवळ

असतात तसे हे वंशपरंपराचे फोटो भिंतीवर लागलेले असतात. रेसिडेन्सींत आल्यावर एकदां साऱ्या क्लबांची यात्रा करून आपले जुने नातेवाईक कोणत्या फोटोंत सांपडतात त्यावरून क्लबांची निवड होत असते. त्यांत पुन्हां कानडी, वऱ्हाडी, खानदेशी, गुजराती, वगैरे प्रादेशिक आणि रुचिवैचित्र्याला अनुरूप असे क्लब असतात. बाकी साऱ्यांचाच बेत मात्र सढळ हाताचा. दर रविवारीं कांहींतरी मेजवानी टरलेली, शिवाय सणा-सुदीचा बेत निराळाच. पण इतक्या नाना तऱ्हा करूनही, एकेकट्याचें जेवण पहावें तर तें चिमणीसारखें !

या बाबतींवर तेथें मित्रमंडळींचा आणि माझा थोडासा खटका उडाला. जेवण अटपून बाहेरच्या ताटांतली बडीशेप, सुपारी तोंडांत टाकून आम्ही एकत्र जमून बसलों होतों. कोणी अग्निहोत्रें पेटविलीं होतीं, कोणाची वामकुक्षी चालली होती, कोणी पत्त्यांत रंगले होते. पण सुट्टी असल्यानें बहुतेकांचे आळसलेल्या गप्पाष्टकांचे अड्डे बसले होते. मी सहज माझ्या मित्राला विचारलें—' बन्या ! खर्च किती येतोरे महिन्याला या क्लबमध्यें ?—

नक्की नाहीं बुवा ! येतो वीसपासून पंचवीसपर्यंत कमीजास्त ' तो बेफिकीरपणें म्हणाला. माझ्या तोंडून उद्गार निघून गेला ' अरे एवढ्यांत दोनजण चांगले पोटभर जेवतील कीं ! '

तेवढ्यानें गरम होऊन एक जहाल मित्र माझ्यावरच उसळले. ' अरे तुझ्यासारख्या हातानें भाकरी थापणाराच्या डोळ्यांत यायचंच आमचं जेवण—सारेच कांहीं तुझ्यासारखे ' **राजवाडे** ' लागून गेले नाहींत. अन् आम्ही खातों हें आमच्या बापाचंच खातों बरं कां, कुणाकडून मागून आणत नाहीं. अरे ! आतांशीं पहातों तर आमचा घांस प्रत्येकांच्या घशांत अडकतोय्. कारे बाबा असं ? नीट जेऊं खाऊंही नाहीं कां आम्ही ' ?—' तसं नव्हे बापट ' मी म्हणालों ' वीस नाहीं तीस रुपयांचं कसदार अन्न खरोखरंच तुमच्या पोटांत गेलं तर मला तरी आनंद नी समाधानच वाटेल. प्रकृती तरी खणखणीत राहील तुमची. पण आतां खरं सांगा अं. ! या वीस रुपयांपैकीं किती रुपयांचं अन्न खरोखरच तुमच्या पोटांत जातं ? उष्ट्या तुपाचे लोटच्या लोट गटारांतून वहात

जातात, दह्यादुधाचे ओहळ वाहतात—भात, पोळ्या, मसालेदार भाज्यांचे ढीग कचऱ्यावरी जातात, हें मी प्रत्यक्ष पहात आहे. हें पहा ! मला उगीच उपदेश करायचा नाहीं शिष्टासारखा; किंवा इतरांच्या अन्नान्नदशेचं आणि तुमच्या या नासाडीचं विरोधी चित्र उभें करून तुम्हांला लाजवायचंही नाहीं. मी म्हणतों जेवा–खा–अगदीं भरपूर; पण कष्टाचे पैसे मोजलेलं हें अन्नब्रह्म मातींत मात्र तुडवूं नका. धान्य, किराणा, तूपतेल यांच्या खरेदींत सुद्धां या वीस रुपयांतील किती बचत करतां येईल याची कल्पना आहे कां तुम्हांला ? बाहेर कुत्सित लोक म्हणतात कीं, कांहीं सेक्रेटरी आंतून कमिशन घेऊन, क्लबसाठीं महाग दुकानदाराकडचाच माल घेतात, पण मी तसं बिलकूल म्हणत नाहीं. मला एवढंच सांगायचं कीं, इतके क्लब मिळून प्रत्येकानं निरनिराळा माल आणून जो महाग भाव तुम्हांला पडतो त्यापेक्षां साऱ्या क्लबांची ठोक मागणी एका घाऊक वखार-वाल्याकडून आणली तर माल चोख मिळून, भाव कितीतरी स्वस्त पडेल. परवां प्रो. सुधाकरांकडे बोलणें निघालें तर त्यांनीं सहज एक योजना मला सुचविली. या साऱ्या क्लबच्या व्यवहारासाठीं एक पगारी व्यव-स्थापक ठेवून त्यानें ठोक खरेदीचें काम आणि रोजचा माल मोजून देण्याचें काम कसोशीनें करावें. हिशेब ठेवण्याचें, बिलें काढण्याचें व गोळा करण्याचें कामही त्याच्याकडेच असलें तर खर्चांत किती तरी बचत होईल. हल्लीं आचारी नौकरांच्या भरमसाट मागणीप्रमाणें तुम्ही माल देतां, त्यांतला उपयोगांत येतो किती, आणि तुम्ही कॉलेजांत गेल्यावर त्यांच्या घरीं जातो किती हें पाहिलं आहेत कां तुम्ही ? पण एकाद्या तज्ज्ञ माणसाकडे हें काम सोपवून दिलें तर या साऱ्या नौकरांचा हा मलिदा बंद होईल. याचा अर्थ असा नव्हे कीं, तुमच्या क्लबच्या स्वतंत्र पद्धती-वर या पगारी चिटणीसांचें बंधन राहील. काय खरेदी करावयाची, पदार्थ कोणचे करावयाचे, केव्हां करावयाचे, तुमच्या आवडीनिवडी-प्रमाणें सारे प्रकार करण्याला तुम्ही मोकळे रहालच. फक्त या साऱ्यांत तुमच्या नवखेपणाचा अगर निष्काळजीपणाचा फायदा घेऊन, भाजीवाले, आचारी, वाढपी, गडी, सारेच आडवा उभा हात मारतात; दहा रुपयांचेंही अन्न तुमच्या पोटांत न जातां वीस पंचवीस

रुपये मात्र खिशांतून काढावे लागतात, याचा चांगला बंदोबस्त होईल. आपणच असा जागरूकपणा दाखविला तर वेळीं अवेळीं विद्यार्थ्यांच्या चैन आणि उधळपट्टीवर व्याख्यानें झोडणाऱ्या, असतील नसतील तेही दुर्गूण त्यांना चिटकवून त्यांचीं भडक वर्णनें करणाऱ्या अमर्याद टीकाकारांचींही तोंडें आपोआप बंद होतील.

माझं बोलणं अगदीं सरळ आणि सहानुभूतीचं होतं. परंतु ते त्यांना पटलं असं मात्र मला दिसलं नाहीं.

'बोलायला काय जातंय दुसऱ्यांना—करून दाखवा म्हणजे कळेल. उगीच शिष्टपणाची टीका नको आहे आम्हांला.' असें तिरसटपणाचें उत्तर ऐकून मी त्या विषयांवर बोलणंच बंद केलें. हें पाहून मला खोलीवर पाहुणा म्हणून बोलावणाऱ्या माझ्या मित्रानें खुषीनें विषय बदलला.

'जाऊं दे रे बाबा ही कर्मकटकट. आज ग्रेटागार्बोच्या नव्या पिक्चरला कोण कोण येणार ते बोला'! यानंतर बोलपटांच्या सृष्टीकडे साऱ्यांचा रोख वळला. ओघानेंच थिएटर, त्यांतील प्रेक्षकजन आणि त्यांतल्या कॉलेजच्या मुली, त्यांबरोबर दिसलेल्या व्यक्ति याबद्दल त्यांचें बोलणें सुरू झालें.

सोंवळे व शिष्ट लोक कितीही टीका करोत, प्रेम हा जगाच्या आदिकालापासून कलेचा, वाङ्मयाचा आणि संभाषणाचा विषय झालेला आहे, हें नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं.

वाढत्या वयाबरोबर नुकतीच उद्भवणारी प्रणयभावना विद्यार्थ्यांच्या खासगी संभाषणांत, विनोदांत, कोट्यांत नेहमीं दिसून येते. दुरून पाहिलेल्या, अपरिचित आणि स्वप्नांतल्या छायांप्रमाणें तरंगत जाणाऱ्या कॉलेजच्या मुलींबद्दल त्यांत चर्चा, आकांक्षा, क्वचित्प्रसंगीं शिष्टाशिष्ट विनोद ऐकूं येतो. एवढ्यावरूनच कांहीं टीकाकार त्यांच्यावर सरसहा वैषयीक उल्लूपणाचा शिक्का ठोकतात, आणि त्यांच्या काल्पनिक अनाचाराचीं, बदफैलीपणाचीं भडक चित्रें रंगवितात. हा प्रकार अगदीं गर्हणीय आहे.

खरें तर कॉलेजविद्यार्थ्यांच्या मनांतील प्रेमभावना ही एक तरल, अद्भुतरम्य, पूजनीय अशी भावना असते. एखाद्या व्यक्तीबद्दल प्रेम

नसून प्रेमभावनेवरील तें प्रेम असतें. अशा ध्येयात्मक प्रेमापलीकडे वैषयिक पिपासा किंवा प्रत्यक्ष अनाचार यांचा संपर्कही बहुतेकांना होत नसतो. पण उगीच तात्त्विक वाद कशाला ? प्रत्यक्ष आंकडेवारी पाहिली तर हजार मुलांच्या कॉलेजांत शंभर मुलींचें प्रमाण म्हणजे डोक्यावरून पाणी. हें मोठ्या शहरांत, इतर ठिकाणीं मुली म्हणजे वाळवंटांतली तुरळक हिरवळ. यांपैकीं किती मुलांना विद्यार्थिनींचा सहवास, ओळख किंवा नुसत्या संभाषणाचाही लाभ होणें शक्य असतें हें कोणाही डोळस टीका-काराला तेव्हांच दिसेल, आणि विद्यार्थ्यांच्या केवळ संभाषणांतील विद्यार्थि-नींच्या उल्लेखांचा कितपत आणि कसा अर्थ लावावयाचा हेंही कळून येईल.

आतां मूठभर डोळ्यांत भरलेले अपवाद म्हणशील तर ते कुठेंही— अगदीं महर्षींच्या तपोवनांतही सापडतील. रंगेल राघू आणि उनाड मैना शोधायला कॉलेजच्या बागेकडेच धांव घ्यायला पाहिजे असें नाहीं—जगाच्या जंगलांत त्या कुठेंही सांपडतात.

आतां माझ्यावरून म्हणशील तर असे परिचय होणें आधीं कठीण, आणि झाले तर स्थिर प्रेमानें टिकवून, त्यांची स्थिरप्रेमांत परिणति होणें त्याहून शतपटीनें कठीण. भिन्न प्रदेश, संस्कृति, सामाजिक, सांपत्तिक दर्जा या साऱ्या दिव्यांतून तावून सुलाखून बाहेर पडलेलें प्रेम मला तरी वंदनीय आणि लोभनीयच वाटेल.

गुढग्यांत मान घालून बसणाऱ्या, अपरिचित, बुजऱ्या, अज्ञात आवडी निवडीच्या मुलीबरोबर डोळे झांकून लग्न करण्यापेक्षां, वर उल्लेखिलेल्या साऱ्या अडचणींतून निभावून, पदवी घेऊन नागरिक झालेल्या व्यक्तींचा प्रेमविवाह हा केव्हांही श्रेयस्कर आहे असें मला वाटतें. परस्पर प्रेम असावें असें वाटतें सर्वांनाच, तसें भाग्य येतें थोड्यांच्याच वाट्याला, आणि त्यांतूनही तें प्रेम सफल होतें अगदीं एखाद्याच्याच बाबतींत. ही स्थिति हल्लीं आपल्या समाजांत आहे. हजार मुलांच्या कॉलेजातलें एखादें प्रेम-प्रकरण सगळीकडे गाजून त्यावर टीका होते; परंतु या टीकाकारांना पाहिजे तशाच तऱ्हेचें जीवन जगणाऱ्या नऊशें नव्याण्णव विद्यार्थ्यांवर त्यांनीं लक्ष देऊन समाधान कां मानूं नये ?

—अरविंद.

## ३३ पुणें-समाचार.

ता.

( एक कात्रण )

काल रोजीं येथील कॉलेजांत एक अभिनंदनीय व नाविन्यपूर्ण समारंभ करण्यांत आला. कॉलेजमधील वादमंडळ, किंवा संमेलनाच्या समारंभापेक्षां तो अगदींच निराळ्या तऱ्हेचा असून, नवीन पायंडा पाडणारा व इतर कॉलेजांतील विद्यार्थ्यांनाहीं अनुकरणीय असल्यामुळें आमच्या वाचकांसाठीं त्याची थोडी विस्तृत हकीगत खालीं दिली आहे.

या समारंभाचें मुख्य कार्य म्हणजे विद्यार्थ्यांनींच चालविलेल्या सहकारी संस्थेचें उद्घाटन. कार्यास उत्तेजन देण्यासाठीं स्वतः शिक्षण मंत्र्यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें हें विशेष होय.

या योजनेचे उत्पादक, बी. ए. च्या वर्गांतील विद्यार्थी श्री. अरविंद पटवर्धन यांनीं संस्थेचें कार्य व जरूरी, तिच्या उगमाबद्दलची पूर्वपीठिका वगैरे हकीगत सांगून योजनेचा त्रोटक आराखडा वाचून दाखविला. त्यावरून कळतें कीं, ही संस्था व तिचे अधिकारी विद्यार्थीवर्गांतूनच निवडलेले असून, केवळ हिशेब तपासनीस व सल्लागार म्हणून अध्यापकांपैकीं एकाची मागणी विद्यार्थीच करणार आहेत. संस्थेचें भांडवल तूर्त चार हजार रुपयांचें असून, एक एक, पांच व दहा रुपयांच्या भागांत विभागलें गेलें आहे. सध्यां संस्थेनें हातीं घेतलेले भाग म्हणजे ( १ ) **विद्यार्थीभांडार**—स्टेशनरी, पुस्तकें, कटलरी, होजीअरी खेळांचें सामान वगैरे.

**( २ ) कफे कॉलेज.** हे विभाग यशस्वी झाल्यास विद्यार्थ्यांसाठीं एंप्लॉयमेंट ब्यूरो, प्रायोगिक व सुलभ असे व्यापारी व धंदे शिक्षणाचे फावल्या वेळेचे वर्ग, वगैरे विभाग कॉलेजच्या मदतीनें काढण्याचा विचार आहे. सर्व तपशीलवार नियम व योजना छापील स्वरूपांत आमचे हातीं आली असून ती उद्यांचे अंकांत प्रसिद्ध करण्यांत येईल.

श्री. अरविंद पटवर्धन यांचे भाषणानंतर अध्यापकांपैकीं व विद्यार्थ्यांपैकीं कांहीं वक्त्यांची अभिनंदनपर व सूचनात्मक अशीं भाषणें झालीं.

शेवटीं अध्यक्षांनीं सुमारें पाऊण तास अत्यंत उद्बोधक व कळकळीचें भाषण केलें. ते म्हणाले,

आजच्या विद्यार्थिवर्गावर परधार्जिणेपणाची, बेफिकीरीची व पांढरपेशेपणाच्या कामचुकारीची कडक टीका करण्यांत येते. सर्वथा नसली तरी बऱ्याच अंशानें ही खरी आहे असें मला वाटत असे आणि खेदही होई. परंतु आज येथें येऊन आपल्या या नव्या संस्थेचें उद्घाटन करतांना मात्र मला फार समाधान वाटत आहे. बेफिकीरीच्या झोंपेंतून खडबडून जागे होऊन, जबाबदारीच्या जाणिवेनें तुम्ही कार्याला लागलांत याचें हें सुचिन्ह होय. अशा संस्था या कॉलेजमध्येंच नव्हे, तर प्रत्येक कॉलेजांत दिसल्या पाहिजेत. परंतु ही संस्था म्हणजे ध्येयसिद्धि नसून प्रगतीच्या मार्गावरील केवळ पहिलें पाऊल आहे हें समजून तुम्ही सतत प्रयत्न करीत राहिलें पाहिजे. शिक्षण घेत असतांनाही कार्याची हौस असणाऱ्यांना काय करतां येईल हें दाखविणारें सुचिन्ह म्हणजे ही संस्था होय—मित्र हो ! मागें एक काळ असा होता कीं, केवळ कॉलेजचें पुस्तकी शिक्षण पुढील जीवनास पुरेसें असे, आणि त्यामुळें डोळे मिटून हें शिक्षण घेण्याकडे सर्वांचा कल असे, परंतु आज म्हणजे 'काप गेले, भोकें राहिलीं' अशी स्थिति राहिली आहे. काल बदलला आहे, त्याच्याबरोबर आपणही बदललें पाहिजे.

तथापि येथें मी स्पष्टच सांगतों कीं, बेकारी वाढते म्हणून उच्च शिक्षणच नको अशी ओरड करणाऱ्यांपैकीं मी नाहीं. एका विभूतीनें म्हटल्याप्रमाणें '**मनुष्य केवळ भाकरीवरच जगत नाहीं.**' 'काकोऽपि जीवति चिराय बलींच भुंक्ते,' अशाप्रमाणें केवळ पोटार्थी बनून सर्व बौद्धिक व कलात्मक शिक्षणाकडे तुम्ही डोळेझांक करावी, असें म्हणणाऱ्यांपैकीं मी नाहीं. परंतु बौद्धिक शिक्षण घ्यावयाचें तें थोड्यातरी सुस्थितींत असलेल्या व संस्कृतीपर शिक्षणाची आवड असणाऱ्या विद्यार्थ्यांनीं अवश्य घ्यावें. परंतु तें डोळे उघडे ठेवून घ्यावें. उगीच गतानुगतिक होऊन, भलत्या आशा उराशीं बाळगून, मनाचे मनोरे बांधूही नयेत आणि मग ते ढासळले म्हणून शिक्षणाला शिव्याशापही देऊं नयेत. आपल्याला जायचें आहे कोठें हें आधीं ठरवून, मग त्या मार्गाला लागा

एका गांवाची वाट चालत असतांना त्या वाटेनें आपल्याला दुसऱ्या वाटेकडे नेलें नाहीं, म्हणून त्रागा करण्यांत काय अर्थ ?

अशा प्रकारें योग्य निश्चय करून उच्च शिक्षणाच्या वाटेवर पाऊल ठेवल्यावर मात्र कोणच्याही प्रकारें बुद्धिभेद होऊं देऊं नका, आपल्या प्रयत्नांत शिथिलता येऊं देऊं नका. **आपल्या अंगांतील सर्व सुप्त शक्तींचा सर्वांगीण विकास करणें हें शिक्षणाचें ध्येय आहे असें मी समजतों.** उच्च शिक्षण म्हणजे कॉलेजांतील चार तासांचीं व्याख्यानें ऐकून स्वस्थ बसणें, अगर वायफळ वेळ दवडणें नव्हे. हे तास सोडून उरलेल्या वेळाचा उपयोग तुम्ही ज्या रीतीनें कराल त्यावरच तुमच्या शिक्षणाचा कस अवलंबून राहील. आज व्यावहारिक दृष्टीनेंच बोलावयाचें असल्यास धनुष्याला एखादी दोरी राखीव अशी असली पाहिजे ही इंग्रजी म्हण तुमच्या परिचयाची असेलच. माझें सांगणें इतकेंच कीं, तुम्ही साऱ्यांनीं प्रतिज्ञा करावी कीं कॉलेजचे शिक्षणकाळांत फावल्या वेळांत मी निदान एक तरी उपयुक्त धंदा अगर कला शिकेन. आजच्या जगांत असे कितीतरी व्यवसाय आहेत. फोटोग्राफी, पेंटिंग, संगीत, टंक-लेखन, इन्शुअरन्स एजन्सी, कॅनव्हासिंग, वृत्तपत्रव्यवसाय, टेलरिंग— साऱ्यांची यादी मी देत नाहीं. परंतु असे शिक्षणाचे अनेक प्रकार फावल्या वेळीं शिकून घेण्याची सोय सुदैवानें या शहरांत आहे. निदान दुसरें कांहीं झालें नाहीं तरी विद्यार्थीजगाच्या गरजा विद्यार्थी-वर्गानेंच पुरवाव्या इतकें स्वावलंबन व इतका आत्मविश्वास तुमचे अंगीं आला पाहिजे. शिक्षणक्रम संपून बाहेर आल्यावर बौद्धिक व्यवसाय तर असावेच, पण ते मिळेपर्यंत या चार वर्षांत तुम्ही मिळवून ठेवलेल्या ज्ञानाचा उपयोग तुम्ही करण्याइतकी धडाडी तुमचे अंगीं आली तरी मला अत्यंत समाधान वाटेल. या विचारांना पोषक अशी ही संस्था काढण्यांत पुढाकार घेतल्याबद्दल श्री. अरविंद पटवर्धन व त्यांचे सहकारी मित्र यांचेंही मी अभिनंदन करतों."

यानंतर आभारप्रदर्शन होऊन नामदारांनीं संस्थेच्या दारावरील रेशमी पडदा दूर करून तिचें कार्य सुरू केलें, व जमलेल्या विद्यार्थ्यांनीं त्या

गोड कार्यास सुरवात केली. कफे कॉलेजची व्यवस्था भपकेबाज नसली तरी अगदीं स्वच्छ व टापटिपीची होती. ऋतुमानाप्रमाणें आरोग्यास, पुष्टिकर व अत्यंत चवदार असे तयार पदार्थ स्वस्त दरापासून भारी दरापर्यंत बाहेर पाटीवर लिहून ठेविले होते. भिंतीवरील मोठमोठया तक्त्यांवर शरीराच्या योग्य वाढीला व आरोग्याला जरूर असलेलीं ओजद्रव्यें व घटक यांचे आंकडे दिले असून उपाहारगृहांत तयार असलेल्या कोणत्या पदार्थांत ते सांपडतात तेंही नमूद केलें होतें. संस्थेंतील विद्यार्थ्यांची आपुलकीची व्यवस्था, व नफेबाजीचा अभाव यामुळें इतर भपकेबाज उपाहारगृहापेक्षां येथील दरही बरेच स्वस्त दिसले.

अल्पोपहारानंतर अध्यक्षांनीं वस्तुभांडाराची पहाणी केली. शेवटीं कॉलेजच्या प्रिन्सिपॉलांनीं अध्यक्षांचे आभार मानतांना श्री. अरविंद पटवर्धन यांनीं कोणतीही जाहीरातबाजी न करतां, विचारपूर्ण रीतीनें विद्यार्थीवर्गाच्या प्रगतीसाठीं जे प्रयत्न केले त्यांचा गौरव केला. कॉलेजच्या संस्थेतर्फे या योजनेला त्यांचा पूर्ण पाठिंबा असल्याचें जाहीर करून, कॉलेजला लागणाऱ्या सर्व मालाची खरेदी, व उपाहारगृहाच्या व्यवस्थेसाठीं या संस्थेला आश्रय देण्याचें जाहीर आश्वासन दिलें. विद्यार्थिनींनीं खणखणीत आवाजांत राष्ट्रगीत गाइल्यावर हा समारंभ खलास झाला.

हाच आरंभीचा उत्साह कायम ठेवून, पुढील कार्य हातीं घेऊन, उत्तरोत्तर कार्याची व्याप्ति वाढवून या कॉलेजचे विद्यार्थी इतरांसही हें आदर्श उदाहरण घालून देतील, अशी आमची आशा आहे.

# ३४ नॉर्थकोट शील्ड.

सुरसागर नजीक,
बडोदा.
ता.

मित्रवर्य अरविंद यास वसंताचा नमस्कार. विशेष—

तुझें मागील पत्र पोंचलें. तेथील वसतिगृहांतील ब-याच गमती त्यांतून कळल्या. तुझ्यासारख्या स्कॉलरलाही नॉर्थकोट शील्ड मॅचबद्दल कुतूहल वाटावें ही आनंदाची गोष्ट आहे. तिची थोडी माहिती देत आहे.

आतांच खोलीवर येऊन फ्लॅनेलची पाटलोण, कोट नी बूट काढून ठेवून साध्या वेषांत आरामानें बसलों आहे. तीन दिवस बडोद्याच्या भर-उन्हांत नॉर्थकोट शील्ड मॅच्मध्यें खेळाची नुसती सक्तमजुरी करावी लागली. ती संपल्यावर बरेच दिवस लिहीन लिहीन म्हणून लांबणीवर टाकलेलें पत्र आतां लिहायला बसत आहे.

नॉर्थकोट शील्डचा शेवटचा चुरशीचा सामना आमचें कॉलेज आणि अहमदाबादचें गुजराथ कॉलेज यांमध्यें झाला. तोंपर्यंत भावनगर, सुरत वगैरे कॉलेजकडून आम्हांस म्हणण्याइतका प्रतिकार झाला नव्हताच. पण या शेवटच्या सामन्यानें मात्र परीक्षेची वेळ आणली. बोलूनचालून क्रिकेट म्हणजे दैवाधीन खेळ. कांहीं गुण सोन्याचा, कांहीं सवागीचा, त्याप्रमाणें कांहीं कौशल्य व कांहीं नशीब यांवरून अशा आणिबाणीच्या सामन्याचा निकाल लागत असतो.

आमच्या भव्य कॉलेजच्या मागील खोल नाल्यांतूनच जाणा-या पूल-वजा रस्त्यानें गेलें म्हणजे आमचें क्रिकेटचें मोठें मैदान लागतें. समोर राजवाड्यासारखे घुमट असलेली मुलांची गुजराथी रेसिडेन्सी, बाजूला रेक्टरचा बंगला, पलीकडे टेनीस-कोर्टें अशी आमच्या ग्राउंडची जागा आहे. या गांवाबाहेरही ग्राउंडला गेले तीन दिवस मात्र एकाद्या मोठ्या जत्रेचें स्वरूप आलें होतें. हायस्कूल व कॉलेजला सुट्टी असल्यानें ते सारे विद्यार्थी तिकडे लोटले होतेच, परंतु इतर व्यवसायांतूनही हरत-हेनें रजा

काढून आलेले क्रिकेटचे शोकी प्रेक्षक तीन दिवस भर उन्हांत हिरवळीवर बसून होते.

तसें म्हटलें तर आमची टीम चांगली दणगट होती, परंतु यापूर्वी सहज जिंकलेल्या सामन्यामुळें त्यांच्या अंगांवरून जरा गर्वाचें वारें गेलें होतें. त्या योगानेंच पहिल्या इनिंगमध्येंच आमच्या टीमनें अत्यंत शोभा करून घेतली. देसाई, मझमुदार आणि जोशी यांनीं चांगली गोलंदाजी करूनही आमच्या खेळाडूंनीं अगदीं साधे झेलही सोडले. जेथें अगदीं एकादीच धांव निघावयाची, तेथें अगदीं निष्काळजीनें फेंकलेला चेंडूच सीमापार जाऊन प्रतिपक्षास चांगल्या चार धांवा मिळाल्या असें अनेकदां झालें. शेवटीं गुजराथ कॉलेजच्या चांगल्या चारशें धांवा होऊन त्यांचा खेळ आटोपला. आमच्या कॅप्टननें आपल्या खेळाडूंना जबाबदारीची जाणीव देऊनही आमचा खेळ क्षेत्ररक्षणाइतकाच बेजबाबदार झाला. एकंदर संघाच्या परिस्थितीकडे लक्ष्य देऊन खेळण्याऐवजी स्वतःचेंच कौशल्य दाखविण्यासाठीं खेळणें हा आपलेकडील खेळाडूंचा ठराविक दोष आहे. विशेष धांवा न काढतां खेळणें हें त्यांना कमीपणाचेंच वाटतें प्रेक्षकांच्या, विशेषतः विद्यार्थिनींच्या तंबूतल्या टाळ्या घेण्यासाठीं सहा धावांची एकाद्या चेंडूची गगनभरारी भिरकाविणें हेंच त्यांना साऱ्या खेळाचें श्रेय वाटतें.

पहिल्या तीन चार खेळाडूंच्या ढांसळत्या खेळाला मी स्वतः धीम्मेपणानें खेळून आधार देण्याचा प्रयत्न केला, पण तो खेळ प्रेक्षक व इतरानांही आवडला नाहीं. यामुळें पुढील खेळाडूंनीं टोलेबाजीच सुरू केली आणि आमच्या प्रतिपक्षाला त्याचा चांगला फायदा मिळाला. विशेषतः अहमदाबादच्या मणिशंकर या गोलंदाजानें आमच्या खेळाडूंची मनोवृत्ति बरोबर ओळखली होती. पहिल्या एकदोन षट्कांमध्यें आमच्या खेळाडूंना सीमापार टोलाविण्याची संधी देऊन मध्येंच एकादा फसवा चेंडू तो टाकी; व त्यानें हुरळून आवेशानें बॅट फिरविणाऱ्या खेळाडूंचा नेमका त्रिफळा उडे, किंवा उंच आभाळांत उडालेल्या चेंडूचा सीमेजवळ झेल जाई. ही स्थिती दिसत असूनही आमचे अनेक गडी याला बळी पडले

व अडीचशें धांवांतच आमचा पहिला डाव संपला. दीडशें धावांचा प्रचंड खळगा भरून काढल्यावर मग दुसऱ्या धावांच्या बरोबरीची गोष्ट !

पहिल्या डावांत आम्हीं केलेल्या चुका आमच्या प्रतिपक्षानें दुसऱ्या डावांत स्वतःच गिरविल्या. कारण दीडशें धावांच्या सरशीनें त्यांचे डोळे फिरून गेल्यासारखेच होते. इतक्या वेळपर्यंत शांततेनें चाललेल्या सामन्याला यानंतर मात्र जरा चिरडीचें स्वरूप आलें. त्यांचा नायक खेळत असतांना त्याच्या चेंडूचा मागें झेल गेला.

हौस दॅट ?—विकेटकीपरबरोबर साऱ्यांनीं गजर केला.

अंपायरनें बोट वर केलें.

मात्र चेंडूचा स्पर्श आपल्या बॅटीला झालाच नाहीं असें त्यांचा नायक जातांना तावातावानें सांगूं लागला, आणि तो परत गेल्यावरही त्यांच्या तंबूतून कुत्र्यामांजरासारखे आवाज, शेम शेमच्या आरोळ्या आणि निंदाव्यंजक शब्द येऊं लागून खेळाच्या स्वास्थ्याचा भंग झाला. एका कोपऱ्यांत अमदाबादेच्या कांहीं मुलांनीं मारामारीलाही सुरवात केली, व भोंवतालचे प्रेक्षक सैरावैरा मैदानावर पसरले. शेवटीं दोन्हीकडचे नायक व अध्यापक यांनीं क्रीडांगणावर येऊन कशीबशी शांतता केली व मग खेळ पुढें सुरू झाला. परंतु एकदां दिलजमाईचा रंग गेला तो गेला. दोनशें धावांत त्याचा दुसरा डाव आटोपला. तरी विजयासाठीं खराब झालेल्या विकेटवर साडेतीनशें धावा करणें हें कार्य अत्यंत अवघडच होतें. आमच्या डावाची सुरवात होण्याच्यापूर्वी देसाईनें तंबूच्या कोपऱ्यांत साऱ्या खेळाडूंना एकत्र बोलवून त्यांना चांगली समज दिली—

"जरा माथूं ठेकाणावर राखीनें रमजो, अने पटा फेरववांनु बंध राखजो. नहीं तो शील्ड छटकी जशे हाथमांथी, अने बधा रेकार्डपर धूळ पडशे, धूळ, समज्या !"—

( डोकं जरा ठिकाणावर ठेवा अन् टोलेबाजी पुरे करा आतां. नाहींतर शील्ड हातांतून निसटलीच समजा. साऱ्या आतांपर्यंतच्या विजयाच्या रेकॉर्डची माती होईल अशानें. )

दुसरा डाव सुरू झाला. खेळाची आणिबाणीची वेळ होती. कधींही वर्षांत क्रिकेट ग्राउंडवर न फिरकणारे गंभीर, प्रौढ अध्यापक देखील

तंबूंत येऊन बसले होते; आणि शेजारील प्रेक्षकांना कुतूहलानें प्रश्न विचारून आपलें खेळाचें अगाध ज्ञान (!) प्रगट करीत होते. मुलींचा तंबू म्हणजे आमच्या कमेटी बागेंतील चित्रविचित्र रंगांच्या चिंवचिंवणाऱ्या पक्ष्यांचा पिंजराच बनला होता !

यावेळीं मात्र आमच्या पहिल्या जोडीनें अगदीं धिम्मेपणानें चेंडू अडविण्यांत भिंतीसारखा स्थिरपणा दाखविला. तासभर गोलंदाजी खिळखिळी करून धावा मात्र पंधराच झाल्या होत्या. परंतु पुढील खेळाडूंना याचा चांगलाच फायदा मिळाला. पटेल नांवाच्या आमच्या टोलेबाजानें नायक नको नको म्हणत असतां चौफेर पट्टे फिरवून अर्ध्या तासांत साठावर आंकडा नेला. शेवटीं शेवटीं तर अर्ध्या वाटेवर जाऊन तो चेंडू ठोकीत असे. पासष्ट धावा काढून तो बाद झाल्यावर आमच्या खेळाडूंनीं त्याला अगदीं खांद्यावर उचलून आणलें. यानंतर मीं व देसाई ही आमची दक्षिणी गुजराथी जोडी चांगलीच टिकली.

अशा दीर्घकालच्या सामन्यांत कौशल्याबरोबरच दणगटपणा व सहनशक्ति यांवरही बरेंच श्रेय अवलंबून असतें. कूपवाडच्या काळ्या माळावरील सामने, जुन्या सांगलींतील हुतूतू, व कृष्णा नदीच्या पुरांतील पोहोण्याची दमछाकी यांतून कमाविलेल्या कणखरपणाचा मला यावेळीं फार उपयोग झाला.

धोक्याचे चेंडू नुसते अडवून, जरा चुकलेल्या रोखाचे चेंडू मीं फटकारण्याकडे लक्ष दिलें. फळ्यावरील बेरजेच्या आंकड्याशेजारीं माझ्या स्वतःच्या पन्नासच्या बेरजांचा आकडा चमकूं लागला. मुलींच्या तंबूतून एक हिरवा रेशमी हातरुमाल सारखा फडकत होता. मी हंसाला भेट दिलेला तो हातरुमाल होता. शेवटीं देसाई बाद झाल्यावर पुढील खेळांडूला आणण्यासाठीं मी तंबूपर्यंत गेलों. तेवढ्यांत बाहेर येऊन हंसानें धीटपणानें सुचविलेंच 'खेल नी नाड हवे तमारे हाते छे, संभाळजो.' (साऱ्या खेळाची मदार तुमच्यावर आहे, संभाळा) आणि आंतल्या दुसऱ्या गुजराथी मुली तोंडाला रुमाल लावून 'वंठेल' (फाजील कुठली) म्हणून कुजबुजूं लागल्या. आमचे प्रिन्सिपॉल जोन्स देखील आपल्या गाजरासारख्या लाल गुळगुळीत टकलावरून घाम निपटीत

मला म्हणाले, ' प्ले अप् माय बॉय्, एव्हरिथिंग डिपेण्ड्स् ऑन यू नाऊ ' (धीरानें खेळ, आंता सारें तुझ्यावरच अवलंबून आहे.) बरोबरीच्या खेळाडूला चालूं गोलंदाजीचे डावपेंच मीं सांगितले व आमचा खेळ सुरू झाला. दीड तासानें शतक पुरें झाल्यावर माझा झेल गेला. प्रिन्सिपॉलनें स्वत: हस्तांदोलन करून आपल्यापाशीं बसविलें. आमच्या तीनशें चाळीस धावा झाल्या होत्या व शेवटची जोडी खेळत होती. साऱ्या मैदानाभोवतीं पडलेलें प्रेक्षकांचें कडेंही अगदीं स्तब्ध होतें. एकादा चेंडू अगदीं विकेटच्या रोखानें आला कीं, सारे श्वास कोंडून धरीत, व तो अडविला अगर टोलविला गेला कीं ' ग्रेड ' ! म्हणून एकच आरोळी येई. मुंगीच्या पावलानें एक एक धाव वाढत होती. शेवटच्या धावेच्या वेळीं मात्र जवळ जवळ इतिश्रीच झाली होती. उतावळीनें जवळचा फटका मारून धाव काढण्याच्या गडबडींत चुकलेला खेळाडू अर्ध्या वाटेवर जाऊनही घोटाळला आणि समोरून यष्टिरक्षकाकडे तीरासारखा येणारा चेंडू पाहून तसाच मागें वळला. साऱ्यांचा जीव अगदीं डोळ्यांत आला होता, परंतु दैवानेंच हात दिला झालें. त्या गर्दींत यष्टिरक्षकाचा हातून तो चेंडू सुटून पलिकडे गेला आणि आमचा खेळाडू पुन्हा सीमेच्या आंत पोहोंचला. अशा धामधुमीच्या परिस्थितींतच शेवटीं प्रतिपक्षाच्या बेरजेपेक्षां पांच धावा अधिक होऊन आमचा डाव आटोपला आणि अशा रीतीनें अनेक वर्षें हातांतून निसटलेली शील्ड या वर्षी आमच्या कॉलेजला मिळाली.

आतां हा महत्त्वाचा सामना आटोपल्यावर माझा ऐटदार वेष पेटींत टाकून अभ्यासाकडे लक्ष दिलें पाहिजे. त्यासाठींच हें पत्र तुला लिहिलें आहे. उगीच तपशीलवार विद्वत्तेसाठीं नको, परंतु नुसते पसार होण्यापुरते मार्क मिळविण्यासाठीं कोणचीं पुस्तकें कमींत कमी म्हणून वाचलींच पाहिजेत याची लहानशी यादी, आणि तूं काढलेल्या टीपा माझ्याकडे पाठव. त्यांची नक्कल करून तुला परत करीन. कसेंतरी पास झालें पाहिजेच. नाहींतर सांगलीला गेल्यावर बाबा कान धरून विचारायचें कीं, काकाकडे पाठविलें होतें ते अभ्यासासाठीं का क्रिकेट खेळण्यासाठीं ? तरी बरें, जर का आमचें हंसाप्रकरण त्यांचे कानावर गेलें तर आमचे जमदग्नि नुसते

भाजून काढतील मला. म्हणूनच परीक्षेनंतरच ही गोष्ट जाहीर करण्याचें मीं ठरविलें आहे. तुझ्या उत्तराची व साहित्याची उत्सुकतेनें मी वाट पहात आहे.

तुझा,
**वसंत.**

# ३९ साद आणि पडसाद.

पुणें, शनिवार पेठ,
ता.

मित्रवर्य नारायण यासी

अरविंदाचा सा. न. वि. वि.

बरेच दिवस तोंडसुख घ्यावयास न मिळाल्यानें गंजलेल्या जिभेला आधीं चांगली धार देऊन मग हें पत्र वाच. कारण लौकरच तुला तिचे चांगले पट्टे फिरविण्याची संधि मिळेल असें मला वाटतें. आतांपर्यंतच्या अनेक पत्रांतून तूं प्रत्यक्ष ओळख नसतांही सुधाच्या विरुद्ध माझें मन कलुषित करण्याचें मित्रकर्तव्य पार पाडीत होतास. सरला भिडेसारखी सुरेख व सुसंपन्न मुलगी मी कारण न देतां नाकारल्यानें बाबाही माझ्यावर संतापले आहेत, आणि आतां कदाचित् यावर कळसही चढेल. हें सारें सहन करण्याची तयारी करूनच मी तुला पत्र लिहीत आहे.

दुसरी टर्म झपाट्यानें चालली आहे, शिरस्त्याप्रमाणें काम उरकण्याची प्रोफेसरांची घाई चालली आहे. रेसिडेन्सीच्या खिडक्याही रात्रीं बेरात्रीं जागत बसतांना दिसतात. पण जाऊं दे. अवांतर गप्पा मारून मुख्य गोष्ट लपविण्यात काय अर्थ आहे ? केव्हां तरी ती उघड करावी लागणारच. तेव्हां कोणाचे तरी आधीं तुझ्यासारख्या जीवाभावाच्या मित्राजवळ ही आनंदाची बातमी सांगावी लागते, ती म्हणजे शेवटीं जिवाचा धडा करून मी काल सुधाला मागणी घातली.

या बाबतींत मला बरीच काळजी वाटत होती. मी परगांवचा सडा फटींग, फारसा मुलांमुलींत मिसळणारा नाहीं, श्रीमंत नाहीं, खेळाडू नाहीं. माझ्याहून अनेक पटींनीं श्रीमंत ऐटदार विद्यार्थी इकडे पसरलेले आहेत. कांहीं असो, इतकें असून इकडे आल्यापासून कसल्या तरी अदृश्य शक्तीच्या योगानें म्हण, जन्मांतराची संगती ओळखणाऱ्या मनःप्रवृत्तीमुळें म्हण, मी तिच्याकडे आकर्षिलों गेलों. अगदीं प्रेम नसलें तरी तिला माझा निदान तिटकारा तरी वाटत नसावा असें तिच्या मोकळ्या बोलण्याचालण्यावरून मला वाटत होते. तथापि शक्य तितकी सावधगिरी ठेवून

मी माझ्या मनाला लगाम घालीत असे. दिल्लीच्या बड्या ऑफिसरची लेक, मुंबईसारख्या कॉलेजांतून फिरून आलेली विद्यार्थिनी, माझ्यासारख्या साध्यासुध्या विद्यार्थ्याच्या प्रेमाचा स्वीकार करील कीं नाहीं, याबद्दल मला जबर संशय होता. मोकळ्या मैत्रीच्या भावनेचा भलता अर्थ करून मी तिला संकटांत तर टाकत नाहीं ना अशी मला शंका येई. या सर्व विचारांचा आढावा घेऊनच तिला कोणत्याही तऱ्हेनें संकट वाटू नये अशा सर्वसामान्य शब्दांत अत्यंत सावधगिरीनें शेवटीं मी तिला प्रश्न टाकला.

अगदीं परत येईपर्यंत तिच्या तोंडून एकही शब्द निघाला नाहीं. शेवटीं मला भीति वाटत होती त्याप्रमाणें तिला माझ्याबद्दल राग किंवा तिरस्कार तरी वाटू लागला नाहीं अशी शंका येऊन मी जवळ जवळ निराशच झालों. हळूहळू अंधार पडूं लागला होता. वाढत्या काळोखाबरोबर तिच्या मूकतेनें माझ्या हृदयांतील पावलागणिक तसाच अंधार वाढत चालला होता. आमचे दोघांचे रस्ते फुटण्याच्या जागेजवळ आम्ही आलों होतों. आमचे जीवनाचे मार्गही असेच फुटून दूरवर कुठें तरी जाणार काय असा विचारही माझ्या मनांत आला. शेवटीं मी म्हणालों, 'सुधाबाई' राग आला का तुम्हाला माझ्या प्रश्नाचा ? माफ करा. तुम्हाला दुःख व्हावें असा माझा हेतू नव्हता. तुम्हाला शंका वाटत असली तर आठवण करा, इतरांप्रमाणें क्षणिक प्रणयाच्या धुदींनें उल्लू होऊन मी बोलण्या–चालण्यांत कांहीं लघळपणा केलेला तुमच्या लक्षांत आहे कां ? तुमच्यासारख्यांची हांव धरणें हीच एक माझी चुकी होती असें मला वाटूं लागलें आहे. या प्रेमाच्या जगांत मी सराईत नाहीं—वेड्या मनाला मीं कितीदां बजाविलें, ताकीद देऊन बंदिवान केलें, शेवटीं अनिश्चितपणाच्या यातना सोसवेना म्हणून निराशेला कवटाळण्यास तयार झालों. स्वीकाराचें भाग्य माझ्या कपाळीं कोठलें—!'

भोंवतालच्या अंधारांत तरारलेल्या डोळ्यांपुढून सुधेची मूर्ति अदृश्य होत होती.

एकाएकीं, माझ्या कानांशीं बांगड्यांचा बारीक आवाज आला, खांद्यावर एक क्षण मृदु गोड असा भार पडला, 'होय' असा एकच शब्द

गुणगुणत कानांत शिरला. गुलाबाची पाकळी टेंकावी असा मऊ सुगंधि स्पर्श गालाला निसटून गेला. आणि कोणीतरी चटकन् जवळून पळून गेलेसें वाटलें.

मी भानावर येऊन, डोळे फाडून अंधाराचे पडदे भेदून टाकण्याचे प्रयत्न करीत होतों. त्या माळावर मी एकटाच उभा होतों. सुधा वापरीत असलेल्या केशरंजनाचा अस्फुट सुवास मात्र अजून माझ्याभोंवतीं दरवळत होता. सुखाच्या अतिरेकानें लोटलेल्या आसवांनीं माझे डोळे ओले झाले होते. दूरवर सुधेच्या खोलींत पटकन् दिवा लागलेला दिसला. बंद खिडकीच्या दुध्या तावदानामागून तिची अस्पष्ट आकृति इकडे तिकडे होतांना दिसली. तशा अंधारांत वेड्याप्रमाणें मी एक तास एकटा उभा होतों.

एकाद्या नवख्या प्रवाशाच्या दृष्टीला हिमालयाच्या पायथ्यावरून गौरी-शंकराचें शिखर प्रथम दिसावें, एकाद्या योगसाधकाला प्रथमच भ्रूमध्यांतल्या दैदिप्यमान अंतर्ज्योतीचें दर्शन व्हावें—त्यानंतर जी लीनता, निर्वेधता, कृतज्ञता, आणि शांतता वाटावी तशा नव्या भावना माझ्या हृदयांत उद्दीप्त होत होत्या. प्रेम हें खरोखर स्वप्नच असलें तर त्यांतून कधींच जागें होऊं नये असें सध्यांतरी मला वाटूं लागलें आहे.

तुझा,

अरविंद.

# ३६ कृष्णाकांठची खळबळ.

हरभट रोड,
सांगली.

मित्रवर्य अरविंद यांसः—नारायणाचा नमस्कार.

मला अगदीं वेड लागण्याची पाळी आली आहे. अरे, तुम्ही साऱ्यांनीं मांडलें आहे तरी काय ? अजून बी. ए. च्या पिंजऱ्यांतूनही सुटायला अवकाश आहे, आणि तेवढ्यांतच एखाद्या कादंबरीच्या शेवटल्या प्रकरणाप्रमाणें, मागण्यांची झोड काय उठवून दिली आहे तुम्ही ! तुझ्या पत्राप्रमाणेंच वसंत खांबेटेच्या पत्राच्या बॉंब गोळ्यानें मी नख-शिखान्त हादरून गेलों होतों. त्यांत तो लिहितो कीं, शेवटीं मनाचा हिय्या करून त्यानें हंसाला मागणी घातली, आणि त्यांच्या मैत्रीनें तेथें भयंकर वादळ उत्पन्न झालें आहे. आतां या वादळांतून झगडून ही हंसा पार पडणार कीं, त्यानें बुजून जाऊन पंखांत तोंड लपवून आपल्या घरट्यांत जाऊन बसणार याचीच त्याला शंका आहे. त्या विचारांत असतांनाच तूं सुधाला घातलेल्या मागणीचें व तिच्या स्वीकाराचें पत्र आलें. त्यानें तर मला अगदीं धरणीकंप झाल्यासारखें वाटत आहे. तुझी सुधा निदान आपल्यांतली आहे—( तरीपण आपली तिची पत्रिका-बित्रिका विचारून घे )—पण या परजातीच्या हंसाबद्दल कांहीं पत्ताच लागत नाहीं. अजून त्याच्या वडिलापर्यंत ही बातमी गेली नाहीं म्हणून. एकदां त्यांनीं हाकलून देण्याची धमकी दिली—बेकार आणि बहिष्कृत म्हणून वणवण फिरण्याची पाळी आली म्हणजे मग पाहूं यांचं प्रेम कितपत टिकतं तें. अरे बाबा, स्वजनांचे पाश तोडणें फार कठीण असतें. आपल्या पूर्वजांनीं हे सारे नियम घालून दिले ते काय सारे मूर्ख होते ?

हो ! तुलाही आपला सांगतों, या नसत्या उठाठेवी करायला सांगितलं आहे कोणीं तुम्हांला ? इकडे कांहीं सांगलीला मुली कमी पडल्या आहेत, कां तुमचीं लग्नें होत नाहींत म्हणून अशा स्वतः मागण्या घालतां रे ? अजून वडील आहेत, तुमच्यावर कृपाछत्र धरायला; विसरूं नका हें. वसंताला चांगला लिहिणार आहे कीं, संध्याकाळीं कृष्णाबाईच्या घांटावर जाऊन

पहा एकदां, तुझ्या हंसाहून हजारपट सुस्वरूप मुली अक्षरश: 'पाणी भर-ताहेत' इकडे. मातब्बरी काय तिची ? चांगली इस्टेट आहे, वडील आहेत, भलापुरा उंच तूं आहेस, मग मुलींना काय तोटा ? तुझ्या मना-प्रमाणं हवें तर स्वयंवर करूं तुझें. पण हा नाद सोड. ( आमच्या देव-लांनींच म्हटलं आहे ) बाकी तो येथें आल्यावर चांगलें कुरुक्षेत्र झाल्या-शिवाय रहायचें नाहीं, बघूं यापुढें काय होतं तें.

तुझा,
—नारायण.

ता. क.—हें पत्र लिहून पेटींत टाकण्यासाठीं जात असतां वसंतच्या घरच्या दाराशींच मी थबकलों. आंतून त्याचे वडील मोठ-मोठ्यानें तावातावानें वसंताला शिव्यांची लाखोली मोजीत होते, आणि त्यांतला तीर्थप्रसाद त्याच्या आईलाही मधून मधून अर्पण करीत होते. आंत पाहिलं तर ती माउली डोळ्याला पदर लावून स्फुंदत होती. मी खालीं मान घालून पुढें सरकणार होतोंच, तेवढ्यांत त्यांच्या दृष्टीच्या टप्यांत मी आलोंच अन् मग तासभर त्या बडोदी वड्याचें तेल या गरीब बिचाऱ्या सांगलीच्या वांग्यावरच निघालं. जवळचं फडताळ उघडून एक रजिष्टर पत्र त्यांनीं माझ्यापुढें आपटलं. गुळगुळीत मुंगळ्या-सारखीं त्यांतलीं अक्षरं माझ्या डोळ्यासमोर नुसतीं उडूं बागडूं लागलीं, पण ध्यानांत मात्र येइनात. पण मलाही इरसाल शिवी हांसडून, साऱ्या कॉलेजविद्यार्थ्यांचा उद्धार करून त्यांनीं सांगितलं कीं, हळदी बाजारांतून एका गुजराकडून नुकतंच त्यानीं तें पत्र वाचून आणलं होतं. बडोद्याच्या एका गुजराती वकीलामार्फत देसाई नांवाच्या मनुष्यानें त्यांना वसंताचे पालनकर्ते म्हणून नोटीस दिली होती, कीं वसंत त्यांच्या हंसा नांवाच्या मुलीमागें असून लग्न करण्याबद्दल, तिला दुसरीकडे घेऊन जाण्याबद्दल यत्न करीत आहे. हंसा ही कायदेशीर रीतीनें 'अज्ञान' असल्यानें मनुष्य-हरण आणि त्रास देण्याच्या रूपाचा हा गुन्हा होऊं शकेल. या प्रकाराला आठ दिवसांत आळा न बसल्यास बडोद्याच्या न्यायमंदिरांत त्यांच्यावर आणि वसंतावर फौजदारी खटला करण्याची त्यांनीं धमकी दिली आहे.

मग जी काय म्हाताऱ्याची मुलुखमैदान झडत होती ती कांहीं विचारूं नकोस. शेवटीं वसंताला तर तावडतोब इकडे निघून येण्याबद्दल जरूरीची तार माझ्याकडून लिहवून त्यांनीं ती पाठवूनही दिली, आणि तुला लिहि-लेलं हें पत्र चहाच्या किटलीवर धरून, उघडून, हा ताजा कलम लिहून टाकीत आहे. वसंताच्या भेटीगांठीनंतर पुढील पत्र टाकीन.

—नारायण.

( मूळ )

# ३७ नोटीस.

रावपुरा, ता.

वडोदरा.

रामचंद्र दशरथ खांबेटे अने वसंत रामचंद्र खांबेटे, रेहेनार सांगली—

अमारा अशील चतुरभाई देसाई, रेहेनार वडोदरा. अेमणे आपेली खबर मुजब तमने नोटीस आपवांमा आवे छे. जे——

——तमारो पुत्र वसंत खांबेटे, जे वडोदरा कोलेजमा सीनियर बी. ए. ना क्लासमां भणे छे—अेणे अमारा अशील चतुरभाईनी पुत्री हंसा नी ओळखाण करी लई, तेना अज्ञान मनस्थितीनो गेर फायदो लई, लग्नना बहाने तेने वडोदराथी नसाडी लइ जवानी कोशीस करी अेम जणाय छे. सदर कन्या हंसा अे कायदेसररीते अज्ञान होवाथी. आ कृत्य ‘ अपहरणनी कोशिश ’ तरीके फोजदारी कायदामुजब अपकृत्य थाय छे.

आ माटे तमने नोटीस आपवांमा आवे छे के, आपछी आठ दिवसनी अंदर, सदर वसंत अने तेना पालक तरीके तमे पोते, आ कृत्य माटे अमारा अशीलनी बिनसरत माफी मांगवी, अने आपछी हंसाबेन साथे आपछी कोइपण लखापडी अथवा रुबरु बातचीत करवानी कोशीस करवी नहीं.

आठ दिवसमां तमारा तरफथी उपर दरसावेल बाबतनी संमतिनो पत्र मळशे नहीं, तो वडोदरा राज्यना कायदा मुजब तमारा उपर फोजदारी अदालतमां काम चलाववांमा आवशे. तेना परिणाम अने खरच-माटे तमे जबाबदार रहेशो.

—प्रभुदास वकील,

( वरिष्ठ कोरट, वडोदरा. )

( भाषांतर )

# नोटीस.

रावपुरा,
बडोदें.

रामचंद्र दशरथ खांबेटे व वसंत रामचंद्र खांबेटे, रा० सांगली—

आमचे अशील चतुरभाई देसाई, रहाणार बडोदें, यांनीं माहिती दिल्यावरून तुम्हाला नोटीस देण्यांत येते कीं—

तुमचा मुलगा वसंत खांबेटे–( जो सध्यां बडोदा कॉलेजमध्यें सी. बी. ए. च्या वर्गांत शिकत आहे– ) यानें आमच्या अशिलाची मुलगी हंसा हिची हेतुपुरस्सर ओळख करून घेऊन, तिला लग्नाच्या निमित्तानें फूस लावून पळवून नेण्याचा प्रयत्न केला असें कळतें. सदर मुलगी ही कायदेशीर-रीत्या 'अज्ञान' असल्यानें हा प्रकार 'मनुष्यहरणाचा प्रयत्न' या गुन्ह्याच्या सदराखालीं मोडतो.

यासाठीं तुम्हांला नोटीस देण्यांत येते कीं, ही नोटीस पोंचल्यावर आठ दिवसांच्या आंत वसंत खांबेटे व त्याचे पालक तुम्ही, या दोघांच्या सहीचें बिनशर्त माफीपत्र आमच्या अशीलाकडे रुजू करावें. यापुढें पत्र-द्वारा किंवा समक्ष हंसाशीं कोणताही संबंध ठेवण्याचा यत्न करूं नये.

या दोन्ही बाबतींतील संमति दर्शविणारें पत्र तुमच्याकडून आठ दिवसांत न आल्यास बडोदें राज्याच्या कायद्याप्रमाणें तुमच्यावर फौज-दारी फिर्याद दाखल करण्यांत येईल. त्याच्या परिणाम व खर्चाबद्दल तुम्ही जबाबदार रहाल.

—प्रभुदास वकील,
वरिष्ठ कोर्ट, बडोदें.

# ३८ चाकाचे फेरे.

पुणें,
ता:—

प्रिय सुनंदा ईस

सप्रेम नमस्कार

किती किती लिहिणार होतें तुला, पण आज आलेलं बाबांचं पत्र वाचून सारे शब्द आटले. दुपारपर्यंत माझ्या तोंडांत आनंदाचं गाणं होतं, पण तें अर्ध्या चरणींच तुटलं. काल अरविंदांनीं आपलं मन उघडं करून मला मागणी घातली, बराच विचार करून, मनाची पुन्हां पुन्हां चांचणी घेऊन, शेवटीं मी त्यांना रुकार दिला. या वर्षाअखेर परीक्षा आटोपल्यावर आम्हीं लग्न करण्याचं ठरविलं होतं. त्यांच्याशीं लग्न केलं तर त्यांना घराचे बाहेर जावं लागेल, हेंही त्यांनीं मोकळ्या मनानं सांगून टाकलं. पण दोन प्रेमी जीव एकत्र आल्यावर त्यांच्यावर आभाळ कोसळलं तरी त्यांना त्याची पर्वा वाटत नाहीं. गरिबींत कुठेंही मीठभाकर खाऊन, त्याला आम्ही अमृताची चव आणूं, शिवाय जरूर पडल्यास माझे बाबा आहेतच—

या विचारांत मी असतांनाच पोस्टमननें एक पत्र खिडकींतून टपकन् आंत टाकलं. दारूगोळ्यापेक्षांही भयंकर असतात कांहीं कांहीं पत्र बरं!

मी तें पत्र वाचलं, अन् अजूनही ही खोली जणूं काय माझ्याभोंवतीं फिरत आहे असं मला वाटतं. शेवटीं अगदीं होऊं नव्हे तेंच झालं. अशोकाशीं मी लग्न करण्याचं नाकारलं होतं, आणि हें प्रकरण तेथेंच संपलं अशी माझी कल्पना होती. पण एकदां डूक धरला म्हणजे नुसत्या हुसकल्यानेंच साप कांहीं निघून जात नाहीं. दुसऱ्याचा पुरा जीव घेतल्याशिवाय, किंवा स्वतःचें तोंड ठेंचलें गेल्याशिवाय त्याचा पिच्छा सुटत नाहीं. माझ्याकडून आणि बाबांकडून स्पष्ट नकार मिळाल्यावर त्यानें स्वतःचं रूप प्रगट केलं आहे.

चार दिवसांपूर्वीच बाबांच्या कचेरींतील, म्हणजे खुद्द व्हाईसरायांच्या

आंतरराष्ट्रीय फाईलींतील अत्यंत महत्त्वाचे सरकारी गुप्त नकाशे व कागद एकाएकी गहाळ झाले आहेत. बाबांवर ही तोहमत आल्यास नुसती नौकरीच न जातां त्यांना कैदेंतही जावं लागेल. अशोक हे बाबांच्या वरचे अधिकारी. मी त्यांच्याशीं लग्न करण्याचं कबूल केलं तर ते हजार खटपटी लटपटी करून ही बाब दडपून टाकण्यास तयार आहेत, नाहींतर—— ?

बाबा भोळे सांब आहेत. ते तुरुंगांतही जातील, पण माझ्यावर विवाहाची सक्ती करणार नाहींत. परंतु ते तुरुंगांत खितपत पडल्यावर अरविंदाशीं लग्न करूनही मला सुख लागेल का ? आई वारली तेव्हां तिला मीं वचन दिलं होतं कीं, जन्मभर त्यांची काळजी घेईन म्हणून, आणि आज मी होऊन, माझ्या स्वार्थी प्रेमासाठीं त्यांना तुरुंगांत लोटूं का ?

अशोकांशीं लग्न ! अंगावर कांटा उभा रहातो माझ्या. नुसतं अरविंदावर माझं प्रेम आहे म्हणून नव्हे, तर एकंदरींत त्यांच्याबद्दल कळलेल्या गोष्टींमुळें देखील. मागेंच त्यांच्या आचरणाबद्दल गुणगुण माझ्या कानांवर आली होती, पण परक्याच्या वागण्याशीं आपणाला काय करायचं आहे म्हणून मीं तिकडे लक्ष दिलं नाहीं. ते सारे विसरलेले प्रकार आतां पुन्हां त्यांचें नांव दुप्पट दमदाटीनं आल्यामुळें माझ्या डोळ्यासमोर उभे रहात आहेत. मागेंच आमची मोलकरीण त्यांना पाहून माझ्या कानांशीं लागत असे——'ये अशोक साहब सीधे आदमी नही बाई ! ' चावडी बझार ' मे* टहलते रहते, लुगाई § यों के तरफ बूरी नजरसे देखते, और मैं सुनती हूं कि उन्हों की कोई बंगालिन रखात$ बी है.'

आणि अरविंद ! त्यांच्या प्रेमाचा स्वीकार करून कालच आमच्या आणाशपथा झाल्या, आणि आजच त्यांना कोणत्या तोंडानं सांगूं कीं, मला तुमच्याशीं लग्न करतां येत नाहीं म्हणून ? या बाबतींत अरविंद तरी काय मदत करणार ? कांहीं सरकारदरबारीं खटपट केली कीं, क्षणांत या मांगानें बाबांच्या गळ्याभोंवतीं फांस आवळलाच. सध्यां तरी

* **चावडी बाजार**—दिल्लींतील वेश्यावस्ति. § **लुगाई**—स्त्री.

$ **रखात**—अंगवस्त्र.

मी अगदीं निराश झालें आहे. काय लिहावं, काय करावं हें मला सुचे-नासं झालं आहे. तुम्हांला योग्य वाटेल तें करा असेंच मी बाबांना लिहिणार आहे.

——आणि जळालेल्यालाच पोळल्याचं दुःख कळतं. मी तर आतां निराश झालें आहेच. अरविंदांची काय स्थिती झाली असेल व होणार ही कल्पना आणून माझं काळीज चर्र होतं. माझ्या प्रेमाची वाताहत झाली याला कारण दैव. पण निदान तुझ्या लहरीपणामुळं तरी तूं सुरेश-सारख्या प्रेमळ हृदयाला जन्मभर दुःखाच्या खाईत लोटूं नकोस एवढंच मी तुला सांगतें. मी कितीही दुःखी झालें तरी तूं व सुरेश यांच्या सुखी संसाराकडे पाहून, ‘ मीही कदाचित् अशीच सुखी झालें असतें, ’ असें समाधान मानून मी राहीन.

अचला भांडारकर इचं लग्न ठरल्याची बातमी कळली. लग्नतारीख ठरली कीं मला कळीव, म्हणजे कांहीं तरी भेट पाठवीन तिला.

तुझी,

सुधा.

## ३९ अनपेक्षित आघात.

शनवार पेठ,
पुणें.

मित्रवर्य नारायण यासी अरविंदाचा नमस्कार,

माझें मागचें पत्र तुला पोहोंचलें असेलच. तें पत्र आणि हें यांत जमीन अस्मानाचें अंतर पडणार आहे. एकाक्षणीं स्वर्गात असणाऱ्या जीवाला देवदूतांनीं थेट एकदम पाताळांत ढकलून द्यावं अशी स्थिति झाली आहे माझी. कशा रीतीनें लिहूं हेंच कळत नाहीं मला. कोणत्या तरी खुनशी, मलीन दैवी शक्तीनेंच अशी वाताहत केली नसेल ना ?

सुधानें माझ्या मागणीला रुकार दिल्यावर दोन तीन दिवस मी दोन वीती जमिनीवरच चालत होतों. अभ्यास जोरानं चालूं होता. परिक्षेंत वर येऊन कुठेंतरी नौकरीची खटपट करावी, व सवडीनें लेखन-संशोधन करावें असा मीं बेत आंखला होता.

पण काल एकाएकीं अवेळीं सुधेनें माझी भेट घेतली. अस्ताव्यस्त केंस, लाल सुजलेले डोळे, आणि मळकें पातळ या वेषांत प्रथम मीं तिला ओळखलेंसुद्धां नाहीं. दुःखावेगानें फुटणाऱ्या हुंदक्यांतून प्रथम हा सारा प्रकार काय आहे हेंच मला कळेना व अजूनही त्याबद्दल बरेंच गूढ आहे. तिनं मला एवढेंच सांगितलें कीं, एकाएकीं तिच्या वडिलांचें पत्र आलें असून तिनें दिल्लींतल्या एका ऑफिसरशीं लग्न केलंच पाहिजे अशी निर्वाणीची आज्ञा केली आहे. मीं तिला कितीतरी प्रश्न केले. तिच्या वडिलांचें मन वळविण्यासाठीं मी त्यांची प्रत्यक्ष भेट घेतों म्हणून सुचविलें; परंतु त्याला तिनें मान्यता दिली नाहीं आणि या नकाराचा दोष स्वतःवरही घेण्याची तयारी दाखविली. तिच्यासारख्या चंचल आणि प्रेमाला अपात्र असलेल्या मुलीचा नाद सोडून, अधिक योग्य अशा मुलीशीं लग्न करून मी सुखी व्हावें असें सांगून डोळे पुशीत ती निघून गेली.

दुःखांतक नाटकाचा अभ्यास करतांना ग्रीक नाट्यांतली एक उपपत्ति मीं वाचली होती. **मनुष्य फार सुखांत असला कीं, देवांनाही त्याच्या सुखाचा हेवा वाटूं लागतो.** मानवी जीवित हें अपूर्ण आहे,

हा धडा त्याला शिकविण्यार्ठी ते कोणतेंतरी अनपेक्षित संकट त्याचेवर पाठवून देतात. मलाही आतां असेंच वाटूं लागलें आहे. मरून सुटेपर्यंत ' सुखी आहेस ' म्हणून कोणालाही म्हणूं नये.

स्वतः सुधानें मला उद्यां निक्षून सांगितलें कीं, तिचें माझ्यावर प्रेम नाहीं म्हणून; तरी तें मला खरें वाटणार नाहीं इतका मला तिच्या प्रेमाचा पडताळा आला आहे. तिच्याइतकी खोल मनाची, करारी स्त्री, एकदां आपलें हृदय अर्पण केल्यावर कारणांशिवाय वावडीसारखी फिरणारी नव्हे. या प्रकरणामागें कांहीं तरी मोठी भयंकर प्रभावी शक्ति आणि घटना असली पाहिजे अशी माझी खातरी झाली आहे. प्रश्न एवढाच कीं, तिचा थांग कसा काढवयाचा ?

खरें प्रेम विश्वासू असतें. कच्च्या दिलाच्या चंचळ प्रणयालाच असूयेचा आणि शंकेचा स्पर्श होतो. सुधाच्या प्रेमाबद्दल मी इतका निःशंक आहे कीं, माझ्यादेखत ती बोहल्यावर चढली तरी केवळ नाइलाजानें किंवा कोणत्या तरी पवित्र हेतूनें प्रेरित होऊन आत्मार्पण करण्यासाठींच ती हें पाऊल टाकीत आहे अशीच माझी खात्री होईल. मग तुझ्यासारखा सहानुभूतिशून्य टीकाकार याला अंध विश्वास म्हणो, किंवा प्रेमाचा पागलपणा म्हणो.

तुझा,

**अरविंद.**

## ४० निरवानिरव.

बडोदें.

ता.

( मूळ इंग्रजी )—

" it is better to have loved and lost, than not to have loved at all."

प्रिय वसंतराव यांस—

हंसाचा शेवटचा नमस्कार.

माझ्या वडिलांकडून तुमच्या वरीं एक रजिस्टर पत्र गेलें आणि तुम्हाला तातडीनें तारेनें बोलावणें येऊन इकडून जावें लागलें हें मला कळलें. हा सर्व प्रकार पाहून तुमची मनःस्थिति कशी झाली असेल याची मला कल्पना आहे. दुःखाबरोबर, निराशेबरोबर, बहुतेक तुम्हाला सडकून रागही आला असेल, आणि मला, माझ्या कुटुंबांतील सर्व मंडळींना तुम्ही शिव्याही दिल्या असतील. त्याबरोबरच माझी परिस्थितिही लक्षांत घेऊन नंतर काय तो निर्णय करावा अशी आपल्या हंसाची विनंति आहे.

प्रथम माझा दोष मी मोकळेपणानें कबूल करतें कीं, या साऱ्या बाबतींत मी तुम्हाला उत्तेजन द्यायला नको होतें. एक उत्कृष्ट खेळाडू म्हणून माझ्या भावातर्फे तुमचा परिचय झाला. परिचयाचें पर्यवसान मोकळ्या मैत्रींत झालें. पण इथेंच आपण दोघांनींही थांबावयाला हवें होतें. सध्यांच्या समाजस्थितीमुळें का होईना, ज्या आशा फलद्रूप होण्याचा फारसा संभव नाहीं त्या उगाच जागृत करण्यांत तरी काय लाभ ? माझ्या स्वतःच्या जातीच्या विद्यार्थ्यांमध्यें मिसळण्याच्या आड येणारी अडचण म्हणजे ते मैत्रीचा अर्थ प्रीति असाच करून निराळ्याच रीतीनें वागूं पहात. आपली परिस्थिति, समाजस्थिति अगदीं भिन्न असल्यानें असा गैरसमज न होतां दोन मित्रांप्रमाणें आपण मोकळेप्रमाणें वागूं अशी कल्पना करून मीं आपला सहवास वाढविला.

इकडील पुराचे वेळीं कोसळलेल्या घरांतून तुम्हीं मला वाचविलेंत, त्या प्रसंगापर्यंत या मनोमय मैत्रीला माझ्या बाजूनें तरी प्रेमभावनेचा संपर्कही झाला नव्हता. आतांपर्यंत मी अगदीं जपून वागत होतें, परंतु या प्रसंगानंतर तुमच्या वाढत्या प्रेमभावनेला उत्तेजन देण्यासारखी कृति माझ्याकडून झाली हें मी कबूल करतें. मी तुमची क्षमा मागतें ती यासाठींच. या प्रसंगांत माझा कांहीं भाग नसून तुम्ही उगीच माझ्या प्रांजल भावाचा भलता अर्थ करून, नसत्या आशांचे मनोरे बांधले असते, तर ते धडाधड कोसळतांना पाहून मला कांहींच वाटलें नसतें. पण तुमच्या प्रेमानें माझ्या मनावरचा ताबा सुटून माझ्याकडून तुम्हांला प्रतिशब्द दिला गेला, यामुळें आजच्या तुमच्या निराशेच्या परिस्थितीला मीच कारण आहे असेंच मला वाटतें.

येथील बागेंत तुम्ही मला सरळपणें मागणी घातलीत. 'सज्ञान' झाल्यावर, परीक्षेनंतर लग्न करून, स्वतंत्रपणें जगाच्या टीकेला तोंड देण्याची तयारी दर्शविलीत, त्यावेळीं मात्र माझ्या मनाचा गोंधळ उडाला आणि मी तुम्हाला कांहींच ठाम उत्तर देऊं शकलें नाहीं.

रानांत फिरतांना एखाद्यानें सहज एखादी जळती काडी कुठेंतरी कोंपऱ्यांत टाकावी, आणि पुढें पहावें तों तिनेंच भयंकर वणवा पसरून सारें रान पेटलेलें दिसावें अशी ही परिस्थिति होती. आपली मैत्री असेल, अल्लडपणामुळें, भावनावशपणामुळें, कांहीं काल प्रणयाच्या स्वप्नांतही आपण रंगून गेलों असूं—परंतु त्या साऱ्या गोष्टी इतक्या व्यावहारिकपणें घेऊन ही जन्माची गांठ बांधण्याचा तुम्हीं प्रयत्न केलांत तेव्हां माझी चित्तवृत्ति द्विधा झाली.

क्षमा करा—वसंतराव ! मी एक अगदीं सामान्य, अल्लड मुलगी आहे. ध्येयदृष्टीनें पहातां तुमचा निश्चय योग्य होता, परंतु त्यानंतर उत्पन्न होणाऱ्या परिस्थितीला तोंड देण्याइतकी माझी शक्ति नाहीं. तुम्ही मला चंचल म्हणाल. असेंच वर्तन माझ्या हातून होत आहे खरें. पुरुषांच्या जीवनाला जग मोकळें असतें, परंतु स्त्रियांच्या जीवनाला समाजाची चाकोरी मोडतां येत नाहीं. तुमच्या धैर्याबद्दल लोकांनीं तुमचें अभिनंदनही केलें असतें,

कित्येकांना तुमचा हेवाही वाटला असता, परंतु माझी स्थिति मात्र केविलवाणी झाली असती. महाराष्ट्रीय स्त्रियांना मी परकी वाटलें असतें, आणि गुजराती स्त्रियांनीं मला एखाद्या बाटग्या स्त्रीप्रमाणें तिरस्कारानें दोन हातांवर दूर ठेवलें असतें. स्त्रियांच्या कुत्सित टीकांचे वाग्बाण किती विषारी आणि भेदक असतात याची तुम्हां पुरुषांना कल्पनाही येणार नाहीं.

शेवटीं मनाचा गोंधळ उडाल्यानें मी माझ्या वडिलांचा सल्ला घेतला पण सुरुंगबत्तीला काडी लागण्यासारखाच हा प्रकार झाला. त्यांच्याकडून तुमच्या वडिलांकडे धमकीचे पत्र गेलें आणि आमच्या समाजांत एकच खळबळ उडून गेली. दुसऱ्या दिवशीं आमच्या ज्ञातीच्या महाजनांनीं एक सभा भरवून माझ्या वडिलांना आरोपी म्हणून जाब विचारला. दंड आणि माफीवर आम्हाला सुटका करून घ्यावी लागली. आमच्या समाजांत न्यात-निर्बंधाची शक्ति किती आहे याची तुम्हांला कल्पना नाहीं. निर्बंध मोडल्यास मलाच नव्हे, माझ्या सर्व कुटुंबाला वंशपरंपरा बहिष्कृत होऊन पडावें लागलें असतें. तुमच्या वडिलांच्या आलेल्या उत्तरावरून त्यांनाही हा प्रकार संमत नव्हता, आणि त्या योगानें तुमच्या समाजांतही अशीच खळबळ उडून त्याचे परिणाम तुम्हालाही भोगावे लागले असते, असें मला स्पष्ट दिसतें.

दोन समाजपुरुषांचे हे क्रोधाचे हुंकार ऐकून मी अगदीं भांबावून, घाबरून गेलें आहे. खुल्या दिलाच्या मैत्रीनें सुरू झालेला, वाढलेला हा आपला संबंध अशा रीतीनें एकाएकीं तोडून टाकतांना मला कांहींच का वाटत नसेल ? तुमच्याइतकेंच, किंवा त्याच्या अनेकपट दुःख मलाही होत आहे. तुम्हाला तें बोलून दाखवून हलकें तरी करतां येईल, पण आमच्या अशा कांटेकोर समाजांत तें बोलून दाखविण्याची देखील मला चोरी आहे. पण जाऊं द्या. पुन्हां मागल्या गोष्टी आठविण्यांत काय अर्थ आहे ? हे विचार करूं लागलें तर वेडच लागायचें.

साऱ्या दुःखांवर ‘ काल ’ हेंच औषध आहे. एकमेकांना विसरणें ही

गोष्ट अशक्य असली तरी तसा प्रयत्न आतां आपल्याला करायला हवा. माझ्यापेक्षां हजारपट सुस्वरूप, सुशिक्षित अशा मुली तुम्हाला तुमच्या समाजांत सहज लाभतील. माझ्यासारख्या अपात्र मुलीबद्दल तळमळत न राहतां, अशा एखाद्या सुपात्र मुलीचा स्वीकार करून सुखी व्हा, एवढेंच माझें हात जोडून मागणें आहे.

समाजबंधनांच्या परिस्थितीमुळें तुम्हांला अंतरलेली

तुमची,

हंसा.

# ४१ तापलेली कांच.

इरभट रोड,
सांगली.

मित्रवर्य अरविंद यास,

नारायणाचा नमस्कार, वि. वि.

जीत्ते रहो पट्ठे ! शेवटीं अस्मादिकाचंच म्हणणं खरं ठरलं. आतां वसंत-हंसा प्रकरणाची इतिश्री लिहिण्यास मला समाधान वाटत आहे. आमचे आडाखे कधीं चुकायचे नाहींत.

मागच्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें पंतांनीं तार पाठविल्यावर खऱ्या परिस्थितीची कांहीं कल्पनाच नसल्यानें वसंत धांतवच आला. त्याची कल्पना कीं वडील किंवा आई फार आजारी असावींत. मांजर डोळे मिटून दूध पितं, अन् त्याला वाटतं जगाचेही डोळे असेच मिटले असावेत ! प्रथम अगदीं ताकाला तूर लागूं देईना. मग पंतांनीं तें रजिष्टर पत्र त्याच्यापुढें टाकल्यावर मात्र त्याचे डोळे खाडकन् उघडले.

तरी पण बाजू सावरून घेऊन बरंच आकांड तांडव केलं त्यानें. मारे व्यक्तिस्वातंत्र्य, अनिर्बंध प्रेम, पोटजातींचं एकीकरण, एकराष्ट्रीय भावना एक ना दोन–हजार गोष्टी सुनविल्या त्यानें वडिलांना–पण त्याला न विचारतांच त्याच्या वडिलांनींच परभारें त्या नोटीशीचं उत्तर लिहून टाकून आपल्या मुलाच्या वतीनें बडोद्याशीं सर्व संबंध तोडून टाकण्याचेंच कबूल केलें आणि परीक्षा गमावली तरी बेहेत्तर पण बडोद्याला पाठवणार नाहीं, म्हणून वसंताला इथेंच डांबून टाकला आहे. त्यांतही त्यानें आणखी टुरटूर केली असती, पण जिच्या आधारावर त्यानें कल्पनांचे किल्ले प्रत्यक्ष वडीलांशीं झुंजविले, तो आधारच काल कोसळला. काल आम्ही खूप लांब, हरीपूरच्याही पलीकडे फिरायला गेलों होतों. त्यावेळीं त्यानें सांगितलें कीं, शेवटीं हंसानेंही त्याला एक पत्र पाठविलें असून तें कालच त्याला मिळालें. बडोद्याला तिच्या जमातीची जाहीर सभा भरून तिचा आणि तिच्या कुटुंबाचा निषेध करण्यांत आला, आणि बहिष्कृत करण्याची धमकीही देण्यांत आली. शेवटीं हंसा आणि तिचे वडील यांच्या

सहीनें या बाबतींत काहींही भाग न घेण्याची शरणचिठ्ठी लिहून घेऊन दंड घेऊन जातगंगेनें त्यांच्यावरचा बहिष्काराचा ठराव मागें घेतला. ही सारी हकीकत लिहून शेवटीं अशा परिस्थितमुळें मला तुमच्याचीं लग्न करतां येत नाहीं अशी तिनें हळूंच पुस्ती जोडली होती.

अशा रीतीनें वसंताचा ऐनवेळीं तेजोभंग झाल्यानें कर्णाप्रमाणें त्याचा 'मनोरथही' निराशेच्या चिखलांत रुतून बसला आहे. तें सारें ऐकून मी त्याला खूप धीर दिला अन् सांगितलं अरे भितोस काय! '**वसंत सलामत, तो मुलीं पचास**!' हंसा गेली तर तिच्या वरचढ सारिका आणून देऊं एखादी. सांगलीचे भद्रेश्वर दीक्षित नामशेष झाले नाहींत अजून!"

जाउंदे, म्हटलंच आहे ना कीं तापलेली कांच हळूं हळूंच थंड होऊं दिली पाहिजे. हे ज्वलज्जहाल राजेश्री थोड्या वेळांतच थंड होऊन आमच्या सारख्या सनातनी मनुष्याच्या रांगेला येऊन बसतील, हेंही भविष्य मी आतांच करून ठेवतों.

तुझा,

**नारायण.**

## ४२ बॅरिस्टरांचा सल्ला.

लॅबर्नम् रोड, मुंबई.
ता.

सुरेश यास—सुनंदाचा नमस्कार.

हो, बसतेंच आतां तुला पत्र लिहायला. तुझीं साधीं पत्रें, एअरमेलच्या निळ्या छापाचीं पत्रें, केबलग्राम, यांनीं माझ्या टेबलाचा सारा खण भरून गेला आहे; तरी बरं, बुकपोस्टनें, पार्सलनें पत्राचे गठ्ठे पाठवले नाहींस म्हणून! तिकडे लंडनला राहून, गोऱ्या चटक चांदण्यामध्यें खेळून माझी कसली आठवण होतेय तुला? कांहींतरी लिहितोस झालं. मला म्हणशील तर राग नाहीं न् लोभ नाहीं. आपली मी, माझा अभ्यास अन् माझं बॅडमिंटन्. बी. ए. झाल्यावर पुण्याकडे कुठं म्हणे जन्मभर अविवाहित राहून देशकार्य काढण्याची संस्था काढली आहे तिथल्या बायकांनीं, तीच जॉईन करीन म्हणतें.

अन् तुझ्या या साऱ्या प्रेमपत्रांनीं पाघळून तुला हें पत्र लिहायला बसलें आहे असं समजूं नकोस कांहीं. या पत्राचं कारण कांहीं निराळंच आहे. माझ्या मैत्रिणी सुधा अन् हंसा यांची माहिती इथून जाण्याआधीपासूनच तुला आहे. सुधा गेली आहे या वर्षी पुण्याला अन् हंसा बडोद्याला. सुधाचं म्हणे कोणा अरविंद नांवाच्या विद्यार्थ्यावर प्रेम बसलं आहे (मूर्खांचा बाजार आहे झालं. कशाला आधीं प्रेम करावं अन् मग बसावं विव्हळत! माझ्या सारखी पाहिजे होती—पण जाऊं दे) तिच्यासाठीं त्या पोरानेंही बापाशीं भांडून सांगून आलेली दुसरी मुलगी नाकारली अन् जवळ जवळ घराबाहेर पडला. पण नकटी नसूनही सुधाच्या लग्नांत हजार विघ्नं येऊं पहाताहेत. तिचे वडील दिल्लीला इम्पीरिअल सेक्रेटेरीएटमध्यें आहेत. हे मागें फार आजारी होते. ती शुश्रूषेला गेली होती तेव्हां कुठं अशोक घरफोडे नांवाच्या एका आय्. सी. एस्. फेल गृहस्थाच्या, त्यांच्या खात्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्याच्या नजरेंत ती भरली म्हण, कीं वडिलांचा वीस हजारांचा पैसा त्याच्या डोळ्यांवर आला म्हण. (तुम्ही पुरुष असेच स्वार्थी असायचे) त्यानं

तिला मागणी घातली आणि तिनं ती नाकारली. आतां तिच्या वडिलांचं पत्र आलं आहे कीं, त्यांच्या खात्यांतले अत्यंत महत्त्वाचे सरकारी नकाशे आणि दस्त ऐवज गहाळ झाले आहेत. जर सुधा अशोकशीं लग्न करील तरच ती गोष्ट दडपली जाणार, नाहींतर तिच्या बापाचे हातांत कडीतोडे. माझी खात्री आहे कीं, तिला आणि तिच्या बापाला वठणीस आणण्यासाठीं अशोकनेंच ते दस्तऐवज पळविले असले पाहिजेत. पण तो पेंच सोडवावयाचा कसा ? तसा पुरावा मिळणं शक्य नाहीं. कोणा वरिष्ठाकडे तक्रार केली तर ते दस्तऐवज गेले एवढं तरी सांगावं लागणार अन् त्यानें ते नाहींसे केले कीं, शेवटीं, तिच्या वडिलांची बेअब्रू टळत नाहीं. याला उपाय म्हणजे कसा तरी काट्यानेंच कांटा काढून म्हण किंवा हरतऱ्हेनं त्या अशोकचंच नाक दाबून त्याला ते दस्तऐवज ओकायला लाविलं पाहिजेत. म्हणूनच तुला हें पत्र लिहितें आहे मी नाहींतर मी होऊन लिहिणार नव्हतेंच तुला ध्यानांत ठेव.

विलायतेंत असतांना तुम्ही पुरुष काय चाळे करतां, अन् काय काय गुण उधळतां याची बातमी थोडथोडी माझे कानावर आली आहे. ( अन् म्हणूनच तुलाही ओळखून मी दूर रहाणार आहे ) पुन्हां तुम्हां साऱ्यांचा ( फ्री मेसनरी सारखा ) एक कट आहे म्हणे. हिंदुस्तानांत परत गेल्यावर साऱ्यांनीं अगदीं जिभेला कुलूप घालून, तेरी बी चूप मेरी बी चूप म्हणून वागायचं अन् कोणी कोणाचीं बिंग बाहेर काढायचीं नाहींत.

सुधेच्या पत्रावरून अशोक हे बरेच बेलगामी, विलासी, अन् स्वच्छंदी गृहस्थ दिसतात. अर्थात् त्यांनीं तिकडच्या मीना बाजारांत चांगलेच गुण उधळले असले पाहिजेत. तेव्हां मी तुला पत्राबित्र लिहावेंच अशी तुझी इच्छा असलीच तर या अशोकचा परभारे बंदोबस्त होऊन, त्यानें माझ्या सुधेचा नाद आपणहून सोडावा अशी तिकडची संपूर्ण बित्तंबातमी लागलीच एअर मेलनें धाडून दे.

तूं आतां उन्हाळ्यानंतर येथें येणार आहेस म्हणे. येतांना एखादी मडम बरोबर आणली नाहींस म्हणजे पुरे.

( बाकी मला काय करायचं आहे तुझ्या भानगडीशी, कुणी कां येईना ) पण इकडे सुधेनें डोळे मुठीसारखे करून घेतले आहेत. तुझं उत्तर वेळेवर

न आलं व कांहीं उपाय न सुचविलास तर मुकाट्यानें वडिलांच्या अब्रूसाठीं तिला अशोकशीं लग्न करावं लागेल अन् तसं झालं तर तूंच काय, कुणाही पुरुषांशीं जन्मांत बोलणार नाहीं मी. ' झनाना मिशन ' मध्यें काम करायला निघून जाईन बंगालमध्यें. म्हणून सांगतें कांहीं तरी युक्ति काढून या फेल–आय्. सी. एस्. साहेबांचा परभारेंच बंदोबस्त झाला पाहिजे. बॅरीस्टर होणार आहेस तूं—पहातें मग आतांपर्यंत खरोखर कांहीं दिवे लावलेस, कीं नुसते कांहीं बॅरिस्टरींचे खाने खात, हुंदडत फिरलास ' हाईड पार्क ' मध्यें.

तुझी,

( अडलं आहे तुझी लिहायला, लिहितें नुसतीच )

सुनंदा.

# ४३ घटका भरली ?

चांदणी चौक
दिल्ली.

चिरंजीविनी सुधेस अ. आशीर्वाद.

घटका भरत चालली आहे. मुहूर्त लागल्यावर अगदीं पहिलीच वेळ धरण्यास अशोक रावांनीं सांगितलें आहे. तुझे पेपर आटोपल्याबरोबर येथें निघून ये. तुझी आई वारली त्यानंतर तिनें हौसेनें केलेले दागिने, घरांतील सर्व सोनें व चीजवस्त मुंबईस सेंट्रल बँकेच्या सेफ डिपॉझिटमध्यें ठेवून मी इकडे निघून आल्यास अनेक वर्षं झालीं. कधीं तो कप्पा उघडण्याचेंही कारण पडलें नाहीं; तुझ्या नांवाचें अधिकारपत्र, सांकेतिक खुणेचा शब्द, आणि खणाची किल्ली या पत्रासोबत पाठवीत आहे. दिल्लीस येतांना मुंबईला उतरून हे जिन्नस बरोबर घेऊन ये.

तूं अशोकशीं लग्न करण्यास संमति दिलीस हें पाहून मला काय वाटलें तें सांगतां येत नाहीं. अशोक कसा आहे, त्याचीं काय काय व्यसनें आहेत, किती कुलंगडीं आहेत याची माहिती आतांशीं मला थोडथोडी होत चालली आहे. पण काय उपयोग ? अशा माणसाच्या ताब्यांत मी तुला देणार हें ऐकून, माझा धिःकार करून तूं हें लग्न करण्यास नाकबूल होशील अशीच माझी कल्पना होती. त्यानंतर होईल तो परिणाम भोगण्यास मी तयार होतोंच, परंतु घराण्याच्या अब्रूकरतां तूं या परिस्थितीचाही स्वीकार करण्याची तयारी दाखविलीस हें पाहून मला मेल्याहूनही मेलं झालं आहे.

बाकी मीं माझं समाधान करून घेतों कीं, तूं गुणी, सुस्वभावी आहेस, अशोकसारख्याचीही गृहिणी झाल्यावर तूं त्याला ताळ्यावर आणू शकशील. तो कसाही असला तरी तुझे प्रयत्न अगदीं निष्फळ ठरण्याइतकी माणुसकीही त्यानें सोडली असेल असें मला वाटत नाहीं. जन्मभर नोकरी करून सांठविलेली सारी वीस हजारांची रक्कम हुंडा म्हणून अशोकरावांना अर्पण अरून तुला प्रेमानें वागविण्याची पदर पसरून विनंती करीन.

तुम्हां सुशिक्षित मुलींचे गुणदोष मी जाणून आहे. माझ्या आतांपर्यंतच्या अवलोकनांवरून मला वाटतें कीं, तुमच्यासारख्या मुलींच्या

संसाराच्या दोन परी होतात. लग्नाआधींच, कोणत्याही परिस्थितीनें कां होईना तुमच्या हृदयाचा कोणी ठाव घेतला असला, त्याच्या प्रेमाची मोहिनी पडली असली, आणि दुर्दैवानें शेवटीं कोणा दुसऱ्या परक्याशींच लग्न जुळून आलें तरच हा संसार वाळवंटासारखा भकास होतो. परंतु ही साधारणपणें अपवादात्मक परिस्थिती नसल्यास मात्र, संस्कारानें झालेल्या कोणच्याही पतीच्या संसाराचें नंदनवन करण्याची शक्ति तुमच्या अंगांत आहे. इतकेंच नव्हे तर, अशिक्षित मुलींपेक्षांही जास्त कार्यक्षम आणि नमुनेदार संसार तुम्ही करून दाखवाल. तुमच्या संसारातलें धोक्याचें स्थान एकच, आणि तें म्हणजे लग्नाआधींची तुमची मनःस्थिती. त्यांतूनही दैवयोगानें अशी चुकामुकीची वेळ आली तरीही उदासपणानें कां होईना आपल्या संस्कृतीला आणि शीलाला साजेल असें पत्निपदाचें कर्तव्य पार पाडणाऱ्या अनेक सुशिक्षित स्त्रिया मी पाहिल्या आहेत. म्हणूनच मला बरं वाटतं तें एवढ्यावरूनच कीं, अशोक कसाही असला तरीही तुझं मन इतर कोणावर जाण्याआधींच हें लग्न जमून येत आहे. माझी इच्छा एवढीच कीं, आतां पदरीं पडलेल्या पतीदेवाला सुधारून संसाराच्या सरळ रस्त्यावर आणण्याकडे आपल्या शिक्षणाचा तूं उपयोग करावास.

आणि वाईटही वाटतं तं यामुळें कीं, तुझ्या पसंतीप्रमाणें आधीं तुझा विचार घेऊन मी तुझें लग्न ठरवूं शकलों नाहीं. तुझी आई वारली तेव्हां तिनें माझ्याकडून वचन घेतलें होतें कीं, तुला संपूर्ण शिक्षण देऊन तुझ्या पसंती-प्रमाणें लग्न पार पाडीन म्हणून. फिरत्या नोकरीच्यापायीं मला सारा उत्तर हिंदुस्तान पालथा घालावा लागला, म्हणून आपल्या महाराष्ट्रीय वाता-वरणांत पुण्यामुंबईकडे मी तुला मुद्दाम ठेवलें, आणि आतां देवाच्या दयेनें तुझं शिक्षणही आटोपलं आहे. अलिकडच्या पद्धतीप्रमाणें तूंच आपलं लग्न ठरवावंस, आणि तुम्ही दोघांनीं येऊन या म्हाताऱ्याचा आशिर्वाद घ्यावा एवढीच माझी इच्छा होती. मग निष्काळजी होऊन परमार्थ-साधनांत उरलेले दिवस घालविणार होतों; पण आतां परिस्थितीनें तें अशक्यप्राय केलें आहे. हें लग्न झाल्यावरही तुझ्या संसाराची चिंता माझं काळीज जाळीत राहील. तुझा अपराधी पिता.

गजानन साने

# ४४ त्रिदंडी संन्यास !!

हरभट रोड, सांगली.
ता.

मित्रवर्य अरविंद यास—

तुला शक्यही वाटणार नाहीं अशा गोष्टी इकडे अगदीं तडकाफडकीनें होत चालल्या आहेत. आपल्या वसंताच्या प्रकारामुळें इकडे किती खळबळ उडाली, आणि शेवटीं त्याच्या वडिलांनीं तारेनें त्यास बोलावून त्याची कशी काय पाद्यपूजा केली हें सारें मी तुला मागील पत्रांत लिहिलें होतेंच. त्यानंतर कांहीं दिवस त्यानें अगदीं हट्टाग्रह करून शेंडी जानवें तोडून संन्यासी होण्याचाही धाक घातला होता. परंतु नंतर काय कळ फिरली कोण जाणे, त्याचा हा होऊं घातलेला संन्यास अर्जुनाच्या त्रिदंडी संन्यासाप्रमाणेंच झाला, आणि शेवटीं वडिलांनीं त्याला न जुमानतां या मार्गशीर्षांतलाच मुहूर्त साधून, तूं नाकारलेल्या सरला भिडेबरोबरच त्याचें लग्न कालच मोठ्या थाटानें साजरें केलें. कृष्णाकांठच्या मळींतलीं मसालेदार वांगीं, चमचमीत मठ्ठा आणि केशरी जिलबी यांचे ढेंकर देत मी तुला हें पत्र लिहीत बसलों आहें.

तुझ्या वडिलांनीं मागें तुझ्या व सुधाच्या लग्नाबद्दल रुकार दिला नाहीं व पत्रही पाठविलें नाहीं, म्हणून तूंही सध्यां त्यांना न लिहिण्याचा निश्चय केला आहे हें कळलें—छान, अगदीं सुपुत्राला साजेसेंच वर्तन आहे तुझें दुसरें काय म्हणायचें. मागील सर्व पत्रांत मी तुझ्या सुधाबद्दल सारखा इशारा देत होतोंच तो तुला वाचायला अगदीं कडू लागला असेल; पण शेवटीं अस्मादिकांची कृष्णाकांठची व्यवहारबुद्धि खरी ठरली म्हणायची ! तुझ्या गेल्या पत्रांत तूं अगदीं करुण रसाचा वर्षाव केला आहेस. एकदां वचन देऊनही वडिलांच्या आज्ञेमुळें सुधाला तुझ्याशीं लग्न करतां येत नाहीं, आणि कांहीं परिस्थितीमुळें दिल्लीच्या एका बड्या ऑफिसरशीं लग्न करणें तिला भाग आहे असेंही लिहिलेंस.

भले पठ्ठे ! अरे, पुण्याला जाऊन सांगलीची सारी अक्कल गमावून

बसलास काय ? ती पोरगी तुला नाकारते, एकाद्या बड्या ऑफिसरचें स्थळ मिळाल्याबरोबर तुला कांहीं सबब सांगते, तरीही तुला सारें तिचें नाटक खरें वाटतें ना ! स्त्रियांचें अशिक्षित पटुत्व कालिदासानेंही कबूल केलें आहे, मग या सुशिक्षित पटुत्वाबद्दल बोलावयालाच नको. बापाच्या सांगण्यावरून लग्न मोडण्याचीं कथानकें, नाटकांत आणि खंडकाव्यांत शोभतात; व्यवहारांत नव्हे. आतां कडेवर घेऊन बळेंच बोहोल्यावर उभी करायला तीही कांहीं परकरी पोर नाहीं समजलास ! चांगली घोडनवरी असेल. मग असेल इतकें प्रेम, तर खुशाल हातांत हात घालून रजिस्टर लग्न कां करीत नाहींस ती अन् तूं ? कां इतका सुधारक होऊनही तिच्या हुंड्याची तुला आशा आहे ? सोंग आहेत तीं सारीं, बाबा ! ‘ सहज कशी खेळविते ललना ’ हेंच खरें.

तिचा खेळ झाला, पण डाव तुझ्यावर आला. तूं नाकारलेली सरलाच आतां लफ्फेदार नथ घालून, ठसठशीत चिरी लावून, सरलाकाकू म्हणून इथें घाटावर मिरवणार, आणि तुझी ‘ सुधा ’ ओठाला लागण्याआधींच हातांतून निसटून, दिल्लीची राणी होणार—नशीब तुझें.

आपली मानस सरोवरांतली व सुरसागरांतली हंसी सोडून वसंतानें ही सरला इतक्या सरळपणें कशी स्वीकारली याचं नवलच वाटेल तुला. त्यांतून तूं नाकारलेली मुलगी ती—म्हणजे तुझ्या मतें अनेक वैगुण्याचें आगर असणार. पण बाबा, मनाची गति एखाद्या लंबकाप्रमाणें असते. एकीकडे जोरानें जावून, थप्पड खावून मागें फिरली, तर तितक्याच जोरानें ती उलट दिशेकडे हेलावते. हंसानें आपल्याला नाकारलें म्हणून निराश झालेले आमचे प्रणयवीर वसंतराव, आतां वडिलांच्या हातचें बाहुलें बनले आहेत. दाशरथी रामाच्या ऐटीनें हे पितृभक्तिपरायण चिरंजीव, लांब चेहरा करून, बोहोल्यावर जाऊन उभे राहिले. त्यांच्या साऱ्या सौंदर्याच्या चोखंदळ कल्पना, सहवासोत्तर विवाह, बौद्धिक कलात्मक सहकार, स्फूर्ति,स्त्री—पुरुषांच्या जीवनांतील ध्येय, वगैरे साऱ्या गोष्टी चट् साऱ्या विसरल्या गेल्या आहेत. रंभा आणून उभी केली तरी तिला नकटी म्हणून नाक मुरडणारे हे कॉलेजमधले सौंदर्याचे टीकाकार, शेवटीं व्यावहारिक आयुष्यांत कशा तऱ्हेच्या मुलीबरोबर लग्न करतात, आणि

त्यानंतर आपलें समर्थन करण्यासाटीं कोणत्या कोणत्या अर्धवट विधानांची लंगडी खेळतात हें पहाणें फार मौजेचें आहे. ठीक आहे. रुळतील हळूंहळूं. आमच्या आर्य लग्नसंस्थेचा असा गूणच आहे कीं, एकदां सात पाउलें टाकून, त्या जादूच्या कुंकुमाक्षता डोक्यावर पडल्या कीं, अगदीं अनोळखी, उपेक्षित मुलगीही कांहीं दिवसांनीं आपोआप पदरीं पडून, पवित्र होऊन, प्रेमभाजन होऊन बसते. शेवटीं विवाहपूर्व प्रेमाचे हे शाब्दिक शिलेदार, दीडदोन वर्षांनीं पहावें तर घरीं पाळण्याची दोरी हालवीत बसलेले दिसतात ! ! !

जाने दे दोस्त ! एका तऱ्हेनें झालें हें ठीकच झालें. आतां तरी तूं मला परवानगी दिलीस तर तुझ्या वडिलांची मी भेट घेतों. तूं सुधेला सोडलंस, कां तिनें तुला चलाखीनें चकवलें हा प्रश्न आतां पुरे. तूं स्वतंत्रपणें तिच्याशीं लग्न करीत नाहींस हें ऐकूनच तुझ्या वडिलांना आपला मान राहिला म्हणून वाटेल; तेव्हां आतां सारें ‘ आलबेल ’ असल्याचें पत्र आधीं पाठीव, हो, नाहींतर ‘ गड सासवडयोमध्ये ’ अशी माझी स्थिती व्हायची. त्यानंतर मी पंतांची भेट घेऊन त्यांची समजूत घालतों. तसा म्हातारा कोपिष्ट असला तरी हृदयानें प्रेमळ आहे, तेव्हां त्यांच्याबद्दलची फारशी काळजी करूं नकोस. परीक्षा आतां अगदीं जवळ आली आहे. माझ्यासारख्या शंखानें तुला अभ्यासाबद्दल सांगणें योग्य नाहीं तरी सांगतों. तुझ्या सुधेचे विचार आतां पार काढून टाकून अगदीं ‘ चक्कूताड्या ’ लाव आणि फर्स्टक्लासमध्यें ये. तोंवर पंत इकडे वधूसंशोधन करीत आहेतच. मग उन्हाळ्याच्या सुट्टींत कृष्णाकांठींच होऊन जाऊं दे शुभमंगल. आपली साऱ्या मित्रांची फौज घेऊन, सांगली स्टेशनाच्या पायऱ्यांवरच तुला दुतर्फा ‘ गार्ड ऑफ ऑनर ’ देऊं आम्ही—भितोस काय !

तुझा,

नारायण.

## ४९ विलायतेहून !

इनर टेंपल चेम्बर्स, लंडन.

ता०

प्रिय सुनंदेस---

इतक्या दिवसांनंतर अगदीं एकाएकीं आलेलें तुझें पत्र वाचून मला इतका आनंद झाला कीं, त्यावेळीं दार उघडून आंत आलेल्या माझ्या म्हाताऱ्या लँडलेडीचा हात धरून मी खोलीभर नाचलों. 'नाऊ देन यंग मॅन, बी क्वाएट्' म्हणून ती मला दटावीत होतीच. तिला वाटलं कीं, मी खूपशी शॅम्पेन झोंकूनच आलों असेन. शेवटीं दमून खालीं बसून मी तिला तुझें पत्र आल्याचें सांगितलें. माझ्या टेबलावरचा तुझा फोटो पाहून ती मला सारखी तुझ्याबद्दल विचारीत असतेच. कारण आम्हां साऱ्या तरुणांच्या अडचणी, प्रेमकहाण्या, तक्रारी, तिच्याकडेच ठेव म्हणून जातात. 'ग्रॅनी' म्हणतों आम्ही तिला. उत्तेजन, सांत्वन, निर्भर्त्सना हे सारे प्रकार तीच करते.

मला वाटतं आम्ही तरुणांनीं कितीही स्वच्छंदीपणा दाखविला, तरी आपल्याला कोणीतरी वडीलधारें मनुष्य असावें अशी इच्छा साऱ्यांच्या मनांत असतेच. परदेशांत तर अशा व्यक्तींची वाण फारच तीव्रतेनें भासूं लागते. म्हणून आम्ही साऱ्या विद्यार्थ्यांनीं आमच्या म्हाताऱ्या लँडलेडीलाच "आजीबाई" बनवून टाकलं आहे !

तुझ्या पत्रांतला सारा मजकूर कळला. तुला माझी आठवण बिलकूल होत नाहीं---माझीं सारीं पत्रं तूं उगीच टेबलाच्या खणांत रद्दी म्हणून जपून ठेवलीं आहेस. बी. ए. झाल्यावर जन्मभर अविवाहित राहून पुण्याच्या महिला-समाजाची आजीव-सेविका म्हणून तूं जाणार, आणि त्याच वेळीं बंगालमधील झनाना मिशनमध्येंही जाणार, या साऱ्या बातम्या समजल्या. तुझी मैत्रिण सुधा हिच्यावर, तिनें केलेल्या प्रेमाबद्दल तूं खूप आग पाखडली आहेसच, ज्या अर्थीं प्रत्येक ओळीमध्यें माझ्यावरच काय पण कोणावरही तुझें बिलकुल प्रेम नाहीं असें पुन्हां पुन्हां लिहि-

तेस त्या अर्थी अशी टीका करण्याचा अधिकार तुला पोहोंचतो याबद्दल वादच नाहीं.

उन्हाळ्यानंतर परीक्षा आटोपून मी हिंदुस्थानांत येणार आहे. अगदीं एकटाच येणार आहे. पुण्याला अगर बंगालमध्यें जेथें असशील तेथें येऊन तुझी गांठ घेणार आहे; आणि याचना, विनंती म्हणून नव्हे, तर हक्क म्हणून, तूं आणि तुझें प्रेम या दोघांचाही ताबा घेणार आहे. ही अट कबूल असली तरच या पत्राबरोबर पाठविलेल्या अशोक बद्दलच्या-मजकुराचा उपयोग तुला करतां येईल. तो उपयोग तसा झाला म्हणजे जें समजायचें तें मी समजेनच.

विलायतेंतील वर्तनाबद्दल हिंदुस्थानांत परत आलेल्यांचा फ्री मेसनरी सारखा एक कट असतो ही तुझी कल्पना सर्वस्वीं बरोबर नसली तरी सर्वस्वी चूक आहे असें मात्र मी म्हणणार नाहीं. ( बॅरिस्टर सारखंच लिहितों आतां ) सारेच हिंदी विद्यार्थी इकडे अशोकसारखे गुण उधळतात असें मी म्हणत नाहीं, परंतु यौवन, धन, स्वातंत्र्य, आणि अविवेक या सर्वांचाच संगम येथें होत असल्यानें अनेकांच्या हातून येथें बरेंच बेछूट वर्तन होतें हें खरें; जाऊं दे. अर्धें लंडन पायाखालीं घालून मी गोळा केलेली माहिती या पत्राबरोबर पाठविली आहेच. तिकडे आल्यावर या कामागिरीचें योग्य बक्षीस मात्र तुझ्याकडून मिळालें पाहिजे. हिंदुस्थानांत परत येण्यापूर्वी युरोपांत फिरून येण्याचा माझा बेत होता, पण तो रद्द करून परीक्षा आटोपल्याबरोबर आधीं तुला भेटायला येणार आहे. न जाणों, उशीर लागला तर कदाचित रेडक्रॉसची नर्स म्हणून ब्रह्मदेशांतही निघून जायचीस तूं—काय नेम सांगावा !

सर्वस्वीं तुझाच,

सुरेश.

# ४६ सुकलेलें फूल.

जुनी सांगली,
ता.

मित्रवर्य अरविंद यास,
वसंताचा नमस्कार.

बडोद्याला असतांना किती उत्साहानें तुला मी लांबलचक पत्रें पाठवीत असे ! आतां इकडे येऊन पडल्यावर, बदललेल्या परिस्थितींत हें पत्र लिहितांना मला त्या सर्व पत्रांची आठवण होते. प्रेमाचे तारे मोजतांना, खालीं पायाकडे न पाहिल्यानें सत्यसृष्टीची ठेंच लागून मी चांगलाच जायबंदी झालों आहे. त्यांत आमच्या वडिलांनीं आपल्या मताप्रमाणें काहीं मलमपट्टी केली आहे, त्यानें या घावाचे परिणाम कमी होतात कीं वाढतात हें पहावयाचें आहे. तूं आणि मी; दोघेंही प्रेमाच्या वाटेचे मुशाफीर; म्हणून पत्रांतून एकमेकांशीं बोलत असूं. दोघांच्याही प्रेमाची आतां मात्र इतिश्री झाली हें दिसत आहेच. तुझ्या सुधाबद्दल तुला एक अनुभव आला, आणि हंसाबद्दल मला दुसरा. तिच्याबद्दलची माझी निवड चुकली असंच मला वाटायला लागलं आहे. आपला नारायण सारखा ओरडत असतो, त्यांपैकीं सारंच नसलं, तरी थोडं तरी या परिस्थितींत मला पटूं लागलं आहे. ‘ प्रथमदर्शनी प्रेम हेंच खरं प्रेम,’ या कल्पनेच्या मृगजळामागं लागून आपण उगीच्च प्राण टाकीत आहोंत. आपली आर्यसंस्कृति म्हणजे लग्नानंतरच्या प्रेमाची. पाश्चात्यांत प्रेम हा विकार समजला असला, तर आपल्यांत तो धर्म आहे. समान कुल, शील, आचरण या योगानें परस्परांना अनुकूल असलेल्या वधूवरांचा अग्निनारायणाच्या साक्षीनें विवाह झाल्यावर त्यांनीं परस्परांना दिलेल्या वचनाप्रमाणें एकनिष्ठ प्रेम ठेवून संसार करावा हें आपलें ध्येय आहे.

······या सर्व विचारांनीं मनाची समजूत करण्याचा मी यत्न करतों, परंतु ‘ सुकलें फूल न देत वास जरी अश्रूंनीं भिजलें ’ असें मला झालें आहे. आतां हंसाचा अगदीं विचारच करायचा नाहीं, म्हणून मनाला तीन तीनदां बजावूनही तिचे विचार मनांत येतातच. बाबांच्या आग्रहा-

खातर मी लग्नही केलें; हें नारायणाच्या पत्रावरून तुला कळलें असेल, आणि त्याबद्दल तुला आश्चर्य वाटून राग आला असेल, व तिरस्कारही वाटला असेल. मी केलं हें बरं कां वाईट हें माझें मलाच कळत नाहीं, व हें सारं इतक्या तडका फडकीं घडून आलें याबद्दल माझें मलाच आश्चर्य वाटतें. चेंडू कितीही जोरानें जमिनीवर आपटला, तरीही तो तितक्याच जोरानें वर उफळतो. तशा उफळीनेंच मी कुठें तरी लग्नाच्या जाळयांत जाऊन पडलों आहे. साऱ्या आयुष्यांतून कांहींतरी महत्त्वाचा भाग कापून काढल्यागत वाटत आहे मला. आयत्या वेळीं कच खाऊन हंसानें दाखविलेल्या बेइमानीनें माझें हृदय अगदीं सुन्न होऊन गेलें आहे. त्या बधीरतेमुळें मी अगदीं निष्क्रिय झालों आहे. मोहिनीनें भारलेला मनुष्य जसा बेशुद्धावस्थेंतच हातीं धरणाऱ्याबरोबर चालतो फिरतो, त्याच्या हुकुमाप्रमाणें कृती करतो, तशी कवाईत माझ्या हातून होत आहे. होकार नकार देण्याची माझी इच्छाशक्तीच नाहींशी झाल्यासारखी वाटते. अगदीं–अगदीं पिसाळल्यासारखं झालं आहे मला. राहून राहून वाटतं कीं, हंसानें तरी मला असा दगा द्यायला नको होता. सारं जग तुटून पडलं असतं तरी एकमेकांच्या आश्रयानें आम्ही त्याच्याशीं झुंजलों असतों, पण आतां—त्याचं काय ?

आपल्याकडच्या संकेताप्रमाणें म्हणजे तिच्या नांवाची जपमाळ घेऊन मी आयुष्याची फकीरीच घ्यायला पाहिजे होती. पण जिच्याबद्दल एवढं करायचं तिच्याबद्दल प्रेम आहे कां अखेर मोहच ? यानें मी पुन्हां संशयांत पडतों. अशा मोहाच्या स्वप्नांतून जागें झाल्यावर सत्य सृष्टींतही जन्मभर डोळे मिटूनच बसायचं कीं काय ? असा विचार येतो. जाऊं दे; हजारांतल्या नऊशें नव्याण्णव प्रवाहपतितांसारखा मीही एक. तूं तरी एक त्याला अपवाद निघशील असें मला वाटे, परंतु नारायणाला आलेल्या पत्रांवरून तुझीही परिस्थिती जवळ जवळ माझ्यासारखीच आहे असें दिसतें—तूं कोणता मार्ग स्वीकारणार ?

प्रीतीची वाट कांटेरी असते म्हणतात. मला वाटतं कीं त्यापेक्षां दुसरं उदाहरण म्हणजे एक बाजूनें कललेल्या कुसळांचं देतां येईल. त्यांच्यावरून एका बाजूनें हात फिरत असतां तीं रेशमाप्रमाणें मऊ लागतात, परंतु

उलट बाजूनें हात काढून घेऊं लागलें तर मात्र करवतीच्या पात्याप्रमाणें हात चिरीत जातात. प्रीतीची सुरुवात अशी रेशमी असली तरी विपरीत शेवट मात्र तसाच विदारक असतो. हें ओळखून तरी नवख्यानें, कच्या दिलाच्या व्यक्तीनें या वाटेंत पाऊल टाकूं नये, असें माझ्या उदाहरणा-वरून वाटूं लागतें. सहज, नावीन्यपूर्ण, आणि जगावेगळ्या प्रेमाचा हा खेळ अल्पकाल खेळून हंसा बेफिरीनें बाजूला झाली. तिचा खेळ झाला पण माझ्या जीवाचा जीव जायबंदी झाला. असो, "रहाशील तिथें सुखानं रहा, संसार कर, आणि पुन्हा असा जीवघेणा खेळ खेळून कुणाच्या हृदयाच्या चिंधड्या करूं नकोस" असें तिला शेवटचें पत्र टाकून, माझ्या आयुष्यांतील या प्रकरणावर मीं कायमचा पडदा टाकला आहे.

तुझा,

वसंत.

## ४७. ' कृष्णाकांठीं कुंडल........? '

शनवार पेठ, पुणें.

ता.

मित्रवर्य नारायणराव यांसी अरविंदाचा सा. नमस्कार,

वि. वि. आपलें पत्र पावलें. वसंत खांबेटेच्या लग्नांतली जिलबी चांगलीच प्रभावी दिसते. कारण तिनें तुम्हाला बरेंच वाचाळ करून, न मागितलेला उपदेश करावयास लाविलें आहे. सुधावर प्रेम केल्याबद्दल मी सपशेल माफी मागितल्यास, आणि आपणांस विनंति केल्यास आपण बहुत कृपावंत होऊन आमच्या पिताश्रीजवळ आमचेबद्दल शिष्टाई करण्याची मेहरबानगी करणार आहांत हें कळलें. आभारी आहे. परंतु आपणांसारख्या मित्रवर्यांना ही तसदी देणें मी योग्य समजत नाहीं. सुधाबद्दल अनुदार उद्गार काढून, तिच्याबद्दल माझें मन कलुषित करण्याचे प्रयत्न आपण अगदीं पहिल्यापासून करीत आहांत हें मी विसरलों नाहीं. पण आपण लक्षांत ठेवा कीं, साऱ्या सद्गुणांच्या आणि चारित्र्याचा मक्ता कृष्णाकांठच्या सांगलीला, किंवा मुळामुठा कांठच्या पुण्याला दिलेला नाहीं; केवळ मुंबईहून आली म्हणून सुधा ही मतलबी आणि थापाडी आहे असें ठरत नाहीं. कोणत्याही कारणानें असो, तिचें माझ्यावरचें प्रेम उडून तिनें दुसऱ्याशीं लग्न करण्याचें ठरविलें असतें तर तिनें मला तें मोकळेपणानें सांगितलें असतें हें मी आतांपर्यंतच्या अनुभवावरून खात्रीनें सांगतों. कोणत्या तरी, तिच्या प्रतिकारशक्तीच्या बाहेरील एखाद्या भयंकर संकटांत सांपडून तिला हें लग्नाचें वचन देणें भाग पडलें असावें अशी मला दाट शंका येते. कारण आतांपर्यंतच्या तिच्या वागण्यावरून ती चंचल मनाची नाहीं, त्याप्रमाणेंच केवळ श्रीमंतीलाही भुलणारी नाहीं याबद्दल माझी खातरी झाली आहे. या संकटाच्या स्वरूपाबद्दल अगदीं ओंठावर शब्द येऊन सुद्धां मोठया प्रयासानें तिनें ते दाबून ठेवलेले मीं पाहिलें आहे. त्या बाबतींत शक्य तो तपास मी करीत आहेच.

जन्मदात्या वडिलांच्या रागामुळें माझी जन्मभूमि सांगली मला दुरावली आहेच. यावेळीं तुमच्यासारख्या मित्रांनीं तरी मला धीर

द्यायला हवा, पण अशा वेळेला तुम्हांला मर्मभेदक उपहास सुचावा याचें मात्र मला वाईट वाटतें. या परिस्थितींत सांगलीचें मला पुन्हां दर्शन घडेल कीं नाहीं याचीच मला शंका वाटूं लागते.

संथ वाहाणाऱ्या कृष्णानदीच्या कांठचे घाट, काळ्या सुपीक दरडी--हिरवेगार मळे--तो भव्य पूल--गांवाच्या मध्यावर उंच मनोऱ्यावरची ती पाण्याची प्रचंड टांकी--भुईकोट किल्ला--पेन्शनरांची आणि पांढरपेशांची राखीव रेखीव नवी वसाहत, शहराच्या मध्यांतला तो भव्य तलाव, तीन मैलांवरील, ऋषीच्या आश्रमासारखें एकांतांतलें माळावरचें तें भव्य कॉलेज--हे सारे स्थळविशेष एकाद्या चित्रपटासारखे माझ्या डोळ्यांपुढून जात आहेत. माझ्या घराबरोबर हेही आतां मला पारखे झाले आहेत. परिस्थितीमुळें माझ्या हृदयाला भयंकर तडाखा बसला आहे खरा, परंतु तेवढ्यानें हताश होऊन जन्मभर मुळूमुळू रडत बसण्याची मात्र माझी स्थिती नाहीं.

व्यक्तिगत दुःखानें पोळलेल्यालाच समष्टीचें दुःख कळूं लागतें. मला तर असें वाटतें कीं, साऱ्या जगांतील दुःखी आणि दलित वर्गाच्या उन्नतीसाठीं झटणाऱ्या महात्म्यांपैकीं बहुतेकांना तरी एकाद्या व्यक्तिगत दुःखावरूनच जगाच्या दुःखाची जाणीव झाली असावी. जगाच्या दुःखांत व्यक्तिगत दुःख हें कांहींच नाहीं, असें समजून ते या व्यथित जगाचे अश्रू पुसण्यास पुढें झाले असावेत. आपण 'स्मशान वैराग्य' म्हणून उपहासानें ज्याला म्हणतों, त्या मनःस्थितीचाही असाच परिणाम असतो. सुख हें अप्पलपोटें आहे परंतु दुःख हें विश्वव्यापी आहे; आणि विश्वबंधुत्त्वाचें नातें स्थापन करणारें आहे. शेले, कीट्स् सारख्या कवींनीं दुःखाच्या आंचेनें भाजून करपून जात असतांनाच आपली अमर काव्यें लिहिलीं. परदेशीं पारतंत्र्यांत कुजत असतांनाच लोकमान्य टिळकांनीं सारीं दुःखें पचवूनही 'गीतारहस्या'सारखें प्रचंड कार्य सिद्धीस नेलें, सावरकरांनीं महाकाव्यें लिहिलीं, जॉन बानियननें 'पिलग्रिम्स प्रोग्रेस' हा अपूर्व ग्रंथ लिहिला. उदाहरणेंच देत बसलों तर दुःखी मनुष्यांनींच केलेल्या महाकृतींचीं वर्णनें देण्यास माझीं दहा पत्रेंही पुरणार नाहींत. या महाभागांच्या कृतींवरून मला थोडातरी धडा घेतां येणार नाहीं का?

श्रीकृष्णाजवळून कुंतीनें मुद्दाम दुःखच मागून घेतलें. सुख हें नास्तिक आहे, तर दुःख हें आस्तिक आणि भक्तिभावनेनें भरलेलें आहे. माझ्या या दुःखाची धिंड काढून, सहानुभूतीची भीक मागण्याची माझी इच्छा नाहीं. माझ्या डोळ्यासमोरील सध्यांच्या परीक्षेच्या कार्याकडे माझें दुर्लक्ष्य नाहीं. तें आटोपल्यावर सुधेसारख्या सहचारिणीच्या सहवासांत मी जें कांहीं कार्य गृहस्थ या वृत्तीनें करणार होतों तेंच कार्य, आतां सुधेच्या वियोगानंतर संन्यस्त वृत्तीनें करीन एवढाच फरक. माझ्या मनस्थितीचें एवढें वर्णन करण्याचें कारण म्हणजे माझ्या तुटकपणामुळें आपल्या मैत्रीचा संबंध सुटला असें आपण समजूं नये. परिस्थितीनें पिचलेल्यावर प्रहार करणें मला योग्य वाटत नाहीं. आपली तशी कल्पना असल्यास आपण एकमेकांना शपथेनें बांधून घेऊन चालविलेला हा पत्रव्यवहार, कायमचा कडवटपणा येण्यापूर्वीच थांबवावा हें बरें. अशी परिस्थिती येऊं नये अशी इच्छा करणारा तुमचा मित्र,

अरविंद.

## ४८ 'काढ मनांतील आढी!'

हरभट रोड, सांगली

ता.

मित्रवर्य अरविंद यास सा. न. वि. वि.

तुझं मागचं पत्र एखाद्या काळ्याकुट्ट ढगाप्रमाणें गडगडत आणि कडकडत आलं, त्यानें मी तर अगदीं घाबरून गेलों आहें. आपण बालपणापासून एकमेकांच्या चेष्टा काय कमी केल्या आहेत ? तूं तर कितीतरी वेळां माझी शेंडी धरून, अगदीं माझा दम कोंडेपर्यंत कृष्णेंत मला बुचकळ्या दिल्या आहेस; माझ्या जुन्या पद्धतीच्या मतांची, वेशाची, बोलण्याचालण्याची मनमुराद थट्टा केली आहेस. पण मी कांहीं इतका चिरडीला गेलों नाहीं. मी मात्र एखाद्या पत्रांत तुझी थोडीशी थट्टा केल्याबरोबर तूं इतका उसळशील अशी माझी कल्पनाच नव्हती.

अन् खरं सांगूं ! माझ्या लिहिण्यांत थोडासा कडवटपणा आलाही असेल—पण त्याचं कारण द्वेष नसून प्रेमच आहे. तूं अन् मी अगदीं लहानपणापासून एकत्र वाढलेलों. प्रसादाचा पेढा एकाला मिळाला तर त्यांतला अर्धा दुसऱ्याला दिल्याशिवाय चैन पडायचं नाहीं इतकी आपली माया. पण पुण्याला गेल्यावर सुधाशीं तुझी ओळख होऊन तिच्यावर प्रेम जडल्यावर, आपल्या मैत्रींत बरंच अंतर पडत गेलं असंच मला वाटूं लागलं आणि सहाजिकपणेंच, तुला माझ्यापासून हिरावून नेणाऱ्या त्या सुधाबद्दल माझ्या मनांत अढी पडली. अगदीं सरळपणें लिहिलं आहे हें सारं. तुझ्या जिवाच्या यातना मला कळत नाहींत असं नव्हे. परंतु एखादे वेळीं तुझा विचार बदललाच, तर आपलं " अग अग म्हशी " म्हणून त्या प्राण्याचं निमित्त करून घरीं परतणाऱ्या जांवई-बोवाप्रमाणें तुला माझाही उपयोग करून घेतां यावा म्हणून माझ्या शिष्टाईची तयारी तुला कळविली होती.

या पत्रावरून तरी आतां तुझ्या मनांत कांहीं गैरसमज उरणार नाहीं अशी माझी आशा आहे. एवढें लक्ष्यांत ठेव कीं तुझा बिचारा नारायण

भोळाभाबडा जीव आहे. त्याला पोंच नाहीं. अकलेचे डावपेच माहीत नाहींत. परंतु त्याचे अंगीं खुनशीपणा, द्वेष किंवा वैरवृत्तीही नाहीं.

आतां इकडे परीक्षेबद्दलच्या आणि परीक्षकांबद्दलच्या कंड्यांना जोरांत सुरुवात झाली आहे. जरा एकीकडे पडल्यामुळें मला धास्तीच वाटते या शेवटच्या परीक्षेची. आपण सारे एकत्र असतों तर किती धीर आला असता. बाकी वसंत तर ग्रारगळलाच या वर्षाला. हंसाच्या मोहानें आणि तिच्या निराशेच्या फटक्यानें हाय खाऊन बसला आहे. पुढच्या वर्षापर्यंत तरी आतां तो स्वस्थच. माझी सारी मदार आतां तुझ्यावर. या पत्रासोबत मला हव्या असलेल्या टिप्पणींची यादी दिली आहे. त्या पाठवून दे. त्या नकलून घेऊन शक्यतितक्या लवकर परत पाठवून देईन. आमच्या कॉलेजांत तर आतां येत्या परीक्षेमुळें अगदीं भेदरल्यागत सारी सामसूम झाली आहे. तुझ्या बड्या कॉलेजांत परिस्थिति कशी असेल याची मला कल्पनाच नाहीं. तिकडच्या कांहीं गमती लिहितां आल्यास पहा. आणि हें पहा, आतां पुन्हां असा रागाचा झटका येऊं देऊं नकोस.

तुझा,

**नारायण.**

# ४९ टांगती तलवार

शनिवार पेठ,
पुणें
ता.

मित्रवर्य नारायण यासी—

तुझें प्रांजल आणि निर्मळ मनाचें पत्र वाचून मला फार समाधान वाटलें. माझें मागचें पत्र परिस्थितीनें कातावून लिहिल्यामुळें जरा तिरसटपणाचेंच होतें असें माझें मलाच वाटूं लागलें आहे. तुझें लिहिणें नेहमींचेंच होतें, पण वाचणारें माझें मन मात्र नेहमींचें नव्हतें. त्यांतील थोडा उपहास मनाला बोचल्यामुळें मी हे दोन रागाचे शब्द लिहिले याबद्दल मला क्षमा कर.

कृष्णामाईची सांगली मला अंतरली, पण कृष्णामाईसारख्या निर्मळ मनाचा तुझ्यासारखा मित्र अंतरला नाहीं या विचारानेंच मला समाधान वाटतें. तूं मागितलेली परीक्षेचीं टिपणें सोबत बुकपोस्टनें पाठवीत आहे. तिकडच्या परीक्षेच्या धांदलीबद्दल तूं लिहिलेंस, इकडेही स्थिती तशीच, मात्र त्याची सुधारून वाढविलेली आवृत्ति एवढेंच.

ग्रहणापूर्वी कितीतरी वेळ चंद्रसूर्यावर ग्रासणाऱ्या ग्रहाची छाया पडावी, आणि वेध लागून त्यांचें पूर्वीचें प्रसन्न तेज फिकटत जावें, अशा प्रकारें जवळ येणाऱ्या परीक्षेच्या जाणिवेनें विद्यार्थ्यांचें जीवन हळूं हळूं बदलत आहे. कॉलेज उघडल्यावर प्रथमतः हें गुलहौशी आयुष्य कायमचेंच आहे, अशी नवख्या विद्यार्थ्यांची कल्पना होते. अगदीं दूरवर कोठेंतरी परीक्षेचा एक काळा ढग आहे अशी जाणीव असते, पण ती अगदींच अंधुक. मृत्यू म्हणून कांहीं एक चीज जगांत आहे अशी जाणीव बहरत्या तारुण्यांत जितकी अस्पष्ट आणि उपेक्षणीय वाटते, एवढीच. तिशी संपली, चाळिशी उलटली, पन्नाशी गेली. आणि साठी आली असे टप्पे ओलांडतांना मात्र मृत्यूची मूर्ती अधिक ठळकपणें मोठमोठी होत, आ पसरून जवळ येते. त्याप्रमाणेंच दिवाळीची सुट्टी संपली, ख्रिस्ट्मस् आटोपला, निरनिराळ्या वर्गांची छोटी संम्मलनें झालीं, युनिव्हर्सिटीच्या परीक्षांच्या

तारखा, फॉर्म भरण्याच्या मुदती फळ्यावर झळकल्या, अशा टप्प्यांनीं ही परीक्षेची काळी छायाही साऱ्या कॉलेजवर पसरते. त्यांतल्यात्यांत पदवी परीक्षेचे विद्यार्थी फॉर्म भरून ऑफिसांतून बाहेर आले म्हणजे त्यांना तर सारें कॉलेज एकदम दूरावल्यासारखें आणि परकें वाटूं लागतें.

कॉलेजच्या रेसिडेन्सींना आतां दिवाळीच्या दीपमाळांची शोभा आलेली दिसते. विद्यार्थ्यांच्या एका तुकडीनें रात्रीं तीन वाजेपर्यंत जागून शेवटीं दिवे मालविले कीं, दुसऱ्या तुकडीनें त्याच वेळीं उठून चहा करून अभ्यासाला लागतांना पुन्हा दिवे पेटवावयाचे. अशा रीतीनें साऱ्या हॉस्टेलांत हल्लीं सर्व रात्रीची रोषणाई दिसून येते. खोलीच्या भिंतीवरील प्रेसमध्यें जखडून पडलेल्या, 'गट्' तुटलेल्या टेनीसच्या रॅकेटस्, मेहनत सुटलेल्या गवयाच्या तंबोऱ्यांप्रमाणें गवसणींत सुस्कारे टाकीत पडलेल्या दिसतात. नोट्स् गाईड्स यांच्या विक्रीची चांदरात होते. पहिल्या टर्ममध्यें हटकून आढळणारा वर्गांतला गलबला नाहींसा होऊन, प्रोफेसरांचे सारे बोल विद्यार्थ्यांच्या वह्यांत जाऊन बसतात. परीक्षक कोणकोण आहेत, त्यांच्या आवडीनिवडी काय आहेत या माहितीची निरनिराळ्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांची परस्पर तारायंत्रें हालूं लागतात. परीक्षक असलेल्या प्रोफेसरांच्या वर्गांना काशीयात्रेची गर्दी जमूं लागते, आणि त्यांच्या साध्या सूचनाही गंगोदकासारख्या पूज्य मानून, वह्यांच्या गडव्यांतून भरून, तीर्थाप्रमाणें पूज्यभावानें विद्यार्थी त्यांचें सेवन करूं लागतात. पहिल्या टर्ममध्यें स्टॅम्पींगच्या माऱ्यानें, आणि टिंगल उपहासाच्या शस्त्रानें प्रोफेसरांना जर्जर करणारे कांहीं विद्यार्थीही परीक्षेंतील प्रश्नांचा मागमूस लागावा, निदान परीक्षेनंतर आपला नंबर देऊन ठेवण्या इतकी तरी घसट वाटावी या हेतूनें त्याच प्रोफेसरांचा प्रत्यक्ष परिचय वाढवूं लागतात.

एकाद्या पळण्याच्या शर्यतींत फाजील आत्मविश्वासानें प्रथम रेंगाळत जाणाऱ्या उमेदवारानें शेवटीं मात्र अगदीं छाती फुटेपर्यंत मुठी आवळून धावावें अशी बऱ्याच विद्यार्थ्यांच्या अभ्यासाची स्थिति होते. खरें तर वर्षभर नेमानें थोडथोडा अभ्यास करीत गेलें तर अगदीं सामान्य अशा विद्यार्थ्यालाही परीक्षेचें भय वाटूं नये. येथवर हल्लीं परीक्षांचें धोरण सैल

झालें आहे असें म्हणतात. माझ्याकडून माझी तयारी चालू आहेच, त्यांत प्रो. सुधाकर माझ्यासाठीं फार श्रम घेत आहेत. लायब्ररीची कितीतरी दुर्मिळ बहुमोल पुस्तकें त्यांनीं आपल्या नांवावर घेऊन मला वाचायला दिलीं आहेत. अनेक प्रश्नपत्रिका सोडवून, वर्गांत न उल्लेखिलेल्या पुस्तकांतील नवी माहिती त्यांनीं मला दिली आहे. मध्यंतरीं सुधेवर आलेल्या गंडांतरामुळें मला बरेच दिवस अस्वस्थ चित्तानें घालवावे लागले. परंतु पहिल्यापासून माझे अभ्यास वर्गाच्या बरेच पुढें असल्यानें तेवढी वाण भरून काढणें फारसें कठीण गेलें नाहीं. अजूनही ते विचार मनाला अस्वस्थ करीत आहेतच; परंतु द्रोणाचार्यानें मातीच्या पक्ष्यावर नेम मारण्यास सांगितल्यावर अर्जुनाला त्या पक्ष्याखेरीज भोंवतालचें दुसरें कांहींही दिसत नव्हतें अशीच आतां माझी स्थिति झाली आहे. सध्या तरी परीक्षेखेरीज दुसरी कोणतीही गोष्ट मला दिसत नाहीं.

कमी अधिक प्रमाणांत कॉलेजमधील बहुतेक विद्यार्थ्यांची तीच स्थिति झाली आहे. पूर्वीं नाटक, सिनेमा, रेस्टॉरांना कायमचा उदार आश्रय देणारे विद्यार्थी देखील आतां त्या बाजूला क्वचितच फिरतात. दिवसांतून दोनदां उलटी सुलटी दाढी केल्यानें तुळतुळीत दिसणारे अनेक चेहरे, हल्लीं भरपूर वाढलेल्या दाढ्यांमुळें शेवाळलेल्या खडकांसारखे खडबडीत दिसूं लागले आहेत. आधींच चिमणीएवढें असणारें त्यांचें जेवण आतां तिच्या पिलांच्या आटोक्यांत येण्याएवढें कमी झालें आहे, आणि आचारीवाढप्यांची मात्र चंगळ उडाली आहे. वर्षभर उनाड चैन करून, आतांमात्र डोक्यावर ओल्या घड्या ठेवून, चहाकॉफीच्या पेल्यांच्या उसन्या उत्साहावर कुवतीबाहेर अभ्यास केल्यानें प्रकृती बिघडवून घेऊन खाटेला खिळलेले अनेक विद्यार्थीही इकडे दिसतात.

जाऊं दे; वर्णन करावें तितकें थोडेंच. माझ्या वेळापत्रकाप्रमाणें जेवणानंतरच्या विश्रांतीच्या काळांत विरंगुळा म्हणून हें पत्र तुला खरडीत बसलों आहे. अभ्यासाचा वेळ दाखविण्यासाठीं लावून ठेवलेला घड्याळाचा गजर टेबलावर खणखणाट करूं लागला आहे. माझ्या मैत्रीबद्दल तुला पुन्हां आश्वासन देऊन हें पत्र पुरें करतों. तुझा,

अरविंद.

# ५० बलिदान.

चांदणी चौक, दिल्ली.
ता.

प्रिय सुनंदास अनेक नमस्कार वि. वि.

माझे पेपर्स कसेबसे आटपून बाबांच्या पत्रावरून मी येथें येऊन पोहों-चलें आहे.

आपल्या अंगांत खूपसा ताप भरलेला असावा अशा वेळी भोंवतालचं जग कसं वाटतं याचा अनुभव तुला असेल. अगदीं जवळ उभी राहि-लेलीं माणसंही कुठेंतरी दूर आहेत असें वाटतं. अगदीं कानाजवळची हांक मैल दोन मैलांवरून आलीशी वाटते—अगदीं खोल, खर्जांतला सारंगीचा सूर लागावा तसा, एकाद्या भुंग्यासारखा आवाज सारखा कानांत घुमत रहातो. विमानांत बसल्यागत हेलकावे खात आपण कुठेंतरी जमि-नीच्या खूपसे वर उंच आकाशांत तरंगत आहोंत असें वाटूं लागतें. डोक्यांत अगदीं चमत्कारिक विचार विजेच्या पंख्यासारखे जोरानें भिर-भिरत असतात. एकादी क्षुल्लक कल्पना आली तरी तिचा माग काढीत क्षणांत तिच्या अंतापर्यंत धांव घेऊन मन पुन्हां पहिल्या ठिकाणावर येतें. ताप नसूनही माझी अगदीं तशी मनःस्थिति झाली आहे.

माणसांनीं बजबजलेली एवढी प्रचंड दिल्ली मला स्मशानासारखी ओसाड आणि भयाण वाटते, आणि त्यांतलीं माणसें भुतांसारखीं वावर-तांना दिसतात.

लग्नाचा मोसम सुरू झाल्यानें अनेक दिशांतून वाजंत्री वाजतांना ऐकूं येत आहेत. आपल्याकडे थोर माणसांच्या मृत्यूनंतर त्यांच्या प्रेत यात्रे-बरोबर ‘ **उलटी वाजंत्री** ’ वाजत नेण्याची पूर्वी चाल असे. त्यांच्या भेसूर सुरांप्रमाणें माझ्या भोंवतालच्या लग्नांतल्या वाजंत्र्यांचे सूरही माझ्या अंगावर कांटाच आणतात.

साऱ्या वाङ्मयांत निसर्गशोभा, सूर्य, चंद्र, तारे वगैरेच्या सौंदर्याची लेखकांनीं मनमुराद वर्णनें केलीं आहेत, पण मला तर वाटूं लागलें आहे

कीं, हें सारें सौंदर्य त्या त्या वस्तूंत मुळींच नसून, पहाणाऱ्याच्या दृष्टींतच असावें. चहाचा कप पिऊन आरामानें फिरायला निघालेल्या रसिक कवीला अरुणोदय आणि सूर्योदय यांच्या सौंदर्याची मोहिनी पडेल, परंतु फांशी जाण्याचा दिवस दाखविणारा हा सूर्योदय एकाद्या खुनी कैद्याला कधींतरी सुंदर वाटेल काय ?

सूर्योदय तोच, भोंवतालचें दृश्य तेंच, मग हा फरक कां पडावा ? पंचपक्वान्नाच्या जेवणाचीं लेखक मिटक्या मारून वर्णनें करतात, परंतु एकाद्या भयंकर बातमीनें धक्का बसलेल्या मनुष्याला तींच पंचपक्वान्नें अगदीं विषासारखीं लागतील. यापूर्वी दरवर्षी इकडे आल्यावर गाडींत बसून मी साऱ्या दिल्ली शहरांत भटकून येई. एका वर्षातच किती तरी नवीन प्रकार झाले असायचे. जुना दिवाण ई-खास, दिवाण-इ-आम, कुतुबमिनार, मोतीमशीद हे जुने मोंगल अवशेष, त्यासमोरच इंग्रजांनीं उभारलेल्या नव्या दिल्लीची मयसभा, तें गोल अनेकखांबी पार्लमेंटगृह, सिव्हिल लाईन्स, सेक्रेटरीएट, व्हाईसरायांचा राजवाडा, बागा नी पुतळे हीं सारीं दृश्यें आज मला पडक्या ओसाड वाड्यांसारखीं भकास वाटत आहेत. बळी देण्यासाठीं बांधलेल्या गाईप्रमाणें थरकत्या काळजानें हे क्षण मी मोजीत आहे.

मुंबईला उतरल्यावर तुला भेटून जावं असं फार माझ्या मनांत होतं, पण अचला भांडारकरच्या लग्नासाठीं तूं इगतपुरीला गेल्यामुळें माझी फार निराशा झाली. एकाद्या वेळीं तर अगदीं उदास विचार मनांत येऊं लागतात, आणि प्रश्न पडतो कीं, आतां या जन्मीं पुन्हा तुझी माझी भेट आहे कीं नाहीं.

माझ्या स्वतःच्या दुःखांपेक्षां अरविंदाच्या स्थितीचा विचार येऊनच काळजाचे शतशः तुकडे होतात. मी एक दुःखी झालें, तें मी सहन करीन पण त्यांच्यासारख्या उमद्या प्रेमळ हृदयाला दुःखाच्या खाईत लोटून गेलेल्या जाणिवेनें माझ्या जिवाला अत्यंत यातना होतात. त्यांना जाणी-वही नसेल, अशा त्यांच्या एकेका गुणावरून पंचप्राण ओवाळून टाकावेसे वाटतात. जगांतल्या सर्व रूपगुणांनीं युक्त अशा स्त्रीलाही त्यांच्या-सारखा सहचर मिळावा म्हणून ओढणी लागेल. हातीं आलेलें त्रैलो-क्याच्या मोलाचें रत्न अवचित घारीनें झडपून न्यावें, अशा रीतीनें अरविं-

दांच्या प्रेमाचा लाभ होऊनही माझ्यासारख्या करंटीच्या कपाळीं त्यांच्या नांवानें कुंकू लावणें नव्हतेंच कीं काय? सर्व जन्मभर जिवाभावानें तप केलेल्या कोणा स्त्रीच्या भाग्यांत त्यांचा लाभ असेल बरं? कामाचें निमित्त करून माझ्याबरोबर ते थेट मुंबईपर्यंत आले. आतांपर्यंत माझ्यामुळें त्यांच्यावर आलेल्या आपत्ति आणि दुःखें जणूंकाय पुरीं नव्हतींच म्हणून अगदीं त्यांचा निरोप घेईपर्यंत माझ्या पायगुणानें त्यांच्यावर नव्या नव्या आपत्ति येत होत्या. एका दिवसाच्या मुक्कामांतच तूं जिची सारखी तोंडभर स्तुति करतेस त्या मुंबईनें आपला प्रभाव आम्हांला चांगलाच दाखविला. तेथील सेंट्रल बँकेच्या सेफ डिपॉझिटमध्यें बाबांनीं ठेवलेले दागिने आणि ऐवज घेऊन, मागील एका लहानश्या गल्लींतून मी आणि अरविंद बिऱ्हाडाकडे चाललों होतों. तेवढ्यांत माझ्या शेजारून चांगला सूट घालून चालणाऱ्या, एका अगदीं सभ्य दिसणाऱ्या गृहस्थानें मला जोराचा धक्का दिला, आणि माझ्या हातांतील दागिन्यांची लहानशी पेटी हिसकली. एक क्षणाचा प्रकार—त्यानंतर काय काय झालं याची मला सरळ आठवणही नाहीं, इतक्या जलदीनें साऱ्या गोष्टी झाल्या. तो मनुष्य पुढें सटकणार एवढ्यांत अरविंदांनीं त्याचें मानगुट पकडून अगदीं सहज वर उचललें आणि एवढ्या जोरानें बाजूला फेंकले कीं, तो फूटपाथच्या कांठावर पालथा आपटून त्याच्या डोक्यांतून रक्ताची धार वाहूं लागली. मी कावरी बावरी होऊन भोंवतालीं पहातें तों तीन चार मवाल्यांशीं अरविंदांची झटापट चालली होती. मला वाटतं ते लोक त्या बदमाशाचे साथीदार असून त्याला मदत असावी म्हणून जवळच टेहळणी करीत होते. रस्त्यावर पडलेल्या पेटीवर एक पाय ठेवून अरविंद त्यांच्याशीं झगडत होते. मी मोठ्यानें ओरडूं लागलें, आणि लोक आमच्याकडे धांवत येऊं लागले. तें पाहून अरविंदांच्या खांद्यावर चाकूचा एक घाव घालून पेटीची आणि साथीदारांची आशा सोडून ते मवाली जवळच्या गल्लींतून पसार झाले. हा सारा प्रकार झाल्यावर नेहमींप्रमाणेंच 'बघे' लोकांची गर्दी जमली, आणि पिवळ्या पगडीचे शिपाई ती गर्दी हटवीत चौकशी करूं लागले. फूटपाथवर पडलेल्या बदमाशाला हातकड्या घालून ते पोलीस ठाण्याकडे घेऊन गेले. आमचा जबाब देऊन,

एका दवाखान्यांत अरविंदाचें ड्रेसिंग करून आम्ही बिऱ्हाडीं परतलों. हात ' स्लिंग 'मध्यें ठेवूनही मी दिल्लीच्या गाडींत बसेपर्यंत अरविंद माझ्याबरोबर आले होते. ते धीरानें निश्चयानें बोलत होते, पण मला मात्र माझे अश्रू आवरत नव्हते. त्यांना दिलेल्या दुःखांबद्दल मी मला हजार शाप देऊन घेतले पण त्यांनीं उलटा मलाच धीर दिला. त्यांचे गाडी निघण्यापूर्वींचे शेवटचे शब्द अजून माझ्या कानांत घुमत आहेत. ते म्हणाले,

' सुधा, माझ्या निराशेच्या दुःखापेक्षां तुझ्या हृदयाच्या वेदना हजारपट अधिक आहेत याची मला जाणीव आहे. प्रेमाच्या ओढणी-पेक्षांही निरपेक्ष कर्तव्याची स्वार्थत्यागाची पवित्र हांकच अधिक प्रभावशाली आहे, हें आपल्या उदाहरणानें तूं मला दाखवून दिलं आहेस. तुझ्या आत्मयज्ञापुढें माझ्या स्वतःच्या निराशेचं गाऱ्हाणं सांगण्याची सुद्धां मला लाज वाटेल. पूस बरं ते डोळे—स्वतःला कांहीं एक दोष देऊं नकोस. आपलं जगच इतकं विचित्र आहे कीं, अगदीं उदात्त हेतू विचार नी ध्येय असूनही दैवयोग मात्र आपल्याला एकाद्या भयाण भलत्या मार्गाकडे खेचून नेतो. कितीही प्रयत्न केला तरी-पण आपण एकमेकांना विसरणं शक्य नाहीं याची मला जाणीव आहे; परंतु या मागच्या आठवणींनीं तुझ्या कर्तव्याच्या जीवनांतील एकनिष्ठेंत अंतर पडूं देऊं नकोस; आणि हे माझे शेवटचे बोल लक्षांत ठेव, कीं केव्हांही कोठेंही, कोणत्याही परिस्थितींत, तुला जरूर लागेल त्यावेळीं मी तुझ्या पाठीशीं उभा आहे हें जन्मभर ध्यानांत ठेव.'

या साऱ्या आठवणी मनांत आल्या म्हणजे असं वाटतं कीं, अरविं-दांच्या बरोबर जगत होतें तेंच जीवन. आतां मी देहानें जिवंत असलें तरी मनानें मात्र मरून, एक जिवंत भूत म्हणून वावरत आहे. बाबांच्या नांवासाठीं हा देह गहाण टाकला नसता तर मनाबरोबर देहा-लाही तेव्हांच मृत्यूच्या दारांत नेऊन टाकलं असतं. एकादे वेळीं असंही मनांत येतं कीं, माझी सुनंदा जर इथें असती तर कांहींतरी धीर दिला असता तिनं—वेडी आशा ! कितीही जिवलग मैत्रिण झाली म्हणून दुसऱ्याचं दुःख कां घेऊं शकणार आहे ? तुझी,

सुधा.

## ५१ सुनंदेचें पत्र.

लॅबर्नम् रोड, मुंबई
ता.

श्रीयुत अरविंद पटवर्धन यांसी सुनंदेचा सा. नमस्कार.

मला पत्र पाठवितांना तुम्हाला इतका संकोच वाटायला नको होता. गॅदरिंगच्या वेळीं सुधेनें तुमचा परिचय करून दिला होताच. सुधेला पोहोंचविण्यासाठीं तुम्ही मुंबईपर्यंत आलां याची मला आधी बातमी नसल्यानें तुमची व माझी चुकामूक झाली, कारण त्यावेळीं अचला भांडारकर या माझ्या मैत्रिणीकडे देवळालीला मी गेलें होतें.

पण काय हो, पत्रांवरून दिसतां एवढे तुम्ही पुण्याचे पुरुष जर इतके भिडस्त, तर बायका किती लाजऱ्या असतील याची कल्पनाच करवत नाहीं मला. तुमच्या सुधाची मैत्रीण तुम्हाला कांहीं इतकी परकी वाटायला नको.

सुधानें तुम्हाला नकार दिला, आणि त्याच्यावर तुमचा विश्वास बसला नाहीं---त्याच्यामागें कांहींतरी रहस्यमय परिस्थिती असल्याची खातरी होऊन तुमचें सुधावरील प्रेम कमी झालें नाहीं असें तुम्ही लिहितां, या योगानें मला फार समाधान वाटतें. एकूण येवढातरी विचार आहे तुमच्यांत म्हणायचा. नाहीं तर तुम्ही पुरुष म्हणजे भारीच धसमुसळे. तेव्हांच घायकुतीला यायचे. प्रेम आहे कां नाहीं; आहे कां नाहीं, असें सारखें विचारूनच अर्धा जीव करायचे बायकांचा, आणि त्यांनीं त्रासून जरा कुठें नाहीं म्हणून म्हटलं कीं, घातलीच राख डोक्यांत, आणि दिल्या शिव्या साऱ्या स्त्री जातीला ! !

सुधेची जिवलग मैत्रीण म्हणून मी तुम्हाला सांगतें कीं, तिचें प्रेम तुमच्यावर पूर्वी जितकं होतं तितकंच अजूनही आहे. ती सत्ता संपत्तीची लोभी नाहीं. इतकें असूनही तिनें वडिलांच्या सांगण्यावरून तुम्हाला नकार कां दिला याचें सारें गूढ मी तुम्हाला आतांच सांगूं शकत नाहीं याबद्दल मला क्षमा करा. या पुढच्या महिन्या पंधरवड्यांत या प्रकरणाचा कांहींतरी निकाल होईल अशी माझी कल्पना आहे. बाकी भवितव्य कांहीं चुकत नाहीं. वेळ आलीच तर परिस्थितीला तोंड देण्याची तयारी माणसानें नेहमीं ठेवली पाहिजेच. तेव्हां योग्य-

वेळीं मी तुम्हाला येथें बोलावून घेईनच. तोंपर्यंत डोकें ताळ्यावर ठेवून पुण्याला स्वस्थ बसा अन् रागाचीं पत्रें पाठवून सुधेला त्रास देऊं नका एवढं मात्र सांगून ठेवतें.

पेपर गेले आहेत कां बरे? रिझल्ट झाल्यानंतर आपल्या पायांवर उभे राहून तुमची जगांतली किंमत पारखून घ्यायची आहे हें लक्षांत आहे ना? शहाणे असलांत तर या सुट्टीच्या महिन्यांतच कोठेंतरी व्यवसायाच्या क्षेत्रांत नाहींतर नौकरीच्या शर्यतींत आपली जागा हेरून ठेवा. पास झाल्यावर आयत्यावेळीं कोणी कांहीं ताट वाढून ठेवणार नाहीं तुमच्या पुढें. अन् सांगून ठेवतें—माझी सुधा एखाद्या बेकाराची बायको होण्याला जन्माला आली नाहीं बरं!

जाऊं दे मेलं—तुम्ही दुःखांत असणार ना या वेळीं? माझं बोलणं मनावर घेऊं नका—मला जरा खोडच आहे फटकळपणें बोलायची. अर्थ तेवढा घ्या व बाकीचा सोडून द्या. सुट्टींत मुंबईला आलांत तर मला अवश्य भेटायला या. नमस्ते. —सुनंदा.

| POST AND TELEGRAPHS | | | | |
|---|---|---|---|---|
| SUDHA SANE, CHANDANI CHOWK, DELHI. | | | | |
| STARTING | TONIGHT | DELHI | MAIL | ATTEND |
| STATION. | NEVER | SAY | DIE | LOVE |
| | | | SUNANDA | |

( तार )

सुधा साने, चांदणी चौक, दिल्ली.

आज रात्रीं दिल्ली मेलनें निघत आहे. धीर सोडूं नकोस.

—सुनंदा.

## ५२ सोनपत—पानपत.

चांदणी चौक,
दिल्ली.

अचला भांडारकर हिला सुनंदाचा नमस्कार—

"काय ग ? तुमचा ' मधुचंद्र ' होऊन कितीक तरी सूर्य उगवले, तरी अजून मैत्रिणीला बोटभर चिठ्ठी पाठवायची शुद्धं नाहीं ना तुला ? देवळालीच्या थंड हवेंत तरी तुझें डोकं ठिकाणावर राहायला हवें होतें. आतां सध्यां मी दिल्लीला आलें आणि इकडूनच हें पत्र पाठवीत आहे, हें पाहून कदाचित् तुला आश्चर्यच वाटेल. परंतु या वर्षांत नवल करण्यासारख्या अशा कितीक गोष्टी घडल्या आहेत कीं, त्यापुढें ही कांहींच नाहीं.

हें सारं वर्ष किती चटकन् स्वप्नासारखं गेलं, नाहीं ! गेल्या वर्षी आपण साऱ्या मैत्रिणी मुंबईच्या कॉलेजला होतों, तेव्हां कल्पनाही नव्हती कीं; त्याच्या पुढच्याच वर्षी साऱ्या अशा वाऱ्यावरच्या वावडी-सारख्या भरकटत लांब उडून जाऊं. सुधा गेली पुण्याला, तूं गेलीस आतां लग्न करून देवळालीला, फ्रेनी कुठें सुरतला आहे म्हणे; आणि आपल्या हंसानें तर बडोद्याला जाऊन कहरच केला आहे. तेथें वसंत खांबेटे नांवाच्या मुलाचं तिच्यावर प्रेम बसलं होतं, मला फार आशा होती कीं, हें लग्न घडून येऊन जात्यंधाना ती चांगला धडा घालून देईल. परंतु तिच्या समाजांत बरीच खळबळ उडाल्यामुळें घाबरून जाऊन तिनें माग पाय घेतला. अरविंदही आपल्या मित्रांबद्दल आगं मला सांगत होते. आपल्या मैत्रिणींपैकीं आपल्या तिघींच्या तीन परी झाल्या तीच स्थिती या मित्रांची होती. सांगलीच्या कॉलेजचे हे तीन मित्र. त्यांपैकीं अरविंद गेले पुण्याला, आणि हंसाप्रकरणांतले हे वसंत खांबेटे बडोद्याला. आणि त्यांपैकीं नारायणराव म्हणून एक आहेत ते सांगलीलाच राहिले आहेत. चांगलं तिबोटी आडवं गंध लावतात, आपली लांब शेंडी विंचरतात, कृष्णाकांठच्या वांग्यांची स्तुति, आणि मुंबईची निंदा करतात, असं अरविंद त्यांचं वर्णन करीत होते. सुधावरचं अरविंदांचं मन उडावं

म्हणून या राजेश्रींनींच त्यांच्याशीं खूप पत्रापत्री केली. आपल्या जिवलग मित्रानें त्यांच्या गांवच्या मुली टाकून एका मुंबईच्या अनोळखी मुलीवर प्रेम करावं, हें त्यांच्या संकुचित वृत्तीला कससंच वाटलं. वसंत खांबेटेनें हंसाच्या नकारानें हताश होऊन कांहीं दिवस विव्हळत काढले, पण शेवटीं हंसाबिंसा पार विसरून सरला भिडे नांवाच्या कुणा मुलीशीं मुकाट्यानं लग्न लावलं—तो आदर्श डोळ्यापुढें ठेवण्यासाठीं या नारायणरावांनीं अरविंदांना टोचणी लावली होती. हा सारा प्रकार पाहून मला तिरस्कारच वाटला. बाकी पुरुषांच्या प्रेमाबद्दल आणि चित्तस्थिरतेबद्दल माझं फारसं चांगलं मत नाहीं हें तुला ठाऊक आहेच.

मला वाटतं कीं, मनुष्याच्या मनाची आणि चारित्र्याची खरी स्थिति पहाण्याची एकच सोपी रीत आहे. समानशील मित्रांत बसला असतांना, आणि मनाविरुद्ध कांहीं गोष्टी घडल्या असतांना तो कसा वागतो याची माहिती काढून त्यावरून जें मत ठरेल तेंच खरें. बाकी आपल्यासारख्या मुलींशीं बोलतांना आपलें लक्ष वेधून घेण्यासाठीं सारे कसे मोरासारखा पिसारा उभारून नाचत असतात मेले ! जणूं काय त्यांना वाटतं कीं, आमच्या समोर दाखविलेल्या हुशारीवरच आणि वर्तणुकीवरच आम्ही त्यांच्याबद्दलचें मत ठरवतों. म्हणूनच यासाठीं अगदीं उसनी ऐट आणून, इतरांपेक्षां आपण तेवढे जसे कांहीं अगदीं सभ्य, विचारी, कर्तृत्ववान, स्त्रीदाक्षिण्य दाखवणारे, त्यांच्यासाठीं वेळ आली तर प्राण टाकणारे, अशा आवेशानें बोलत वागत असतात. हें सारं नाटक पाहून एकादे वेळीं मला इतकं हसूं येतं कीं, एकादं क्षुल्लक कारण सांगून मला ती वेळ मारून न्यावी लागते. बाकी एकदां मुलींच्या दृष्टीआड जाऊन हेच विद्यार्थी आपल्या खाशा मित्रमंडळींत बसले, म्हणजे मुलींबद्दल किती कुत्सित टीका करतात, कसली ओंगळवाणी थट्टा करतात, भलत्या अफवा उठवतात, आणि आपल्यावर त्यांपैकीं कुणाचं तरी प्रेम बसल्याबद्दल भलत्या फुशारक्या मारतात ! शेवटीं मी मनाची गांठ बांधून ठेवली आहे कीं, इतर बाबतींत हवे तेवढे शहाणे झाले तरी शेवटीं, स्त्रियांच्या बाबतींत तरी सारे पुरुष मूर्खच ठरतात. किती लपवलं तरी त्यांच्या मनांत खरं काय आहे, त्यांचा हेतू

काय आहे, हें सारं आम्हांला कळतं, या फसवेपणाबरोबरच त्यांच्यांत पोर-सवदा भोळसरपणाचाही बराच अंश असतो. जरा त्यांची स्तुति केली, त्यांच्याकडे लक्ष दाखवून, आदर वाटतो, म्हणून म्हटलं कीं अगदीं साध्या मैत्रीचाही लागलीच प्रेम म्हणून अर्थ करून भोंवऱ्यासारखा पिंगा घालूं लागतात भोंवताली.

आतांपर्यंतच्या अवलोकनानें बनविलेलीं हीं मतें खोटीं ठरविण्याची वेळ आली नव्हती, परंतु इतरांबद्दल नव्हे तरी एका अरविंदाबद्दल तरी मला माझें मत बदलावें लागणार असें आतां वाटूं लागलं आहे. सुधाच्या पत्रांत त्यांची माहिती येई, पण ' असतील कोणी पुणेरी विद्वान ' म्हणून मी त्यांच्याकडे दुर्लक्ष्यच केलं होतं. सुधेला पटले तर मी कशाला उगीच मोडता घालूं, म्हणून मी त्यांचा फारसा विचारच केला नव्हता. परंतु सुधेनें त्यांना नकार दिल्यानंतर त्यांनीं मला जें पत्र पाठविलें तें वाचून मात्र मी फार ओशाळलें. माझी कल्पना होती कीं, एकदां त्यांच्या प्रेमाचा स्वीकार करून, पुढें परिस्थितीमुळें कांहीं कारणही न देतां सुधेनें त्यांना नकार दिल्यानें हे राजेश्री अगदीं ताळ सोडून बहकतील, आणि पुरुषांच्या नेहमींच्या पद्धतीनें ' स्त्री जात तेवढी निमकहराम ' म्हणून शिव्या हांसडतील. ( अन् पुरुषजात तेवढी फार निमकहलाल असते असंच नाहीं कां ग ? ) पण तसें कांहींएक न लिहितां, सुधाच्या नकाराचें कारण तिच्या प्रेमाची चंचलता नसून, एकाद्या भयंकर संकटामुळें या प्रेमाचा त्याग करून ती अशा रीतीनें वागत असावी हें त्यांनीं बरोबर ताडलें. मीही माझ्या पत्रानें त्यांना थोडासा धीर देऊन स्वस्थ बसण्यास सांगितलें आहे.

अरविंदाप्रमाणें तुलाही कदाचित् सुधेच्या या वर्तनाचें आश्चर्य वाटेल. सुधेचें अरविंदावर निस्सीम प्रेम असलें तरी तिचे वडील एका भयंकर कारस्थानांत सांपडल्यामुळें त्यांच्यासाठीं तिला अशोक घरफोडे नांवाच्या एका फेल्ड आय्. सी. एस्. साहेबाशीं लग्न करण्याची पाळी आली आहे. त्या बाबतींतच कांहींतरी खटपट करण्यासाठीं मी येथें आलें आहे.

लौकरच सुरेश बॅरिस्टर होऊन येणार आहेत, हें तुला कदाचित् कळलें असेल. माझ्यापेक्षां तुझीच जास्ती ओळख होती त्यांच्याशीं, नाहीं ?

बॅडमिंटन खेळतांना त्यांच्याशिवाय अगदीं चुकल्या चुकल्या सारखं वाटत असेल नाहीं ? पण संभाळ हो ! नाहीं तर देवदत्तरावांना मत्सर वाटायचा त्यांचा. पण आतां तूं तर लग्न करून बसलीस—सुरेश काय करणार आतां हें पाहूं. मी तर लग्न मुळींच करणार नाहीं. पुण्यांतल्या अविवाहित स्त्रियांच्या संस्थेंत राहून देशकार्य करणार आहे म्हणतें, चक्क लिहिलं आहे सुरेशला तसं.

इथें अॅलिंच आहे तेव्हां आतां 'दिल्ली तो बहोत दूर है' असं म्हणतां येत नाहीं. माझ्याकडून मी खूप तयारी करून आलें आहे. बाकी इथून सोनपत पानिपत जवळच आहे. भाऊसाहेब कीं अबदल्ली तें पुढील पत्रांत कळवीनच पण त्या आधीं तुझं चांगलं पत्र आलं पाहिजे.

तुझी,

सुनंदा.

INDIAN RADIO AND CABLES.

TO. ADEN.

| | | | |
|---|---|---|---|
| SUNANDA | DHURANDAR | LABURNAM | ROAD |
| BOMBAY | | | |
| LANDING | BOMBAY | MONDAY | |
| | | SURESH | |

( केबलग्राम )

सुनंदा धुरंधर—लॅबर्नम रोड—मुंबई. सोमवारीं मुंबई बंदरांत उतरत आहें. —सुरेश.

# ५३ फोल आशा.

चांदणी चौक,
दिल्ली.

श्री अरविंद यांस

सुधेचा नमस्कार वि. वि.—

इथें आल्यापासून मीं तुम्हाला पत्र लिहिलं नाहीं—परंतु माझे इथले दिवस असे जात आहेत कीं अगदीं कट्टया वैऱ्याचेही तसे जाऊं नयेत. मजूर लोक खालीं अंगणांत माझ्या लग्नमंडपाचे खांब उभे करीत आहेत—त्यांतला हातोड्याचा प्रत्येक घाव माझ्या हृदयावर बसल्यासारखा वाटत आहे. माझ्या या स्थितीप्रमाणें तुमचीही स्थिती असेल याची मला पूर्ण जाणीव आहे. किती चमत्कारिक गोष्टी घडून आल्या! एकदां तुम्हाला लग्नाचें वचन देऊन, लागलीच तुम्हाला मी नकार दिला. दिल्लींतल्या बड्या अधिकाऱ्याशीं लग्न ठरल्याचें सांगितलें. खरोखर स्त्री-द्वेष्ट्यांनीं 'स्त्री-जात तेवढी निमकहराम' म्हणून त्वेषानें ओरडावें अशीच ही परिस्थिति होती. पण मला आश्चर्य वाटलं, आनंद वाटला, अन् अभिमानही वाटला; तो या गोष्टीचा कीं, ही सारी परिस्थिति माझ्या विरुद्ध असून माझ्या प्रेमावरचा तुमचा विश्वास ढळला नाहीं. स्वार्थापलीकडे—तार्किक बुद्धिप्रामाण्याच्या विचारापलीकडे, जीवाशिवाचं जें प्रेम म्हणतात तें हेंच असेल कां?

मी दिल्लीला जायला निघालें, आणि आस्थेनें मुंबईच्या सेंट्रल स्टेशनापर्यंत येऊन तुम्ही माझी सारी सोय करून दिलीत. तुमची माझी दोघांची खात्री होती कीं, आतां मी दिल्लीला जातें ती कायमचीच. पुढें मागें कधींकाळीं महाराष्ट्रांत आलेंच तर सौ. घरफोडे म्हणूनच येणार. पर्यायानें परक्याशीं होणाऱ्या माझ्या लग्नाची तयारी तुम्ही करून द्यावी—किती चमत्कारिक प्रसंग हा!—तुमच्या धीरगंभीर आणि अचल प्रेमळ हृदयाची मला पुरी ओळख पटली ती याच वेळीं. मी नजरेआड होईपर्यंत माझ्यासाठीं तुम्हाला यातना देऊन जावें असा कांहीं विचित्र योगायोगच होता. बँकच्या मागें त्या आडदांड मवाल्यांचा हल्ला तुमच्यावर

झाला तो देखील माझ्या दागिन्यांच्या पेटीमुळें. तुमच्या धैर्याचा आणि सामर्थ्याचा सहज प्रभाव त्यावेळीं मला दिसून आला. पोशाखी अन् भित्रे म्हणून कॉलेज विद्यार्थ्यांची वेळीं अवेळीं थट्टा करणाऱ्या कोणीही टीकाकारानें शरमेनें मान खालीं घालावी असा प्रसंग होता तो. त्या दोन दणगट बदमाशांना तुम्ही लीलेनें सहज लोळविलेंत, तुमच्या जखमेची जाणीवही मला होऊं दिली नाहीं. तुम्हाला कल्पना तरी असेल हा प्रकार पाहून मला काय वाटलें तें ! तिकीट काढून, माझ्या सामानाची नीट व्यवस्था करून चांगली थेटपर्यंतची सोबत पाहून मला गाडींत जागा पाहून देण्यासाठीं त्या लांबलचक प्लॅटफॉर्मवर तुम्ही जलदीनें फिरत होतां. तुम्हाला न कळत तुमच्या पाठमोऱ्या मूर्तीवर माझी दृष्टि खिळली होती. अशा पुरुष श्रेष्ठाचा सहवास आपल्या नशिबीं नाहीं हा विचार माझ्या काळजांत अगदीं चरचर कांपीत गेला. गाडीची घंटा झाली, गार्डानें शिटी फुंकून हिरवा बावटा हालविला, एंजिनाचा पहिला धक्का बसला आणि मुंगीच्या पायानें गाडी पुढें सरकूं लागली. तुमच्या डोळ्यांतलीं आंसवें तुम्ही आवरलींत, पण गाडी निघाल्यावर मी मात्र मोकळेपणानें डोळ्यांतील अश्रूंना वाट करून दिली.

अरविंद !— अरविंद ! ! कशाला गुणी झालांत बरं इतके ? एका-ध्याही दोषाचा आधार घेऊन तुमचा विचार मनाआड करण्याची संधि तुमच्या सुधेल्या ठेवली नाहींत ना ! तुम्ही रागावलां, रुसलां असतां, आपल्याच प्रेमाचं अन् माझ्या बेइमानीपणाचं रडगाणं मला ऐकवीत बसला असतां, तर हें नाइलाजाचं लग्न होऊनही मी कसेबसे दिवस काढले असते. जगाच्या रहाटीप्रमाणें कदाचित् मी तुम्हाला विसरलेंही असतें. अनेक मुलींचे प्रेमभंग होऊनही त्यांचे संसार रुटुखुटू कां होईना पण कसेबसे चाललेले मी पहातेंच आहे. पण तुमच्या या धीरोदात्त, धीरशांत अन् स्वार्थत्यागी अचल प्रेमाकडे पाहून मात्र त्याला पात्र होण्याचा प्रयत्न केला पाहिजे असं मला वाटूं लागलं आहे. इकडे आल्या-पासून तीच भयंकर तयारी मी करीत आहे.

कोणी कांहीं म्हटलं तरी जीवाचा पाश अगदीं कठीण असतो अरविंद !— तोडूं म्हटलं तरी तोडायचा धीर होत नाहीं—पण तेंच

धाडस करण्याची मी तयारी करीत आहे. एकदां बाबांच्या अब्रूवरचं हें संकट टळलं म्हणजे ते ताबडतोब पेन्शनींतच निघणार आहेत. या विवाहानें त्यांचं पितृऋण मी फेडलं म्हणजे जगाचे पाश तुटले. त्यानंतर तुमची सुधा या अन्यायी जगाचा निरोप घेणार आहे. हें ऋण फेडण्यासाठीं क्षणभर मी माझा हात त्या मांगाच्या हातांत दिला तरी त्या निसटत्या स्पर्शाचं प्रायश्चित्त मी देहान्तानेंच करणार आहे. एवढं लक्षांत ठेवा अरविंद, कीं सुधा तुमची होती, अन् कल्पान्तापर्यंत तशीच राहून स्वर्गांत तुमची वाट पहात राहील.

तुमची,

**सुधा.**

( मूळ इंग्रजी )

## ५४ नोटीस.

आग्रा

ता.

मुकद्दमा नं. ३८/१०

अशोक घरफोडे, दिल्ली यांस—

आमचे अशील सुखलाल रामचरण यानीं तुमच्यावर वीस हजार रुपयांच्या कर्जाबदल जी फिर्याद केली होती, तिची सुनावणी होऊन निकाल लागला आहे व आमच्या अशीलांस सदर रकमेची दरखास्त मिळाली आहे. तुम्ही अगर तुमचे वकील यांनीं आठ दिवसांचे आंत सदर रकमेचा भरणा करून पावती घ्यावी. नाहीं पेक्षां सदर दरखास्तीच्या अंमलबजावणीसाटीं तुमची स्थावर जंगम इस्टेट, पगार, सर्व बाबतींवर जप्ती आणावी लागेल.

प्यारेलाल वाजपेयी.

वकील—सुखलाल रामचरण,

यांसाठीं—आग्रा.

# ५५ सुरुंगाचा स्फोट !

चांदणी चौक, दिल्ली.

अरविंद पटवर्धन यांस सुनंदाचा नमस्कार

सुधाच्या निराशेच्या पत्रावरून मी येथें आलें ती अगदीं वेळेवरच. इथें येऊन मी आधीं त्या अशोकाची गांठ घेतली. मला वाटली तशीच छटेल अन् बनेल आहे स्वारी. पहिल्यानें अगदीं आर्जवानं सामोपचारानं विनवून सांगितलं कीं, माझ्या सुधाचा पिच्छा सोड. हवं तर तुला तिच्या-पेक्षां कांकणभर उजवी मुलगी पाहून देतें. हो—माझ्याच पुष्कळ मैत्रिणी आहेत. मुंबईला—आतां वयानें त्या जरा जास्ती वाढल्या आहेत एवढंच. असा दिल्लीचा बडा ऑफिसर मिळाला तर टाटाच्या एअर-मेलनं उडत येतील इथें ! पण सुधानें मागें त्याला नकार देतांना अल्लडपणानें चिडून कांहीं रागाचे अपमानाचे उद्गार काढले होते त्याच्या वर्तनाबद्दल. ती ते उद्गार विसरून सुद्धां गेली, पण त्यानें मात्र त्यावेळेपासून डूक धरला आहे. तिच्याशींच लग्न करून तिचें नाक खालीं करीन म्हणून त्याचा निश्चय आहे. शिवाय तिच्या वडिलांच्या संपत्तीचा लोभ आहेच.

ठीक आहे. मी मनांत म्हटलं, लकडीशिवाय ही मकडी वळत नाहीं. आमची मुंबईची छडीच दाखविली पाहिजे याला. म्हणून सुधा, तिचे वडील आणि मी सारे मिळून त्याची भेट घेण्याचें ठरवून मी परतलें. म्हटलं चार चौघांसमोर होऊं द्या. सुधा तर आधीं तिकडे यायलाच तयार नव्हती. मी ओढूनच नेलं तिला. तो सारा प्रसंग अजून माझ्या डोळ्या-समोर आहे. एकाद्याला सांगितला तर खोटाच वाटेल, पण खऱ्या गोष्टी कधीं कधीं कल्पित गोष्टीपेक्षांही अद्भुत असतात याचा प्रत्यय मला त्या दिवशीं आला. एकाद्याला हसूंही येईल, पण सारे पुढें निघाल्यावर मी परत आंत जाऊन, देवाला नमस्कार करून मग टॅक्सींत बसलें. केवढी जबाबदारी होती माझ्यावर ! चवताळलेल्या सिंहाच्या आयाळीलाच हात घालायचा होता मला. आम्ही अशोकाच्या घरीं आलों, आणि त्याचा अवतार पाहून दचकलोंच.

सारे केस पिंजारलेले, ड्रेसिंग गाऊन घालून अगदीं पिसाळल्यासारखे

साऱ्या व्हरांड्यांत फेऱ्या घालीत होते ते. आधीं खसूदिशीं ओरडलेच ते आमच्या अंगावर, आणि दारांतूनच आम्हांला हांकलून देण्याचा त्यांचा विचार दिसला. पण मग त्यांना काय वाटलं कुणाला ठाऊक. त्यांनीं आम्हांला आंत नेऊन बसवलं. सुधाच्या वडिलांनीं ठरवलेली हुंड्याची अर्धी रक्कम आजच्या आज द्यावी, आणि परवांचाच मुहूर्त धरावा अशी त्यांनीं खडसावून आज्ञा केली. ते अगदीं अस्वस्थ दिसले. एकामागून एक सारख्या सिगारेटस् पेटवीत आणि एकदोन झुरके मारून त्या पायाखालीं तुडवीत. ते सारे तुकडे खोलीभर पसरले होते. मला तर शिसारीच आली. सुधा आणि तिचे वडील बळी द्यायला निघालेल्या प्राण्यासारखे खालीं मान घालून बसले होते मुखस्तंभ होऊन. असा राग आला त्यांच्या शेळपटपणाचा, पण करतां काय ! शेवटीं मीच पुढें झालें अन् म्हणाले 'अशोकराव, मला जरा बोलायचं आहे तुमच्याशीं' —" तुझयाशीं एक शब्द बोलायची इच्छा नाहीं. आधीं चालती हो माझ्या घरांतून " अशोक ओरडले.

" अन् गजाननराव, तुम्हांलाही सांगून ठेवतों या पोरीला आतांच्या आतां मुंबईला न हाकलून दिलींत तर याद राखून ठेवा. व्हाईसरॉयाच्यांकडे ऑफिशियल मेमो. आणि डी. एस्. पी कडे लागलीच फोन करणार आहे मी. "

'सुनंदाबाई, आतां कृपा करून गप्प बसा, चला जाऊंच आपण. उगीच त्रास दिलांत तुम्ही अशोकरावांना.' घोगऱ्या आवाजांत गजाननराव म्हणाले.

मग संतापानें मी म्हणालें " अशोकराव, तुम्ही इतके खुनशी असाल याची कल्पना नव्हती मला. ठीक आहे. माझ्या प्रश्नांचीं उत्तरें द्या म्हणजे ही मी निघालेंच.' मी माझी बॅग उघडली.—हें पहा 'फॅनी' नांवाची एकादी इंग्लिश मुलगी आहे कां तुमच्या माहितीची ?

अन् मी हें म्हटलं मात्र, आणि त्यांच्या तोंडाचा आ होऊन त्यांतली सिगारेट खालीं पडली, आणि जळत जळत, खालीं गालीच्याला चांगलं गोल भोंक पडत चाललं तरीही त्यांना त्याची शुद्ध नव्हती. मग माझी खात्रीच झाली कीं, खरोखरच इथें कांहीं तरी पाणी मुरत असावें.

आतां सांग पुरे अशोक. आपण मोठे ' नबाब ' आहोत, हिंदुस्थानांत गेल्यावर एका इलाख्याचे गव्हर्नर होणार आहोंत, तैनातीला हत्ती घोडे ठेवून, शंभर दासदासी उभ्या करणार आहोंत, अशा गप्पा मारून तुम्ही या फॅनीवर मोहिनी घातलीत. तिला लग्नाचीं वचनें देऊन तिचा गळा गोंवलात, अन् आय्. सी. एस्. नापास झाल्यावर तिला चुकवून चोरून मुकाट्यानें निघून आलांत इकडे. सध्यां तुमचं मूल तिच्या कडे-खांद्यावर खेळत आहे. हं थांबा——उसळूं नका——एवढ्यांतच सारं आटो-पलं नाहीं. वेळोवेळीं भुलथापा देऊन तिच्या भोळ्या आईकडून, आणि इंग्लंडमधील अनेक ओळखीच्या गृहस्थांकडून तम्ही किती पैशाची उचा-पत केली आहे त्याचा हा तपशील बघा. तुमचा पत्ता नसल्यानें, उगीच सरकार दरबारी शोभा नको म्हणून त्या मायलेकी आणि दुसरे गृहस्थ अजून स्वस्थच आहेत. तुमचा पत्ता द्यायचा अवकाश कीं, बघा, कसे निघताहेत तुमचे विलायती वाभाडे...'

ब्लॅकमेलिंग ( धाकदपटशा ). चालवलं आहे तुम्ही, कोर्टातच खेचतों एकेकाला. अशोक ओरडले.—

——अस्सं. आमचं हें ब्लॅकमेलिंग; अन् सुधेच्या वडिलांशीं तुम्ही चाल-विलेला प्रकार म्हणजे अगदीं षोडशोपचारें पूजाच नाहीं? हें पहा, अशोकराव, मी उगीच अनुमानधक्क्यानें वाऱ्याशीं भांडत नाहीं! लंडन-मध्यें सुरेशराव म्हणून माझ्या ओळखीचे एक बॅरिस्टर आहेत, त्यांच्या-कडून मी अगदीं खडानूखडा बारीक तपास काढला आहे. नमुना दाखवूं कां थोडासा? हे पहा, ब्रायटन आणि रॅम्सगेटच्या वाळवंटावर उल्लू होऊन फॅनीबरोबर गळ्यांत गळे घालून काढलेले हे फोटो. तुम्ही दिलेल्या खोट्या चेक्सचे हे नंबर, चार चौकशी चालूं असतां त्यावर 'खोटीं नांवें घेऊन फसवाफसवी करून फरारी झालेला एक अज्ञात गुन्हेगार' म्हणून पडलेले हे शेरे.—

आतां मुकाट्यानें माझ्या सुधेचा पिच्छा सोडून तिच्या वडिलांचे हरवलेले दस्तऐवज तुमच्याकडेच आहेत म्हणून कबूल करतां कीं नाहीं? नाहींतर लंडनच्या 'स्कॉटलंड यार्डला' माझी एक ओळ जाऊंद्या, कीं,

" हा अज्ञात गुन्हेगार म्हणजेच अशोक " कीं तुमच्यावर दहा फौजदारी फिर्यादी दाखल होतील. मी थांबून कपाळावरचा घाम पुसूं लागलें, तेवढ्यांत अशोकनें चित्त्यासारखी झडप घालून माझ्या हातांतून बॅग हिसकली.

मला मात्र नवल वाटलं दुसऱ्याच गोष्टीचं.

आतांपर्यंत अगदीं असहाय होऊन बसलेल्या गजाननरावांच्या अंगात अशोकचीं हीं अंडींपिल्लीं ऐकून काय संचार झाला कोणास ठाऊक ? ' बदमाष ! ' म्हणून पुढें होऊन त्यांनीं त्यांच्या अशी एक सणसणीत श्रीमुखांत भडकावून दिली कीं, अशोक कोलमडला. मला वाटतं इतक्या दिवसाचा कष्टानें कोंडून ठेवलेला राग त्या चपराकींतून प्रकट झाला असावा.

—' हा सारा थयथयाट फुकट आहे बरं, अशोकराव— ' मी म्हणालें. हे फोटो नी कागद नाहींसे केलेत तरी कांहीं बिघडणार नाहीं. या नुसत्या नकला आहेत. अस्सल कागद घरींच आहेत.

' चालते व्हा सारे माझ्या घरांतून– ' अशोक किंकाळले. सारे, घेऊन जा तुमच्या पोरीला, मला लग्नच करावयाचें नाहीं तिच्याबरोबर. तुमचे कागद आहेत ऑफिसांत, जा चालते व्हा सारे '—

पडत्या फळाची आज्ञा घेऊन आम्ही सारे उठलोंच, पण दाराच्या बाहेर पडणार तोंच व्हरांड्यामध्यें कोणाची तरी बाहेर झटापट चालू असलेली ऐकूं आली. तेवढ्यांत एक लठ्ठ मारवाडी शेटजी, धापा टाकीत, आम्हांला धक्के देऊन खोलींत घुसलेच. त्यांचें पिवळें पागोटें अर्धें सुटून लोंबत होतें, दीर्घ श्वासानें कानांतल्या सोन्याच्या वळ्या अजून नाचत होत्या, आणि कपाळावरचा पांढरा तांबडा त्रिपुंड्र घामानें अर्धा पुसटला होता. हा काय प्रकार आहे याची आम्हांला कल्पनाच येईना. धापा टाकीत ते बोलूं लागले. ' अशोकजी ! कोरटके हुकूमकी तामिली के लिये तुम्हारे इस मकान और सब चीजो कीं फौरन जप्ती करने के लिये ये बेलीफ आगये है. सरकारी हुकूम है. आप लोग हटजाईये इधरसे. ' आम्ही मुकाट्यानें कोपऱ्यांतून हा प्रकार पहात होतों. मी शिताफीनें एक सुरुंग उडविला, पण त्याच्याखालींच सव्वा हात दुसरा सुरुंग दैवानें लावून ठेवला होता याची मला कल्पनाही नव्हती.

मग मात्र अशोक अगदीं बेफाम झाला. जवळची काठी घेऊन त्यानें सपासप त्या मारवाड्याच्या अंगावर ओढली. तो ओरडूं लागला. 'अरे भाई शिपाई—अरे पकडो शाळा कूं! मरगया. मरगया,—चार बरस जेल मे चक्की न फिरावूं तो मेरा नाम सुखलाल नही—शाळा! हमारा वीस हजार रुपिया खा कर हमकूंही मारता है.' शेवटीं बेलीफांनीं कष्टानें अशोकला आवरून एका खुर्चीवर बसवून ठेवलें.

त्या गोंधळांतून आम्ही हळूंच बाहेर निसटतच होतों, पण जप्तीची यादी करतांना साक्षीदार म्हणून शिपायांनीं आम्हांलाही अडकून ठेवलें, आणि मग संध्याकाळपर्यंत तेथेंच बसावें लागलें.

अशोक मात्र नांगी ठेंचलेल्या विंचवासारखा वळवळत होता. मला भीति वाटूं लागली कीं, जिवावर उदार होऊन एखाद्याचा खून पाडायला कमी करायचा नाहीं. आतां माझ्या लक्षांत आलं कीं अशोकची लग्नाची इतकी घाई का चालली होती. सुधेच्या वडिलांनीं कबूल केलेली हुंड्याची रक्कम, त्याला त्या मारवाड्याच्या पदरांत घालायची होती. एकदां येऊं लागले कीं, दुःखाप्रमाणें अजब प्रकार देखील टोळ्या करून येऊं लागतात. शेवटीं दिवेलागणीच्या सुमारावर या साऱ्या प्रकाराचा कळस झाला. साऱ्या घरांतील सामानाचा, फर्निचरचा ढीग त्याच्या खोलींत पडला होता. घुशी आणि सावकार यांनाच घराचीं रहस्यें ठाऊक असतात म्हणे. मला वाटतं कीं, सुखलालला संशय येत असावा कीं कांहीं जडजवाहीर अशोकानें कुठेंतरी घरांत दडवून ठेवलें असावें. दिल्लीकडील जुनाट वाड्यांच्या भिंती खूप जाड असतात. त्यांतल्या चोर कोनाड्यांत एकादा मनुष्य सहज चोरून बसूं शकेल. साऱ्या घराच्या भिंती काठीनें ठोकीत ठोकीत सुखलाल हिंडत होता. शेवटीं एक ठिकाणीं त्याला संशय येऊन तो बारकाईनें पाहूं लागला. दोन बाजूंच्या भिंतींच्या मधल्या भागांत एक नितळ बिलोरी आरसा लावला होता. त्या आरशाशीं तो धडपड करूं लागतांच अशोकनें पुन्हा उसळी मारली आणि साऱ्या बेलीफांना त्याला धरून ठेवतां ठेवतां पुरेवाट झाली. सुखलालनें तो आरसा उसकटला तेव्हां त्यामागें भिंतींत एक चोर कोनाडा दिसला; हातोड्यानें त्याचें दार तोडून सुखलालनें अधीरपणें आंत हात घातला.—

—पण तो कोनाडा रिकामाच होता. होतें नव्हतें तें सारें अशोकनें केव्हांच उडवून टाकलें असावें. कोपऱ्यामध्यें धुळीनें मांखलेले तांबड्या रिबननें बांधलेले जाड कागदांचें एक पुडकें मात्र होतें. सुखलालनें तें अधीरपणें सोडून पाहिलें पण पण नोटांऐवजीं कांहींतरी टाईप केलेले कागद आणि आडव्या उभ्या रेघांचे नकाशे पाहून त्यानें ते निराशेनें फेंकून दिले.

—एकाएकी सुधेचे वडील मात्र एवढ्या मोठ्यानें ओरडले कीं, आम्ही सारे दचकलों. मला भिती वाटली कीं वेडबीड लागलं कीं काय त्यांना. तशाच आविर्भावानें त्यांनीं ते विखुरलेले सारे कागद गोळा केले, आणि वेड्यासारखे मोठ्यानें बरळूं लागले—

'हेच ते व्हॉइसरायांच्या दप्तरांतील कागद, मला टाईप करायला दिले होते ते; आणि हे वायव्य सरहद्दीच्या गुप्त तटबंदीचे नकाशे. हरामखोरा ! माझ्या किल्ल्या चोरून, ऑफिसांतल्या तिजोरींतून हे डॉक्यूमेंटस् पळवून माझ्या गळ्याला फांस लावला होतास नाहीं ? आतां हे सारे शिपाई आणि हे शेठजीसुद्धां साक्षी आहेत कीं, हे सरकारी महत्त्वाचे कागद चोरून यानें घरांत दडवून ठेवले होते म्हणून. आतां तुझी घटका भरली म्हणून समज. तुझ्यासारख्या पाजी, बदमाष, अठरा व्यसनांचें माहेरघर बनलेल्या नरपशूच्या हातांत माझ्या सुधासारखें रत्न देऊन नाईलाजानें स्वस्थ बसणार होतों. मी......"

भावनातिरेकानें त्यांच्या ओरडण्याचें रूपांतर रडण्यांत झालें. पुरुषांच्या रडण्याइतका भेसूर अन् अंगावर कांटा उभा करणारा आवाज दुसरा नसेल असें मला वाटतें. तो आवेग कमी झाल्यावर ते माझ्याकडे वळून म्हणाले, 'सुनंदाबाई, तुम्ही होतात म्हणून या सापाचे दांत पाडलेत. तुम्ही आधीं याला अर्धा चेंचला होताच, त्यांत या शेटजींच्या जप्तीच्या योगानें त्याचा पुरा चेंदामेंदा झाला आहे.'

कांहीं वेळां मी माझ्या सुधाला उपहासानें म्हणे,'तुम्ही शिकलेल्या मुली म्हणजे नुसत्या नटव्या बाहुल्या. ताटावरून पाटावर करणाऱ्या, लग्न झाल्यावर नवऱ्याच्या डोक्यावर मिरीं वाटून इतर पुरुषांच्या घोळक्यांत चोवीस तास मिरविणाऱ्या.' पण आज माझी चूक मला कळून आली. सुधा

सारखी मुलगी माझ्या असहायतेंत माझा बळी न देतां स्वतःचा आत्म-यज्ञ करायला तयार झाली, आणि तुम्ही तर सातासमुद्रापलीकडची बित्तंबातमी काढून अशोकसारख्या विलायतचें पाणी प्यालेल्या बदमाषालाही दांतीं तृण धरावयाला लाविलेंत......"

आणखीही बोलले असते ते, पण मीच हात ठेवला त्यांच्या तोंडावर.

'पुरे हो पंत! तुमच्या हरबऱ्याचा वेल अगदीं आकाशाला टेंकायला लागला म्हटलं; जिवलग मैत्रिणीसाठीं एवढसं केलं त्याची स्तुति नको करायला एवढी. अन् त्यातलं बरंचसं श्रेय बॅरिस्टर सुरेशरावांनाच आहे, मी बापडी निमित्तमात्र......' तेवढ्यांत हंसून ते म्हणाले,

—वा! उत्तम, मग ते बॅरिस्टरच तुम्हाला बक्षिस देऊं म्हणजे झालं!

'—इश्श! कांहीं तरीच बोलणं तुमचं पंत. जाऊं या घरीं आतां. सारी रात्र आहे आपल्याला बोलायला.' ते कागदपत्र सील करून कोर्टांत पाठवून आम्ही आनंदानें घरीं आलों. बाकीच्या गोष्टी मामुलीच आहेत.

अशोक आतां दिवाणी तुरुंगांत हवा खात बसले आहेत, आणि पुढें कदाचित् त्यांची बदली फौजदारी तुरुंगांत होण्याचाही संभव आहे. मी आतां तीनचार दिवसांनीं निघणार आहे—आणि समजलं कां—पंतांना विचारून सुधाला देखिल घेऊन येणार आहे मुंबईला. कित्ती कित्ती बोलायचं आहे तिला तुमच्याशीं. सुधाला पुष्कळ म्हटलं कीं निराळं पत्र लिही, निदान माझ्या पत्रांत तरी बोटभर चिठ्ठी लिही—पण कांहीं म्हटलं तरी वेंधळीच तुमची सुधा बरं कां—मी आलें तेव्हां दुःखानं रडत होती, आणि आतां पहावं तर सुखानं रडते आहे—फारच म्हटलं तर खुदकन् हंसते अन् मान वेळावते—अश्शी! (तुम्हाला काय दिसणार म्हणा तिथून!) पण पुरे बाई आतां. नाहीं तर तुम्ही म्हणायचे वाचाळपणाइतकीच वाटेल ते भरमसाट लिहायचीही खोड आहे हिला—आतां पुढचं पत्र मुंबईहून——

सुनंदा.

## ५६ फुलपांखरांचे कोश.

लॅबर्नम् रोड, मुंबई.

ता.

माझ्या प्रिय अरविंदांना—

सुधाचा सप्रेम नमस्कार वि. वि.

कित्ती कित्ती आनंद झालाय् मला, सांगू ! गाऊन गाऊन माझा आवाजही बसला. किती हिंडू, फिरूं, बोलूं असं झालय् मला. काळोख्या रात्रीं एखाद्या भयंकर स्वप्नांतून आपण दचकून, ओरडून जागं व्हावं, अन् मग झाले हे सारे प्रसंग खरोखर स्वप्नांतलेच, खरोखर कांहींच घडलं नाहीं, या विचारांनीं मनाला राहून राहून समाधान वाटावं—तसं समाधान—तसा उत्साह—नी आनंद आज मला वाटत आहे.

कालच सुनंदेबरोबर आमच्या जुन्या चौपाटी कॉलेजवरून मुद्दाम फिरून आलें. आमचे प्रिन्सिपॉल डॉ. मॅकूस्विनी जवळून गेले आणि म्हणाले " हलो—यू बटरफ्लाइज, व्हेअर हॅव् यू बीन् सच् ए लॉंग टाइम् ? वी ऑल् मिस्ड यू व्हेरी मच् "— ( आनंदी पोरींनो, कुठं होतां इतके दिवस ! फार फार आठवण होत असे तुमची आम्हाला. ) आम्हांला फुलपांखरें म्हटलं त्यानीं, पण या फुलपांखरांना किती तरी दुःखाचे कोश फोडून बाहेर यावं लागलं याची कल्पना तरी असेल का त्यांना ?

आपण निरोप घेतला कोणत्या स्थितींत, आणि आतां भेटूं कोणत्या मनस्थितींत याचा विचार केला म्हणजे मन कसं भांबावून जातं. खरोखर मनुष्याच्या हातांत कांहींतरी आहे कां ? लहान मुलं कागदाच्या नावा करून पावसाच्या पाण्यावर सोडतात. कांहीं सहज पुढें जातात, कांहीं भोंवऱ्यांतून गटांगळ्या खात कशाबशा पलीकडे पोंचतात, कांहीं मधेंच एखाद्या लांकडाच्या तुकड्याला अडकून बुडून जातात. कांहींतर टाकल्या बरोबरच पालथ्या होऊन तळाशीं जातात. अशीच स्थिति मनुष्याच्या जीविताची होते असं मला वाटूं लागलं आहे. सुनंदेनें हात दिला नसता, सुखलालची जती वेळेवर आली नसती, तर हें पत्र लिहायला मी जिवंत असतें कीं नाहीं याचीच मला शंका वाटते. मागच्या संकटाच्या आठव-

णीनें थरकांप होतो, परंतु त्या संकटांतून आपण कसे सुटलों याची आठवण करण्यांतही एक प्रकारचा आनंद असतो.

आपलं एक जाऊं द्या. खरी गम्मत तर पुढेंच आहे. अगदीं राहून राहून हंसू येतं मला. सात समुद्र पोहून आलेल्यानें एखाद्या डबक्यांत गटंगळ्या खाव्यांत तसं झालंय् सुनंदाचं. माझ्यासाठीं इतकी भांडली भांडली, आणि तिची स्वतःची वेळ आली तशी बसली आहे फुरगुंटून !

सुनंदा माझ्याकडे दिल्लीला आली, आणि त्याच दिवशीं सुरेशराव इकडे उतरले. एडनहून रेडियोग्राम पाठवूनही बॅलार्डपीयरवर सुनंदा न दिसल्यानें त्यांची निराशाच झाली. सारं सांगून तिच्याऐवजी मीच माफी मागितली. आता सुनंदाच म्हणते, 'बसला रुसून तर बसूंदे—मैत्रीच्या कर्तव्यापेक्षां ज्याला आगतस्वागताची किंमत जास्त वाटते, अशा मनुष्याशीं मला मैत्रीच ठेवायची नाहीं—मग तो बॅरिस्टर असो, नाहींतर हायकोर्ट जज् असो.' बाई बाई ! अगदीं क्षुल्लक गोष्टींवरून कसे भांडतात एकमेकांशीं ! दोन वर्षे पत्रानं भांडले तरी अजून समाधान झालं नाहीं त्यांचं. काल अगदीं भल्या पहाटेला सुनंदा पांढरं बिनकांठाचं पातळ, आणि तसाच ब्लाऊझ घालून (तरी पण जरा मुरडतच) माझ्या खोलींत धांवतच आली. तिनें माझें पांघरूण फेकून दिलं, अन् मला गदगद हालवून म्हणाली 'ऐकलं कां ग, आजच निघालें मी'.

—अग कुठें ?

मी आश्चर्यानें विचारलें.

—'कुठें तरी.' पुण्याला ती अविवाहित बायकांची समाजसेवेची संस्था आहे ना, तिथें. मग तिथें न जुळलं तर बंगालच्या झनाना मिशनमध्यें, कुठंही जाईन मी, पण आतां नाहीं रहाणार इथें. अन् त्या सुरेशचं तर तोंडही बघणार नाहीं.' त्यानंतर तिनें कितीतरी बडबड केली. मग मी तिची चांगली समजूत घातली, आणि स्वतः जाऊन सुरेशला टॅक्सींतून घेऊन आलें. प्रथम दोघं बोलेनातही नीट. मधल्यामध्यें मी जशी काय टेलीफोनच ! दोघांनीं आपलं माझ्या कानाशीं लागावं, आणि एकाचं बोलणं मी दुसऱ्याला सांगावं. मग तासानंतर दोघे जरा ताळ्यावर आले. त्यांना मी सांगितलं कीं आतां जरा न भांडतांबिंडतां मोकळे-

पणानं बोलत बसा थोडा वेळ, मला पत्र लिहायचं आहे 'एका माणसाला,' म्हणून मी निघून आलें आणि हें पत्र लिहायला बसलें.......... आतां लवकर येणं होईल ना ? अगदीं क्षणक्षण मोजून वाट पहातें आहे मी.

बाई ! काय लिहून गेलें हें मी ? अगदीं एकाद्या नव्या नवरीप्रमाणें येणं–जाणं–यायचं–जायचं–म्हणून न कळतां बोलूं लागलें कीं मी ! आम्ही कितीही शिकलों सवरलों, परदेशी पुस्तकांची पोपटपंची केली, तरी आपल्या घरगुती आचार विचारांचा भाषेचा पगडा आमच्यावरून कांहीं जात नाहीं. लहानपणीं पाहिलेलें आपल्या आईचें वागणें बोलणें आपण सारें विसरून गेलों असें आपल्याला वाटतें, पण एकदां संसाराच्या ठरावीक मार्गावर पाय ठेवला, म्हणजे अंतर्मनांत सांठविलेले हे सारे संस्कार न कळतांच वर येतात, आणि आमचें बोलणें, चालणें, वागणें त्या कित्त्याबरहुकूमच आपोआप येऊं लागतें.

आतां पहिल्यानेंच अगदीं मोकळेपणानें अन् हक्कानें लिहितें—

आपली प्रेमाची,
सुधाराणी.

## ५७ सुनंदेचा आनंद !

जुहू
मुंबई.
ता.

अचला भांडारकर ( तेलंग )
हिला सुनंदाचा नमस्कार—

काळ कसा जातो अगदीं समजत नाहीं, खरं ना ग ? वर्ष दीड वर्ष झालं एवढ्यांत इतक्या गोष्टी झटपट झाल्या आहेत कीं त्यांनीं मन अगदीं बावरून जातं. आपल्या साऱ्या मैत्रिणींच्याकडेच पहा, किती फरक झाला आहे त्यांच्या आयुष्यांत ! तूं आज बसली असशील देवळालीच्या घांटमाथ्यावर, देवदत्तरावांच्या पेशन्टसूच्या केसेस जुळवीत. तरी नशीब अजून तुला त्यांनीं नर्स बनवलं नाहीं—अगदीं—बी. ए., बी. पी. एन्. ए.——! बाकी हल्लीं डॉक्टरांनीं आपल्या बायकांना नर्स बनविण्याची फॅशनच सुरू झाली आहे. दुहेरी उत्पन्नाची बाब ! पण तुझी सारी फी खुशाल तूंच घेत जा ग ! नाहीं तर एकदां पुरुषांच्या हातांत पैसा गेला म्हणजे तो बायकांना पुन्हां कधीं मिळायचा नाहीं.

सुधाचे वडील आतां दिल्लीहून पेन्शन घेऊन आले आहेत आणि सुधाच्या लग्नाचें ठरविण्यासाठीं अरविंदाबरोबर सांगलीला गेले आहेत. तेथून त्यांची तार आली म्हणजे मी सुधाला बरोबर घेऊन जाणार आहे. तुलाही तिनं आग्रहानें बोलावलं आहे. पहा डॉक्टरसाहेबांनीं परवानगी दिली तर, बाकी मला तर शंकाच वाटते. इतक्या जवळ मुंबईला माझ्या लग्नाला तुला येतां आलं नाहीं मग सांगलीला कुठून जाणार तूं ?

काय करायच बाई ! शेवटीं केलं एकदाचं लग्न. मी करणार नव्हतेंच. —चांगली एल्. एल्. बी. होऊन, साऱ्या पुरुषांच्या नाकावर टिच्चून वकील होणार होतें–हो वकील–वकीलीणबाई नव्हे, आणि मग भर कोर्टांत अशी खरडपट्टी काढणार होतें एकेकाची. पण काय करायचं ? बॅरिस्टर असूनही सुरेशनें अगदीं सत्याग्रहच केला. सुधासाठीं केलेल्या उप-

कारांचा मोबदला शेवटीं अशा रीतीनें मलाच भरावा लागला. त्या सुधाच्या वडिलांनींही अगदीं हट्ट धरला. त्यांना वाटे आपल्या सुधाचं मनासारखं लग्न हिनं शक्य करून दिलं, तर आपणही हिचं मनासारखं लग्न पार पाडून द्यावं. अगदीं जागेवरून हालेना म्हातारा. खुळा कुठला! मला लग्न करायचं असतं तर त्याच्या विनवणीसाठीं मी काय खोळंबून बसणार होतें? काय करायचं मग, केलं लग्न झालं. आतां जितकं बोलायचं असेल तितकं बोलून घे.

तरी मी आधी सुरेशला बजावून सांगितलं. त्या मुंडावळ्या, घास घालणं आणि हाताला हात लावण्याचा आचरटपणा मी नाहीं चालू देणार, अन् धार्मिक लग्नाचा जन्माचा बंदीवासही नको मला. नवरे-पणाची सत्ता गाजवायला लागलास माझ्यावर, तर ती मी कधीं चालू देणार नाहीं. अहो-जाहो–येणं-जाणं कांहीं म्हणणार नाहीं. मी अगदीं पूर्वीसारखं अरे जारे म्हणेन. मी रजिस्टर लग्न करीन. जर कधीं गुर्मीत आलास तर सरळ कोर्टांत अर्ज करीन, नाहीं तर बडोद्याला जाऊन राहीन सहा महिने. अन् तिकडे विवाह–विच्छेद का कायसा कायदा आहे त्यानें काडीमोड करून मोकळी होईन–कां, आहे कबूल? मला वाटत होतं कीं, यांपैकीं एकाद्या अटीला तरी तो नाहीं म्हणेल, अन् मग मी त्याला सरळ नकार देईन. पण कसला छट तो! कांहींही म्हटलं, तरी आपला अर्धा तास मान डोलावीत होता नंदीबैलासारखी. मग गेलें एक दिवस कचेरींत, अन् करून आलें लग्न. आपल्या साऱ्या मैत्रिणी येथें जमल्या होत्या. फ्रेनी कापडीया, अन् सुधा येथें होत्याच. ही हंसाही आली होती बडोद्याहून कांहीं कामासाठीं. मला रस्त्यांत सहज भेटली अन् मग ओढूनच आणली मी तिला. तरी तें खांबेटे प्रकरण तिच्या मनांत डांचत होतंच. शेवटीं साऱ्या मैत्रिणींना तिनं सांगितलं कीं, तिनं हें लग्न केलं असतं तर त्यांच्या जातीनें त्यांना वंशपरंपरा बहिष्कृत करण्याचा ठराव केला होता. ('न्यातबहार' म्हणतात त्याला) मग अगदी साळसूद आजीबाईसारखी सांगायला लागली कीं, अजून असे विवाह व्हायला दोन्ही समाजांची तयारी झाली नाहीं. त्याला अजून बरीच वर्षे लोटलीं पाहिजेत. तोंपर्यंत हें काम सामान्य माणसांचं नव्हे.—दगड नी धोंडे—

आपल्याला करायच असलं तर सारं कांहीं होतं ना ग ! अन मनांत नसलंच, स्वतःचा जीव कचरत असला, तर हव्या त्या सबबीमागं दडतां येतं. जाऊं दे.

सुरेशनें आतां येथें हायकोर्टात प्रॅक्टीस सुरू केली आहे. त्याला बजावून सांगितलें आहे कीं, ब्रीफलेस बॅरिस्टर होऊं नकोस, नाहींतर मलाच कुठेंतरी मास्तरीण होऊन तुझं पोट भरावं लागेल ( मी डरत नाहीं म्हणा त्याला ! )

काय त्रास आहे बाई---मी येथें तुला हें पत्र लिहीत बसलें आहे दार लावून, आणि फिरायला जाण्यासाठीं उतावळा होऊन सुरेश खालीं सारखा मोटारचा हॉर्न वाजवीत आहे, डांकेची वेळ झाली. आतां पुरे करतेंच.

काय ग ? नाहीं, होय, करतां करतां कशी तरी निवड करून आपण साऱ्या संसारांत पडलोंच म्हणायच्या. भविष्यांत काय वाढून ठेवलं आहे देव जाणे. पण कसेंही असलें तरी सुतक्यासारखं लांब तोंड करून गंभीरपणें बसण्यांत काय अर्थ आहे ? आपण आपल्याकडून प्रयत्नांची शिकस्त करावी, आणि त्यानंतर जें कांहीं पुढें येईल तें आपलं हंसून, आनंदानं गोड मानून घ्यावं, असं माझं आपलं जीवनाबद्दल मत आहे. तुला काय वाटतं ?

सुनंदा.

# ५८ सुधारविंद.

हरभट रोड,
सांगली.
ता.

मित्रवर्य वसंतराव खांबेटे यांसी नारायणचा नमस्कार.

कळलं कां तुला इकडे काय गडबड सुरु आहे ती ! इतक्या दिवसांनीं एकाएकीं अरविंद येथें आला आहे. किती महिने झाले, तो आणि त्याचे वडील यांच्यामधून विस्तव जात नव्हता. अरविंद असा अकस्मात् दिसला आणि अस्मादिकांनीं ताडलंच कीं, याच्या इथं येण्यामागं कांहींतरी रहस्य आहे म्हणून. पहातों तर त्याच्या मागोमाग टांग्यांतून एक म्हातारा बॅग घेऊन उतरत होता. मागून कळलं कीं तो म्हणजेच त्या सुधेचा बाप. दाराशीं अरविंदची हांक ऐकून त्याचे वडील अगदीं तणतणतच बाहेर आले. आणि आल्या पावली त्याच टांग्यानें त्याला परत निघून जाण्यास फर्माविलें. मला वाटलं कीं, आतां इथें खूप चकमक झडणार, आणि अरविंदाच्या होणाऱ्या पूजेंतली दोन चार फुलं त्या म्हाताऱ्याच्या डोक्यावरही पडणारच. पण क्षणांत पहातों तों प्रकार निराळाच. त्या म्हाताऱ्यानें चटकन् पुढें होऊन अरविंदाच्या वडिलांकडे पाहिलें आणि सांगितलें कीं, दहा सालीं तुम्ही कारकून म्हणून रिटायर झालांत तेव्हां मी वरच्या ग्रेडमध्यें नुकताच लागलों होतों. मग त्या वेळचे कामिशनर, मामलेदार, कलेक्टर, हेडक्लार्क या साऱ्यांच्या खाणाखुणा सांगितल्या. ते रिटायर होतांना त्यांना झालेल्या पानसुपारीच्या वेळेच्या गमती देखील बोलून दाखविल्या, आणि मग दोन्ही म्हातारे जे खुलले म्हणतोस ! मग काय, त्यांचा रागबीग चट सारा कुठल्या कुठें हवेंत वितळून गेला. आंतल्या दारामागून अरविंदाची बिचारी आई डोळ्याला पदर लावून उभी होती. आंत जाऊन अरविंदानें तिला नमस्कार केला. अशा रीतीनें बंदी दूर झाल्यावर आम्ही सारी मित्रमंडळी त्याच्या घरीं जमलों होतों, पण त्या दोघा म्हाताऱ्यांना आमची अगदीं शुद्धच नव्हती. त्यांचं सारं विचित्रच. पेन्शन घेण्यापूर्वी कुठें

कुठें देशभर भटकून आलेले असतात, कुठल्या ओळखी असतात त्यांच्या देव जाणें. त्यांच्या ज्या मागच्या काळाच्या आठवणी निघाल्या त्या कांहीं विचारूं नकोस. रानडे, गोखले, टिळक, जिन्सीवाले, काथवटे, भांडारकर--- रात्र पडेपर्यंत नुसता हैदोस चालला होता. शेवटीं त्या दिल्लीच्या म्हाताऱ्यानें हळूंच गोष्ट काढली, अन् पदर पसरला कीं, माझ्या सुधाला आतां पदरांत घ्या म्हणून. अन् म्हाताऱ्यानं मागचा सारा विरोध विसरून चटकन् कबूल केलं तें. शंकरासारखा स्तुतिप्रिय आहे बिचारा. रागावायलाही वेळ नाहीं अन् खूष व्हायलाही वेळ नाहीं. कोणी विरोध केला तर अगदीं लोखंडी कांबेसारखा ताठर राहील, एकुलत्या एक पोराचीही पर्वा करणार नाहीं. पण स्तुति करून 'तुम्ही मोठे, तुम्ही वडील, आमचं कसलं काय,' म्हणून मोठेपणा दिला कीं, मात्र अगदीं मेणाहून मऊ. एकूण सांगायचं काय—त्याच बैठकींत पुढच्याच मुहूर्तावर सुधाला सून म्हणून स्वीकारायचं त्यांनीं कबूल केलं. आम्ही सारे मित्र मिळून कृष्णेच्या डोहांत खूप पोहलों, बोटिंग, 'तात्यासाहेबांच्या मळ्या'तलं वनभोजन कांहीं विचारूं नकोस. तुलाही बोलवावं म्हटलं पण मुंबईची तुझी नोकरीची खटपट आणि भेट याच वेळेला आहे. तुझा इंटरव्हयू (भेट) कसा काय झाला, त्या फर्ममध्यें नोकरीची कितपत आशा हें मला कळीव.

अरविंदानें तार केल्यावरून सुधा लागलीच इकडे येऊन पोहोंचली. मीच गेलों होतों तिला उतरून घ्यायला. एक सुधा आणि दुसरी तिची मैत्रीण आहे कुणी सुनंदा नांवाची. दोघी आल्या आहेत मुंबईहून. सुधाबद्दल आपला गैरसमज झाला होता म्हणून अगदीं सरळपणें कबूल करतों बुवा. दिसायला शंभरजणींत उठून दिसेल अशी आहेच, बोलणं चालणं वागणं यांत कांहींतरी उणं काढून नांव ठेवायला इकडच्या साऱ्या वरपक्षाच्या बायका टपून बसल्या होत्या, पण त्यांच्या चोखंदळ दृष्टीलाही कुठें नांव ठेवायला जागा मिळाली नाहीं. नुसती शिकलेली, अन् सुधारक म्हणून नाक मुरडूनच त्यांना समाधान मानून घ्यावं लागलं एवढ्यावरूनच काय तें समज. पण अस्मादिकांचं मुंबईच्या मुलींबद्दलच मत अगदीं चुकलं असं मात्र समजूं नकोस. ती नसली तर तिची मैत्रीण मात्र अगदीं मी म्हटल्याप्रमाणें आहे—बाप रे ! प्रकरण आहे नुसतं !

फुटाण्यासारखी ताड् ताड् उडते आहे. ओळख नको, देख नको. जिभेला धार इतकी आहे कीं, आपले प्रसिद्ध मिरजचे चाकू अन् तलवारी रद्द आहेत तिच्यापुढें. अगदीं स्टेशनावरच ती मला म्हणाली.

'तुम्ही अरविंदरावचे मित्र नारायणराव कीं नाहीं' मी हो म्हटलं, अन् ती आपली 'ही ही' करून हंसायलाच लागली वेड्यासारखी!! तसं माझ्यांत हंसण्यासारखं काय आहे रे?——असा राग आला मला तिचा; बॅरीस्टर सुरेश नांवाच्या कोणा एकाशीं तिचं नुकतंच लग्न झालें आहे म्हणे. मला वाटतं त्याच्याऐवजीं हीच चांगली बॅरिस्टर झाली असती. अशा मुलीशीं माझ्यासारख्याचं लग्न झालं असतं तर अगदीं दुसऱ्या दिवशीं संन्यास घेऊन, जाऊन बसलों असतों नरसोबाच्या वाडीला घांटावर, नाहींतर औदुंबरला डोहाच्या कांठीं. जाऊं दे. आतां माझ्याबद्दल ओघानं आलं म्हणून आपलं सांगतों तुला, पण अगदीं गुप्त ठेवली पाहिजे बातमी. आपल्या पलीकडच्या आळींतील ती सगुणा बापट ठाऊक असेल तुला. व्हर्न्याक्युलर फायनलला बसणार आहे ती या वर्षी. तिचे वडील माझ्याबद्दल लांबून लांबून चौकशी करीत होते, ते कुठं या ढालगज सुनंदेनें ऐकलं अन् लग्न-घरांत आम्ही सारे गप्पा मारीत बसलों असतां तिला हात धरून ओढीतच आणलं, अन् बसवलं सहा जणांत पत्ते खेळायला. शेवटीं आम्ही दोघेंच उरलों आणि त्यांतही मीच झब्बू बनलों!...तेव्हां तिनं आमची इतकी चेष्टा केली कीं, शेवटीं ती बिचारी रडकुंडीला येऊन उठून गेली. साऱ्या लग्नांत आपला हिचा बोभाटा. जिथं पहावं तिथं सुनंदा, ऐकावं तिथं सुनंदा. करवली असली तरी नवरीच्या वर ताण! अन् जहांबाज अशी कीं, जसा हिचाच वरपक्ष आहे! अरविंदाच्या माउलीनें बिचारीनें मनांत किती तरी बेत करून ठेवले होते. मानपान, रुसणीं फुगणीं, रासन्हाणी, वरमाई म्हणून मंडप गाजवायचे—पण इकडून एकदां हिचा तोफखाना सुरू झाला कीं, त्या बापडीनें मुकाट्यानें माघार घ्यावी—

परवांच्या थोरल्या प्रयोजनाला गांवांतले झाडून सर्व मित्र आले होते. अरविंदाची ओळख असलेले प्रो० सुधाकर मुद्दाम पुण्याहून आले होते. पूर्वी ते सांगलीला होते हें तुला आठवत असेलच. मग काय, अगदीं कॉलेजमय वातावरण झालं होतं. त्यांतही या सुनंदेचा वरचष्मा. आमचं

सांगलीचं कॉलेज म्हणजे खेड्यांतली शाळाच आहे, पुण्यांतलीं कॉलेजं म्हणजे भटजींच्या पाठशाळाच आहेत आणि खरं कॉलेज पहायचं असलं तर आमचं मुंबईचं चौपाटी कॉलेजच ! असं हजार तोंड केलं तिनें, तरी तुझ्या बडोदा कॉलेजबद्दल सांगायला तूं नव्हतास, नाहींतर चांगलं कॉलेज चक्रीपुराणच झालं असतं. खरंच बुवा अगदीं आनंदांत गेले हे दिवस.

सुधाच्या वडिलांजवळ माया बरीच दिसते आहे. म्हाताऱ्यानें इथेंच मुक्काम ठोकायचं ठरवलं आहे, आणि नव्या वसाहतींत एक छोटासा बंगलाही घेऊन टाकला आहे. पहाटे साडेसहाला डोक्याला मफलर बांधून, कॉलेज आणि गेस्ट हौसकडे पेन्शनरांची एक टोळी फिरायला निघते, त्यांत तेही सामील झाले आहेत. मग आठ वाजतां आळीपाळीनें कोणातरी एकाच्या घरीं चहा घेऊन हे सारे परत येतात, आणि दुपारीं इलस्ट्रेटेड विकलीमधील क्रॉसवर्ड पझलचीं कोडीं सोडवीत बसतात.

झालं, संपलं आपलं कॉलेजचं जीवन. या वर्षांतच शेवटीं आपण इतके पांगलों तरी पत्रांनीं नेहमीं एकमेकांच्या भेटी होत होत्याच. नोकरी पहाण्यासाठीं तूं मुंबईला जाऊन बसलास. अरविंद बहुधा एम्. ए. होईल. आम्हीही पास झाल्यास दोन वर्षांनीं बी. टी. होऊन बसूं कुठें तरी पोरें हांकीत. बरा शांत आणि निरुपद्रवी धंदा आहे आपला. फारशी प्राप्ति होणार नसली तरी माझ्या स्वभावाला बरा जुळेल असें वाटतें. कोण करतो उगीच कटकट, नी दगदग या धकाधकीच्या जगांत ?

कॉलेजच्या उंबरठ्यांतून आपण आतांशीं जगांत पाय टाकीत आहोंत. आपापल्या कुवतीप्रमाणें या प्रवासाला पुरेशी शिदोरी आपण घेतली आहेच. पुढें कांहींहीं होवो. मला माझ्यापुरतं वाटतं कीं या चार वर्षां-तल्या आनंदी जीवनाचा सांठा मी माझ्या मनांत इतका शिगोशीग भरून घेतला आहे कीं, पुढें जगांत कितीही दुःखें आलीं तरी या आनंदी आठवणींच्या विरंगुळ्यावरच मी जगूं शकेन असें वाटतें.

तुझा,

**नारायण.**

# ५९ रिकामपणची कामगिरी.

पुणें.

ता.

मित्रवर्य नारायण

यास नमस्कार. वि. वि.

तीन चार दिवसांत तूं नोकरीच्या शोधासाठीं मुलुखगिरीवर निघणार आहेस हें तुझ्या आजच्या पत्रावरून कळलें. पेशव्यांच्या कारकीर्दींत कृष्णाथडीच्या तट्टांनींही गंगेचं पाणी चाखलं होतं हें लक्ष्यांत ठेव. आणि सांगली मिरजच्या पंचक्रोशींतच एखाद्या चुकार तट्टाप्रमाणें अडूं नकोस. महाराष्ट्राच्या अटकेपार जाऊन, जीवाचा 'चांदणी चौक' करून घेण्याची छाती असली तर मला कळीव. सुधेच्या वडिलांचा अजून दिल्लींत बराच वशिला आहे. कुठेंही चिकटवून देतील तुला.

सांगली सोडण्याच्या तयारींत आवराआवर करतांना, मी मागें लिहिलेल्या साऱ्या पत्रांचें तूं पुन्हा पारायण केलेंस असें लिहितोस—माझी पत्रें इतक्या काळजीनें जपून ठेवण्यासारखीं असतील अशी माझी कल्पना नव्हती आणि अजूनही नाहीं. अरे, **ही नुसती रिकामपणाची कामगिरी समजायची. भोंवतालच्या कॉलेज जीवनाचीं दृश्यें, आणि त्यावरून सहज सुचत गेलेले विचार तुझ्यासारख्या मित्राला कळवून ठेवावेत म्हणून हीं पत्रें फुरसदीच्या वेळीं मी लिहून पाठविलीं होतीं. त्यांत विचार किंवा कथानकाची कलाकुसर नाहीं कीं कादंबरीसारखी चिरेबंदी घडण नाहीं.**

स्वतःचं नांवही विसरण्याचा विसरभोळेपणाचा 'विक्रम' करणाऱ्या तुझ्यासारख्या मित्रानेंही हीं सारीं पत्रें जपून ठेवावींत' तीं वाचून त्याबद्दल मला प्रश्न करावेत याचें श्रेय या पत्रांच्या चटकदारपणाला न देतां, 'कृष्णामाई'प्रमाणें निर्मळ आणि शुद्ध अशा तुझ्या मित्रभावाला आणि अपुलकीच्या भावनेलाच मी देईन. खऱ्या प्रेमाप्रमाणें खरी मैत्रीही जगांत फार विरळा सांपडते. या मैत्रीच्या पोटीं समानता असते. तुझ्या

पत्रांत तूं उगीच सुदाम्याचें उदाहरण देऊन आपल्याकडे लघुत्व पत्करलें आहेस तसलीं नातें मी तुला घेऊं देणार नाहीं. असो.

तुझ्या पत्रांतल्या एकाच मुद्द्याचें थोडें स्पष्टीकरण मला करावेंसें वाटतें. **माझीं पत्रें म्हणजे कॉलेजच्या जीवनाचें सर्वांगीण परीक्षण नव्हे** हें मी स्पष्ट सांगितलें आहेच. तरीही तूं विचारलें आहेस कीं "कॉलेज जीवनाबद्दल मतें, सुधारणार्थ योजना लिहून, कॉलेजच्या बाहेरील राजकीय, सामाजिक चळवळीबद्दल तूं अगदीं मूग कां गिळले आहेस ?"

तुझा गैरसमज होऊं नये म्हणून लिहितों. कॉलेज बाहेरील अनेक राजकीय व सामाजिक चळवळींचा मी अभ्यास केला, व त्यांना यथाशक्ति हातभारही लावला. परंतु त्याबद्दल माझीं मतें तुलाही लिहिलीं नाहींत कारण विद्यार्थी दशेंत असतानांच, संपूर्ण व सखोल अभ्यास केल्याशिवाय या बाबतींतील मतें अधिकारानें प्रकट करणें मला तरी हास्यास्पदच वाटतें. कॉलेजांतील विषयांप्रमाणेंच या राजकीय, सामाजिक संघटनात्मक चळवळींचा खोल अभ्यास विद्यार्थ्यांनीं जरूर करावा. परंतु उतावळीनें अपक्व बुद्धीनें, पुढील परिणामांकडे डोळेझांक करून विद्यार्जनाचें ध्येय बाजूला ठेवून केवळ त्या चळवळींत पूर्णपणें मग्न मात्र होऊं नये.

कॉलेजांतील चार वर्षें म्हणजे सैनिकांच्या लष्करी शिक्षणाच्या शिबिराप्रमाणें आहेत. या अवस्थेंत असतांना भावी काळांतील आपल्या ध्येय व कार्याची कसून तयारी करून घ्यावी, आणि पुढें पुरेल अशी विचारांची, उत्साहाची शिदोरी बांधून घ्यावी. लष्करी शिक्षणाच्या शाळेंत पाऊल टाकल्याबरोबर अशा होऊं घातलेल्या सैनिकानें ताबडतोब रणांगणाच्या आघाडीवर कूच करावें हें मत, आणि विद्यार्थ्यांनीं विद्यार्थिदशेंतच प्रत्यक्ष राजकारणाच्या चळवळींच्या भाउगर्दींतच उडी ठोकावी. हें मत—हीं दोन्हीं सारखीं वाटतात. योग्य शिक्षणानंतरच शिपाई रणक्षेत्रावर आपली मर्दुमकी दाखवूं शकतो—त्या आधींचा अवसानघातकी उतावळेपणा त्यालाच नव्हे तर त्याच्या पक्षालाही हानिकर असतो. कॉलेज-जीवनांत असतांना, देशांत चालू असलेल्या राजकीय व सामाजिक

चळवळींचा विद्यार्थ्यांनीं कसोशीनें, तौलनिकदृष्टया अभ्यास करावा; त्यापैकीं कोणत्या कार्याकडे आपला ओढा आहे, कोणत्या क्षेत्रांत आपल्याला अधिकांत अधिक कार्य करतां येईल या सर्वांचा आरखडा त्यानें मनांत आंखून ठेवायला हवा. हीं विद्यार्जनाचीं वर्षें संपल्यावर या अभ्यास आणि तयारीच्या जोरावर सर्व करण्यासाठीं सारें आयुष्य पुढें मोकळें आहेच !

परंतु याहून दुसरें एक कारण मला अधिक जवळचें वाटलें. चार वर्षांत मी कॉलेज जीवनाची पहाणी करून तुला माझे विचार या वर्षांत कळविले. त्यावरून मला असें वाटतें कीं, विद्यार्थ्यांना, अध्यापकांना, आणि कॉलेजच्या चालकांना खरें विधायक कार्य करावयाचें असेल तर त्यांना **आपल्याभोंवतालींच** केवढें तरी विस्तीर्ण क्षेत्र सांपडेल. त्यासाठीं दूरच्या राजकारण–धर्मकारण किंवा समाजकारणाकडे धांव घ्यावयास नको. आपल्या क्षेत्रांतील कॉलेजजीवनाची बजबजपुरी तशीच टाकून इतरांच्या घराची व्यवस्था लावण्यास धांवणारे कार्यकर्ते पाहिले म्हणजे मला फार वाईट वाटतें. Charity begins at home अशी एक इंग्रजी म्हण आहे. वसंतानें बडोद्याहून लिहिलेल्या एका पत्रांत आपल्या नव्या गुजराती ज्ञानाची चुणूक दाखविण्यासाठीं एक म्हण लिहिली होती तीही मला फार समर्पक वाटते.

“ घरना छोकरा घंटी चाटे, ने उपाध्याने लोट !”

म्हणजे—

**‘उपाशीं पोरांनीं चाटावीं जातीं–अन् शेरभर पीठ उपाध्याच्या हातीं।’**

असा प्रकार आपलेकडे चालला आहे कीं काय अशी मला शंका वाटूं लागली आहे.

आपल्या भोंवतालचें कॉलेज जीवन आदर्श करूं—एवढें संकुचित ध्येय पार पाडूं म्हटलें तरी कितीक वर्षें कार्य करावें लागतें, तें कार्य केल्यानंतर खुशाल बाहेरचीं कार्यें हातीं घ्यावींत.

या कार्याचा वांटा विद्यार्थि–अध्यापक आणि अधिकारी वर्ग यांनीं बरोबरीनें उचलला पाहिजे.

—वर्गातली, सभांतली बेशिस्त, परावलंबित्व, परधार्जिणेपणा, निष्क्रीयता, बेफिकीरी, लष्करी व आर्थिक शिक्षणाबद्दलची स्वावलंबनाची अनास्था, विलासी मनोवृत्ति, धर्म, संस्कृति आणि विभूती याबद्दल अनादर, संघटनेचा अभाव वगैरे अनेक दोष विद्यार्थ्यांनींच संघटित होऊन, कार्योन्मुख होऊन प्रथम दूर केले पाहिजेत.

अध्यापकांपुढेंही किती तरी कार्य आहे. विद्यार्थिवर्गाबद्दल आदर, खेळीमेळीची वर्तणूक, सहकार्याची तयारी, चोख, वक्तशीर व कसोशीचें अध्यापन, विद्यार्थ्यांच्या मार्गांतील अडचणी सहानुभूतीनें समजून घेऊन त्या निवारण करण्याची तयारी हीं कार्यें अध्यापकांनीं योग्यरीतीनें पार पाडलीं पाहिजेत.

आणि कॉलेजच्या चालक अधिकारी वर्गापुढें तर इतकें कार्य आहे कीं तें तसेंच टाकून इतर क्षेत्रांकडे धांव घेण्यास त्यांना वेळ कसा मिळतो याचेंच मला नवल वाटतें. **कोणाही व्यक्ति अगर संस्थेला उद्देशून मी लिहीत नाहीं—माझ्या विधानांना अपवाद अशा अनेक शिक्षण-संस्था मला सदैव वंद्यच आहेत, परंतु नाइलाजानें लिहावें लागतेंच.**

पुष्कळशी सरकारी कॉलेजें काय—खाजगी काय सर्वांतून आज शिस्तीचें दिवाळें वाजलेलें दिसतें. विद्यार्थ्यांकडे या प्रकाराचा कोणी अर्धा वांटा दिला तर चालकांकडे निदान उरलेला वांटा तरी जाईल. विद्यार्थ्यांना विश्वासांत घेऊन, त्यांच्या सहकार्यानें शिस्तीची एक सर्वांगीण योजना आंखून ती पार पाडणें अशक्य आहे असें मला वाटत नाहीं. अशी शिस्तीची घडी बसविणें हें आजच्या कॉलेजजीवनांतील पहिलें कार्य आहे. यानंतरचें दुसरें कार्य म्हणजे विद्यार्थ्यांच्या शक्य तितक्या सोई आपल्याकडून होत आहेत कीं नाहींत हें पहाणें. पुस्तकालय आणि अध्ययनांतील अडचणी पासून तों पिण्याच्या पाण्यासारख्या लहानशा बाबतीपर्यंत विद्यार्थीवर्गाची किती कुचंबणा आणि अडचण होत असते याची कल्पनाही चालक—वर्गाला नसेल. या अडचणी कोणीं अगदीं कायदेशीर ( रेड—टेप् ) पद्धतीनें पुढें मांडणारही नाहीं, अथवा तशा रीतीनें त्या दूरही होण्यासारख्या

नाहींत. त्यासाठीं विद्यार्थी, अध्यापक आणि चालक यांचा मोकळेपणानें आणि मित्रभावानें विचार-विनिमय झाला पाहिजे. नाहींतर तक्रार करणाऱ्यालाच व्हावयाचें कीं कुठून या उपद्व्यापांत पडलों म्हणून. कुठल्याही शिक्षण-संस्थेंत कार्यक्षम अध्यापन होण्यासाठीं अध्यापकवर्ग हा संतुष्ट आणि उत्साही असावा लागतो. परंतु हा उत्साह आणि आपलेपणा त्यांना चालकांकडून मिळालेल्या वागणुकीवर अवलंबून असतो.

पगार, दर्जा आणि जबाबदारी यांत नेहमीं फरक राहणार हें उघड आहेच. परंतु एकदा अशी प्रतवारी लावून ठेवल्यानंतर आपल्या संस्थेंतील अध्यापकांचा मान आपणच राखणें ही चालकांची जबाबदारी आहे. कोणाचीही अवहेलना, अपमान, किंवा उपेक्षा केल्यानें त्या अध्यापकाच्या कार्यक्षमतेंत आपोआप कमीपणा येतोच.

विद्यालयांतील शिस्त बिघडण्याच्या अनेक कारणांपैकीं एक मुख्य कारण म्हणजे उच्च अधिकारीवर्गाकडून दुय्यम अधिकाराच्या अध्यापकांना मिळणारी वागणूक. आपल्या डोळ्यांदेखत अशा अध्यापकांचा पदोपदीं पाणउतारा केलेला विद्यार्थ्यांना उघड दिसल्यावर त्यांना तरी अशांबद्दल आदर कुठून राहणार ? निर्विष किंवा भग्नदंत भुजंगाप्रमाणें अशा अध्यापकांनीं रागानें कितीही फटाटोप केला तरी त्यांच्याकडून आपल्याला कांहींही भय नाहीं हें कळण्याइतके आतां विद्यार्थी खास सूज्ञ झाले आहेत. असो. या नाजूक विषयावर लिहिण्याइतका अजून माझा अधिकार नाहीं, पण माझ्यासारख्या साध्या विद्यार्थ्याच्याही लक्ष्यांत अशा गोष्टी येतात म्हणून या बाबतीचा उल्लेख करावा लागला.

थोडक्यांत सांगायचें म्हणजे अनेक कामें एकदम हातीं घेऊन तीं सारींच कार्यक्षम रीतीनें पार पाडणें फार कठीण किंबहुना अशक्यच असतें. जगांत कार्य करून दाखवावयाचें असेल, समाज व देश यांतील जीवनाला शिस्त लावून, त्यांचा उद्धार करण्याची इच्छा असेल तर आधीं आपल्या भोंवतालच्या क्षेत्रापासूनच सुरुवात करावी, त्याला शिस्त लावावी, त्याचा उद्धार करावा, आणि मग दुसऱ्या मोठ्या कार्यांना हात घालावा.

कॉलेजच्या जीवनाशीं, विद्यार्थि, प्राध्यापक, चालक, किंवा पालक, यांपैकीं कोणत्याही नात्यानें निगडित झालेल्या व्यक्तींनीं आधीं '**कॉलेजच्या आवारांतील**' कार्याच्या डोंगराकडे लक्ष द्यावें—प्रथम आपलें कार्यक्षेत्र—कॉलेजचें जीवन आदर्श करण्यास हातभार लावावा, आणि त्या सेवेच्या समाधानाची शिदोरी घेऊन मगच 'जगाच्या कल्याणासाठीं' बाहेर पडावें. एवढेंच.

तुझा स्नेहांकित,
अरविंद.

## ६० आवारांतून बाहेर.

पुणें,

ता.

प्रिय हंसा हिला सुधा पटवर्धन हिचा सप्रेम नमस्कार.

नव्या नांवानें हें पहिलें पत्र तुलाच लिहितें. माझ्या लग्नाला येतां येत नाहीं म्हणून तुझं पत्र मिळालं. कॉलेजच्या दिवसांतल्या बोलाचाली इतक्या मनांत ठेवूं नयेत माणसानं. त्यांतून वसंतराव खांबेटे सांगलीला नव्हतेच त्यावेळीं.

माझ्या लग्नाबद्दल हकीकत तूं विचारतेस. पण तुमच्या लग्नांतल्या-सारखे हरतऱ्हेचे प्रकार आमच्यांत नाहींत. सारा प्रकार अगदीं साधा. तुमचा तो ' उपर घी नो कंसार ' ( तूप ओतलेला शिरा ), तें पंक्तींतून धार न तोडीत जमिनीवरूनही तूप ओतीत जाणं, भिंतीवर दोघांनीं उठवायचे कुंकवाचे हाताचे छाप, अन् समोरासमोर बसून दोन्ही पक्षांच्या बायकांनीं म्हणायचीं उखाळ्यापाखाळ्यांचीं गाणीं—काय ' **फटाणे** ' म्हणतात ना त्यांना ! यांचा मागमूस नसतो आमच्या लग्नांत.

अरविंदांच्या मताप्रमाणें नुसते धार्मिक वैदिक विधि करून, फारशा मानपानाच्या उधळपट्टीला रजा देऊन त्याऐवजीं माझ्या बाबांनीं इथल्या अनाथाश्रमाला हजाराची देणगी दिली. एकाद्या तुफानांतून बचावून हालहाल होऊन एखादें जहाज बंदरांत जाऊन पोंचावें, तसें समाधान, सौख्य आणि शांतता माझ्या जीवाला वाटते आहे. परीक्षांचा रिझल्ट लागला. मी आपली कशी बशी पास क्लासमध्यें आलें असलें तरी अरविंद सर्वांच्या अपेक्षेप्रमाणें फर्स्टक्लासमध्यें आले यांतच मला समाधान आहे. पुढें एम्. ए. ला बसण्याचा त्यांचा विचार असल्यानें आम्ही सध्यां पुण्यास आलों आहोत.

आमचं लग्न झालं. कित्येकांना आनंद झाला, पण कित्येकांनीं कृष्णेच्या घांटावर बरीच टीकाही केली. कॉलेजांत आमचं प्रेम बसून, लग्न जमून आलं म्हणून चार दोन वर्षांतच आमचीं तोंडं दोन्ही दिशांना होऊन शेवटीं आमचा संसार अयशस्वी होणार असं अगाऊ भाकीत देखील कांहीं लोकांनीं करून ठेवलं आहे. याचं ठराविक म्हणणं एकच कीं कॉलेजमधल्या मुलांमुलींचं जमलेलं प्रेम भावनावश आणि क्षणजीवि

असतं. सौंदर्य आणि संपत्ति यांच्या लाटांवर हेलावणारं असतं. दुःखांचा धक्का बसला कीं त्याचा इंद्रधनुषी बुडबुडा फुटून, उरलेला फेंस मात्र त्यांच्या तोंडाशीं येतो. एखाद्या पाहिलेल्या उदाहरणावरून हा सर्वसामान्य सिद्धांत ते ठोकून देतात, पण अशा प्रेमाची आणि विस्कळित संसाराची जितकीं उदाहरणं ते देतात त्यांहून कितीतरी पटीनें जुन्या संसारांच्या वाताहतीचीं उदाहरणेंही मीही देऊं शकेन. एकमेकांची ओळख होऊन, आवडी निवडी जमल्या, स्वभाव समजून घेतले, मगच पटलं तर लग्नाची भाषा बोलणं यांत कांहीं वावगं होत आहे असं मला नाहीं वाटतं. जाऊं दे माझ्यापेक्षां शतपट शहाणे लोक या प्रश्नाची चर्चा करताहेत. मी बापडी काय बोलणार त्यांच्यापुढें ? मात्र मनाशीं विचार करावा, आणि रास्त वाटेल तें स्वतः आचरणांत आणावं हेंच मला योग्य वाटतं.

चार वर्षे आमच्यावर मायेची पाखर घालून, जगांतल्या ज्ञानाची-जीवनाची ओळख देणाऱ्या, आमचं व्यक्तिमत्व फुलविणाऱ्या, त्या सदा आनंदी, सदा उल्हासी, कॉलेजला काल शेवटली भेट देऊन आलें.

गेल्या वर्षांतच मी इतक्या विविध अनुभवांतून गेलें आहे, माझ्या मनस्थितीतही इतका बदल झाला आहे कीं निश्चलपणें उभ्या ठाकलेल्या त्या प्रशांत कॉलेजच्या इमारती जुन्या असूनही मला नव्यासारख्या वाटूं लागल्या. मात्र त्याबरोबरच एक बेचैन करणारी कल्पनाही मनांतून चमकून गेली. हजारों विद्यार्थि-विद्यार्थिनीं या चार भिंतींच्या आवारांत राहिले, खेळले, बागडले, रुसले, हसले, आणि अफाट जगांत निघून गेले. पण हे उंच उंच प्रासाद मात्र सुखदुःखाच्या पार गेलेल्या समाधिस्थ ऋषीप्रमाणें उभे आहेत. मग माझा काय पाड ? त्या हजार विद्यार्थिनींपैकीं मीही एक. जरठपणा ठाऊकच नसतो अशा संस्थेला. दरवर्षी साऱ्या देशाचें तारुण्य विद्यार्थ्यांच्या रूपानें तिच्या अंगांत हेलावत असतें.

काल मी **कॉलेजच्या आवारांत** पुन्हां पाऊल टाकल्याबरोबर, भुर्कन् चिवचिवणाऱ्या चिमण्यांचा थवा जमावा तशा माझ्या साऱ्या आनंदी मैत्रिणी माझ्याभोंवतीं जमल्या होत्या. साऱ्यानीं अगदीं प्रश्न विचारून विचारून पुरेसं केलं मला. आमच्या साऱ्या मैत्रिणींचा घोळका इतका मोठ्यानें हंसत खिदळत चालला होता कीं आमच्याकडे पाहत

दूर उभे असलेले विद्यार्थिसुद्धां नवल करायला लागले. मधल्या सुट्टींत पुन्हां साऱ्या वर्गांतून, लायब्ररींतून फिरून आलें.

—इथेंच, या बांकावर मी बसत असें, इथें वाचीत असें, ही आमची ' लेडीज रूम '—किती हंसलों, खिद्ळलों, मोकळेपणानें इथें—साऱ्या स्मृति माझ्या मनांत अगदीं गर्दी करून सोडीत होत्या. अरविंदांचे मित्र प्रो. सुधाकर यांनीं अध्यापकांच्या खोलींत मला नेलं, आणि साऱ्यांनीं शुभेच्छांचा आशीर्वाद दिला. शेवटीं जातांना रेसिडेन्सींतील माझी खोली पाहून आलें मी. माझ्याच खोलींतल्या कॉटवर बसलेली एक पारशी मुलगी पाहून क्षणभर तर अगदीं ' कोण ग तूं ! ' म्हणून सहज प्रश्नही माझ्या ओठांवर नकळत आला. जणूं काय माझ्या मालकी हक्काच्या जागेवरच दुसरं कोणी बसलं आहे !

फाटकाजवळ टांग्यांत अरविंद बसले होते. उशीर झाला म्हणून टांगेवाला जोरजोरानें पायघंटा वाजवीत होता. पण माझा पायच निघेना तिथून—

" वेडी कुठली ", मी मनाला म्हटलं, " आतां आणूं म्हटलं तरी ते दिवस फिरून येणार आहेत कां ? " शेवटीं मी जड पावलांनीं निघालें. साऱ्या मैत्रिणी फाटकापर्यंत पोंचवायला आल्या होत्या. त्या उंच लोखंडी फाटका बाहेर पाऊल टाकून मी टांग्यांत बसलें अन् माझ्या डोळ्यांत आसवं उभीं राहून मला हुंदकाच आला.

साऱ्या मैत्रिणी जरा नवलानंच पाहूं लागल्या माझ्याकडे, ' काय ग ? इतकी सुखी झालीस, इतकं सारं सारं मनासारखं झालं, अन् रडतेस काय वेडीसारखी ? ' एकीनें प्रश्न केला.

मी म्हटलं, " इतक्यांत नाहीं कळायचं तुम्हाला. कॉलेजच्या आवारांतून जगांत पहिलं पाऊल टाकाल, तेव्हां आठवण करा या सुधेची—म्हणजे मग त्या क्षणाला कळेल माझ्या डोळ्यांना पाणी कां आलं तें ! "

